# देशमुखवाडी

बोधपर सामाजिक कादंबरी.



लेखक,

श्रीयुत नाथ माधव.



प्रकाशक,

हिंद एजन्सी, माधवबाग-मुंबई.



मुंबई.

१९१६.

किंमत सव्वारुपया.



# देशमुखवाडी.



## प्रकरण १ लें.



### खरमरीत निरोप.



"का य ग ए कारटे भिमे ! ह्या रस्त्यानें जाऊं नको ह्मणून तुला किती वेळां सांगितलं ! देऊं का एक मुस्कटांत ?"

" आतां नाहीं जाणार बंडुनाना ?–खरंच नाहीं जाणार—"

" पण आतां का आलीस येथून—" असें ह्मणून बंडुनाना ऊर्फ बाबुरावानें तिचा हात धरला.

" बाबा झाडावरून पडलाहे ह्मणून दाजीबाकडे औषधाला जातें–आतां एकच घडी जाऊं दे–

त्या मुलीच्या तोंडून शेवटचें वाक्य बाहेर पडतें न पडतें तों बाबुरावानें तिच्या हाताला हिसका देऊन एक जोरानें तोंडांत लगाविली !

" पुनः आलीस ह्या रस्त्यानें तर असं रंगवीन तुझं मुस्कट—" असें ह्मणून तो पुनः तिच्या तोंडांत मारणार इतक्यांत पाठीमागून दुसऱ्या एका मुलानें त्याचा हात वरच्यावर धरला !

" अहारे गाजी !—वहारे तुझा पुरुषार्थ ! "

" कोण ! प्रभ्या !—सोड मला. " मागें वळून बाबुराव ह्मणाला, " तुला मध्यें पडण्याचें कारण नाहीं सांगतों. "

" भिमे, पळ—मी धरलाहे बंडुला. "

असें ह्मणून प्रभाकरानें बाबुरावाचा हात घट्ट धरून त्याला मागें ओढलें. त्याबरोबर त्याच्या हातांतून भिमा सुटली. आतां ती पळून जाईल असें वाटतांच बाबुरावानें तिच्या अंगावर लाथा झाडण्यास सुरवात केली. तें पाहून प्रभाकरानें त्याच्या कंबरेसभोंवतीं हाताचा विळखा घालून त्याला जागच्याजागीं दाबून धरलें. तितक्या अवधींत भिमा पळाली. बाबुराव रागानें लाल होऊन प्रभाकराला सारख्या शिव्या मोजूं लागला. परंतु प्रभाकरानें त्याकडे बिलकूल लक्ष दिलें नाहीं. फक्त भिमा दूर पळून जाण्याची तो वाट पहात होता. ती बरीच दूर पळून गेल्यावर त्यानें बाबुरावाला सोडून दिलें. बाबुराव जितका चिडलेला दिसत होता, तितकाच प्रभाकर शांत दिसत होता. त्याला सोडून दिल्यावर प्रभाकर जाऊं लागला तेव्हां बाबुराव चिडून ह्मणाला, "प्रभ्या, हलकटा ! लक्षांत ठेव ! कधीं तरी माझ्या तावडींत सांपडशील !—असा वचपा काढीन कीं—"

" कळला तुझा पुरुषार्थ ! तूं निव्वळ भागुबाई आहेस ! त्या लहान पोरीवर हात टाकतांना तुला लाज नाहीं वाटली ? शहाणा असशील तर आतां मुकाट्यानें चालता हो. " असें तुच्छतेनें ह्मणून प्रभाकर जाऊं लागला.

" नाहीं जात ! काय करशील ?—"

परंतु प्रभाकरानें त्याला उत्तर दिलें नाहीं. तेव्हां जास्तच चिडून हातपाय आपटीत बाबुरावानें घाणेरडे अपशब्द उच्चारण्यास सुरवात केली. त्यानें जेव्हां भिमीला पकडली, त्यावेळीं प्रभाकर पलीकडील शेतांत होता. तो नुकतांच शाळेंतून आला होता. बाबुराव त्या गरीब पोरीला मारीत आहे, असें पाहून त्यानें कुंपणा-

जवळ असलेल्या एका शिलेवर आपलीं पुस्तकें ठेऊन त्या मुलीला सोडविण्या करितां धांव मारिली होती.

" बंड्या, आतां तोंड आटप ! तुझ्या तोंडांत ह्या हलकटासारख्या घाणेरड्या शिव्या शोभत नाहींत. " मागें वळून प्रभाकर ह्मणाला.

" अरे जा. माहित आहे मोठा सभ्य आहेस तो. आतां थांब, घरीं जाऊन बाबांना सांगतों कीं, तूं माझा विनाकारण हा हात पिळलास ह्मणून ! "

" खुशाल—खुशाल जा. त्या भिमीला तूं मारलेंस ह्मणून—"

" मग ती ह्या रस्त्यानें कां आली ? "

" कां ? ह्या रस्त्यानें येण्याजाण्याचा माझा जसा हक्क आहे तसाच तिचा आहे. "

" नाहीं तिचा हक्क ! तूं तरी एवढी मिजास कशाला करतोस ! आतां बाबांना ांगून तुला देखील हा रस्ता बंद करून टाकतों, तूं काय समजला आहेस ! "

" होय तर. तुझे बाबा जसे कोणी बाजीराव लागून गेले आहेत ! "

" बाबांना देखील शिव्या देतोस काय ?—थांब सांगतों. "

" जा ह्मणून सांगितलं ना ? कीं आतां येऊं—" असें ह्मणून प्रभाकर जरा पुढें ाला, तसा भिऊन बाबुराव मागें सरला. व एक एक पाऊल मागें होत होत किंचित् दूर ग्यावर त्यानें एक मातीचें ढेकूळ उचललें आणि प्रभाकराच्या अंगावर फेंकून तो ह्मणाला, अरे जा भिकारड्याच्या पोरा, तूं काय समजला आहेस ! तूं आमच्या घरीं तर ये गजे दाखवितों तुला कसें काय आहे तें ! "

आपण पकडण्याकरितां येतों असें दाखविण्याकरितां प्रभाकरानें झटकन् एक दोन ालें पुढें टाकलीं. तें पाहतांच बाबुरावानें घराकडे धूम ठोकली !

ज्या रस्त्यानें आल्याबद्दल भिमीला बाबुरावानें अडविलें होतें तो रस्ता बाबुरावाच्या ालांच्या—बळवंतराव उर्फ भाऊसाहेबांच्या मालकीचा ह्मणण्यापेक्षां त्यांच्या ताब्यांत अस- ा शेतांतून होता. हें शेत बरेंच मोठें असून त्याच्या एका बाजूला कुंपण होतें. त्याच्या कडे दुसरें एक लहानसें शेत होतें. हें लहान शेत आणि पलीकडे दुसरीं चार शेतें कराच्या वडिलांच्या—सदाशिवराव उर्फ दाजीबा यांच्याकडे खंडानें होतीं ह्या जवळ जवळ ळेल्या शेतांकडे पाहिलें असतां दाजीबाच्या शेतांत व्यवस्थेनें लागवड केलेली दिसून

येत होती. ते दिवस शरदृतु संपून नुकतेंच आरंभ झालेले शिशिरऋतूंतील होते. शेताची कापणी करून त्याची व्यवस्थेनें मांडणी करण्याच्या उद्योगाला शेतकरीवर्ग लागला होता. अलीकडे शाळा सुटल्यावर घटका अर्धा घटका आपल्या शेतांत येऊन प्रभाकर शेतकऱ्यांजवळ बसत असे. लहानपणापासून त्यांचे शेतकीकडे विशेष लक्ष होतें. प्रभाकराचें वय सोळा वर्षांचें असून जरी तो वर्णानें काळा सांवळाच होता, तरी त्याचा चेहरा फारच मोहक दिसत होता. त्यांची आंगकाठी मजबूत असून डोळे पाणीदार होते. तो स्वभावानें फार प्रेमळ होता. त्याची मुद्रा गंभीर दिसत होती. त्याच्याकडे सहज पाहणाराला हा मुलगा पुढें प्रेमळ, सत्यप्रिय आणि सरळवर्तनी होईल असेंच वाटे. प्रभाकराविषयीं हें भविष्य कितपत खरें ठरेल याची वरील प्रसंगावरून वाचकांना सहज साक्ष पटण्यासारखी आहे. असो. बाबुराव पळून गेल्यावर प्रभाकरानें शिळेवर ठेविलेलीं आपलीं पुस्तकें उचललीं.

" प्रभाकर दादा ! "

कुंपणाच्या मागून कोणी तरी हांक मारल्याचा भास झाला ! प्रभाकरानें मागें वळून पाहिलें, तों तेरा वर्षांचा नाजुक प्रकृतीचा एक गोंडस पण निस्तेज दिसणारा मुलगा कुंपणाच्या मागें उभा असलेला त्याच्या दृष्टीस पडला.

" यशवंत, तूं रे येथें केव्हां आलास ? "

" मी तुमच्या आंबराईच्या बाजूनें इकडे आलों; तों तुमची दोघांची लढालढी चाललेली पाहिली, ह्मणून अंमळ दूर उभा राहूनच मजा पाहात होतों. पण कायरे प्रभाकर, तुला विशेष मारलेंबिरलें तर नाहींना बंडूनें ! तो अलीकडे फारच आडदांड झाला आहे ह्मणून विचारतों—"

" त्याची काय प्राज्ञा आहे मला मारण्याची ! त्याचा आडदांडपणा पोराटोराजवळच ! ती पोर भिमा ह्या रस्त्यानें आली ह्मणून तिला तो मारूं लागला, तेव्हां मी मध्यें पडून त्याच्या हातून तिला सोडविलें. जसें कांहीं हा रस्ता—हें शेत त्याच्या बापाचेंच ! "

यशवंत त्याचें भाषण ऐकत होता असें दिसलें. परंतु खरोखरच त्याचें लक्ष दुसरीकडे होतें. त्यावेळीं भगवान् सूर्यनारायण अस्ताचलास जात असतां आकाशाला आलेलें अद्वितीय सौंदर्य अवलोकन करण्यांत त्याचें लक्ष वेधलें होतें. यशवंताचा स्वभाव

फारच लहरी पण करारी होता. आणि ही लहरी आणि करारी स्वभावाची खोड दोन तीन पिढ्यापासून त्याच्याकडे चालत आलेली होती. यासंबंधानें हलुहळू पुढें उल्लेख होणारच आहे. यशवंताचें लक्ष आपणाकडे नाहीं असें पाहून प्रभाकर ह्मणाला, "यशवंत, कोठल्या विचारांत आहेस तूं?"

"माझ्या मालकीची ही देशमुखवाडी व सर्व इस्टेट असतांना मी ह्या भाऊसाहेबांच्या घरीं एखाद्या भिकाऱ्यासारखे भाकरीचे तुकडे मोडावें काय?" एकदम विचारांतून जागा होऊन यशवंत ह्मणाला. वरील वाक्य उच्चारतांना त्याचा चेहरा लाल दिसत होता. त्याचवेळीं त्याच्या करारी स्वभावाची त्याच्या चेहऱ्यावरून साक्ष पटत होती. परंतु ही आरक्ततेची छटा त्याच्या चेहऱ्यावर क्षणभरच होती. कारण किंचित्कालानें त्याला दुसरी आठवण होऊन त्याच्या नेत्रांतून अश्रुप्रवाह सुरू झाला. तो अत्यंत केविलवाण्या स्वरानें ह्मणाला, "प्रभाकर, आणखी कांहीं वर्षें माझे बाबा किंवा आई—कोणीतरी जगते तर—तर—"

यशवंताला अनावर हुंदका आला. प्रभाकरानें त्याच्या खांद्यावर हात ठेऊन त्याची समजूत करीत ह्मटलें, "यशवंत, असं तूं नेहमीं नेहमीं अश्रु गाळणं चांगलं नाहीं?"

"प्रभाकर, मी तर आतां ह्या घराला मनापासून कंटाळलों आहे. सगुणाआत्या नसती तर मी केव्हांच गेलों असतों निघून कुणीकडे तरी! हा बंडू आणि ती वत्सला आह्मां दोघांना—मला आणि कृष्णीला पावलोंपावलीं छळतात. सगुणाआत्या त्यांना वरचेवर दाबते पण ते आपल्या आईला मानतील तेव्हां ना? भाऊसाहेब तर त्यांना दाबण्याऐवजीं उलट उत्तेजन देतात तेव्हां तर असं वाटतं कीं, त्याचवेळीं कुठं तरी चालतं व्हावं—"

"छेः असे भलतेच विचार मनांत आणूं नकोस? ईश्वर कधीं सत्याला विसरावयाचा नाहीं, हें लक्षांत ठेव."

"सगुणाआत्याहि आह्मांला असंच सांगते. पण प्रभाकर, हा छळ तरी किती सोसायचा? आज सकाळीं उठल्याबरोबर बंडूनें भाऊसाहेबांना मजविषयीं कांहीं खोटंनाटं सांगितलं. तेव्हां ते देखील विनाकारण मजवर संतापले आणि 'आज ह्या येशाला जेवायला वाढूं नका. कोणी जर माझा हा हुकूम मोडला तर लक्षांत ठेवा' असं त्यांनीं दुर्गाताईला आणि सगुणाआत्याला बजावून सांगितलं."

" मग सकाळपासून तूं जेवला नाहींस वाटतं ? "

" नाहीं, दुपारीं आत्यानें चोरून मला एक लाडु मात्र दिला. "

" अरेरे ! मग यशवंत, चल आतां मजबरोबर घरीं. "

" नकोरे बुवा ! तुमच्या घरीं मी गेलों होतों इतकं बंडूला कळलं पुरे ! तो उलटें सुलटें कांहीं तरी भाऊसाहेबांना सांगेल ह्मणजे मग काय विचारतां ! माझं चार दिवस जेवण बंद—"

" मग मी आतां काय करूं ? " विचार करीत प्रभाकर ह्मणाला.

" तूं काय करणार त्याला ! माझं नशीब दुसरं काय ? आतां मी जातों घरीं–" असें निराशयुक्त बोलून यशवंत जाण्याकरितां मागें वळला.

प्रभाकर त्याच्याकडे पहातच राहिला. थोड्या वेळानें यशवंत शेतांतील रस्ता ओलांडून देशमुखवाडींत शिरला. तो दृष्टीआड होतांच एक दीर्घ श्वास सोडून प्रभाकरानें आपलीं पुस्तकें उचललीं. त्याच्या मनांत नुकतेंच ऐकलेलें यशवंताचें भाषण सारखें घोळत होतें. त्याच्या जिवाला तळमळ लागून राहिली. तो हळूहळूं घराकडे वळला. शेतांतील कुंपण ओलांडल्यावर आंबराईंत त्यांचें घर होतें. वाचकहो ! ह्या ठिकाणीं आपण प्रभाकराच्या घराची चांगली ओळख करून घेऊन नंतर कथानकाकडे वळूं. ज्या शेतांत त्या मुलांची लढालढी झाली त्या शेताच्या पश्चिमेला मोठी देशमुखवाडी होती. आणि पूर्वेच्या बाजूला देशमुखवाडीपासून पंधरा मिनिटांच्या रस्त्यावर आंबराईंत दाजीबाचें घर होतें. हें घर लहानसें दुमजली असून टुमदार होतें. बाहेरच्या बाजूला लांब ओटा असून मध्यें दिवाण-खाना व बाजूला दोन मोठ्या खोल्या होत्या. ओटीवर शेतकरी कुळांबरोबर बसण्या उठण्याकरितां एका कोपऱ्यांत बैठक केली होती. मागच्या बाजूला सोपा असून त्याच्या पलीकडे पडवी काढलेली होती. ह्या पडवींत धान्याचे कणगे भरलेले असत. पडवीला लागूनच स्वयंपाक घर होतें. वरच्या माडीवर मुलांचाच वापर असे. ह्याच माडीवर प्रभाकर आपल्या धाकट्या दोन भावंडांना घेऊन वाचावयास बसत असे.

दाजीबांच्या घरची व्यवस्था आणि टापटीप फारच प्रशंसनीय होती. आणि त्याचें सर्व श्रेय सावित्रीबाईकडे होतें. दाजीबांचें हें दुसरें कुटुंब. पहिल्या कुटुंबापासून त्यांना प्रभाकर हा एकच मुलगा. सावित्रीबाईपासून त्यांना चार मुलें झालीं. त्यांतून मधुकर

आणि कमला हीं दोनच जगलीं. पैकीं मधुकर सध्यां अकरा वर्षांचा होता. परंतु शरिरानें अशक्त होता. आणि कमला नऊ वर्षांची होती. ही पोर मात्र देखणी आणि चपळ होती. ह्या शिवाय त्यांच्या घरांत राधाआका नांवाची पन्नास वर्षांची एक वृद्ध विधवा होती. हिचें आणि दाजीबांचें दूरचें नातें होतें. प्रभाकराची आई वारली तेव्हां त्याला सांभाळण्याकरितां आणि घरांतील व्यवस्था पाहण्याकरितां दाजीबांनीं तिला आपल्या घरीं आणून ठेविलें होतें; तेव्हांपासून ती तेथेंच होती. राधाआका दाजीबांच्या घरचा सकाळ संध्याकाळचा स्वयंपाक करून वरकड सर्व व्यवस्था मुखत्यारीनें पहात असे. सावित्रीबाई तिला ‘ आका ’ ह्मणून ह्मणत असे. तिचा ती सासूसारखा योग्य मान ठेवीत असे. त्या ह्मातारीचा स्वभाव फारच मनमिळाऊ आणि धर्मभोळा होता. ह्याशिवाय त्यांच्या घरांत बाहेरच्या कामाकरितां मल्हारी नांवाचा वीसबावीस वर्षांचा एक नोकर होता. त्याचीं कामें ह्मटलीं ह्मणजे सकाळ संध्याकाळ गाईचें दूध काढणें, वासरें सोडणें, कुरणांत बैल नेणें आणि दाजीबांच्या घोडीला खरारा करणें हीं होतीं. इतकी सर्व कामें करून मल्हारी घरांतील प्रत्येक हांकेला ‘ ओ ’ देत असे.

प्रभाकर घरीं आला, त्यावेळीं राधाआका पडवीजवळ उभी राहून नुकतेंच पाडलेले नारळ आणि सुपाऱ्या मल्हारीजवळून मोजून घेत होती. दाजीबांना आंबराईतून आंब्याच्या उत्पन्नाच्या खालोखाल नारळ आणि सुपारी यांचें उत्पन्न होतें. शिवाय फणस, केळी इत्यादि फळझाडांपासून आणि परसांत हंगामाप्रमाणें उत्पन्न होणाऱ्या भाजीपाल्याचेंहि त्यांना उत्पन्न चांगलें होतें.

“ दादा, आज किनई, आपली मोठी मोट तुटली ! ” प्रभाकर आलेला पाहून धांवत धांवत आंतून येऊन कमला ह्मणाली.

“ खरं कीं काय ? पण तूं नाहींना विहीरीवर गेलीस ? जाऊं नकोसहो तेथें. विहीरीचा बांध अगदीं चिकट झाला आहे बरं ! ”

“ मी नाहीं गेलें. मल्हारी विहीरींत उतरला होता. त्याला पाहण्याकरितां मधुकर गेला होता. त्याला आका ओरडली.” प्रभाकराच्या हातांतून पुस्तकें घेऊन कमळा ह्मणाली.

“ हं—चला आतां जेवायला पाहूं सर्वजण. ” राधाआका दरवाजांतून ह्मणाली.

प्रभाकरानें कपडे काढून हात पाय धुतले आणि वस्त्रांतर करून तो पाटावर बसला.

मधुकर आणि कमला त्याच्या बाजूला बसलीं होतीं. त्या दोघां मुलांचें जेवण आनंदानें होत होतें. ह्मातार्‍या आकाची मधून मधून थट्टाहि चालली होती. परंतु प्रभाकराचें मात्र जेवणाकडे बिलकूल लक्ष नव्हतें. त्याच्या मनांत यशवंताविषयीं विचार घोळत होते. तो आज बरोबर जेवत नाहीं असें पाहून राधाआका ह्मणाली, " कायरे प्रभाकर, आज तुला भूक नाहीं वाटतं ! "

" आका, मला आज जेवणच जात नाहीं. आतां शाळेंतून येतांना मला देशमुखांचा यशवंत भेटला होता–" असें ह्मणून प्रभाकरानें यशवंताविषयीं सर्व हकीकत क्रमाक्रमानें तिला सांगितली. तेव्हां राधाआका ह्मणाली, " अरेरे ! काय ही त्या पोरांची स्थिति ! त्यांचं हक्काचं एवढं असून तीं दीनासारखी अन्नाला देखील महाग व्हावी ना ! खरंच सांगतें मी प्रभाकर, ह्या दोन पोरांचा तळतळाट भाऊसाहेबांना जाचल्याशिवाय कधींहि राहणार नाहीं. हे भाऊसाहेब, विश्वासघात करणार तरी कितीजणांचा ? आपल्या दाजीबाला पांच हजाराला फसविलं, ह्या पोरांचा विश्वासघात केला, असे एक ना दोन हे पापाचे डोंगर फेडणार तरी कधीं ?–मिळालें आहे देशमुखांचं वतन फुकट तें भोग तरी मुकाट्यानें ! कां उगाच त्या पोरांना छळतोस ह्मणावं ? "

दिवे लागण्याची वेळ झाली होती. प्रभाकर माडीवर जाऊन अभ्यास करण्याच्या तयारीला लागला होता. दाजीबा अद्यापि बाहेरून आले नव्हते. त्यांमुळें राधा आका आणि सगुणाबाई जेवणाच्या खोळबून राहिल्या होत्या. सावित्रीची प्रकृति किंचित् थंडीतापानें थोडी अस्वस्थ झाली होती ह्मणून ती खालच्या खोलींतच होती. राधाआका माडीवर मुलांजवळ बसली होती. इतक्यांत मल्हारी वर आला आणि प्रभाकराला ह्मणाला, " भाऊसाहेब घोड्यावरून येत आहेत असें वाटतें. मी त्यांना आंबराईत शिरतांना पाहिलें. "

प्रभाकर उठला. त्याच्या मागून राधाआका आणि मुलेंहि उठली. प्रभाकर जिना उतरून खालीं आला, त्यावेळीं भाऊसाहेब दरवाजाजवळ आले होते. वाचकहो ! आमच्या कथानकांत बरींच पात्रें यावयाचीं आहेत. तेव्हां जसजसीं आपणास पात्रें आढळतील, तसतशी त्यांची आपण ओळख करून घेत जाऊं ह्मणजे आपणास ठीक पडेल. भाऊसाहेबांचें वय चाळीस वर्षांचें होतें. ते बांध्यानें ठेंगणें असून

त्यांचा वर्ण काळा होता. त्यांच्या मिशा दाट व पिंगट होत्या, त्यामुळें त्यांचा चेहरा उग्र दिसत होता. आतांपर्यंत वर आलेल्या त्यांच्या वर्णनावरून त्यांचा स्वभाव कसा असावा हे सहज कळण्यासारखें आहे. त्यांचें राहणें मोठ्या थाटानें असे. लोकांनीं आपणास देशमुख ह्मणावें ह्मणून त्याची ही खटपट होती. देशमुखीच्या थाटाला अनुसरून ते घोडा किंवा गाडी ह्या वाहना खेरीज क्वचितच बाहेर पडत असत. परंतु लोक मात्र त्यांना किंचित्‌हि मान देत नसत. त्यांच्या हातांत ज्यांची मान अडकली होती, ती मंडळी मात्र त्यांना तोंडावर ' भाऊसाहेब ' ' भाऊसाहेब ' करीत. बाकी सर्वजण त्यांचा द्वेषच करीत असत.

" काय रे प्रभाकर, दाजी आहे का घरांत ? " घोड्याची मान थोपटीत भाऊसाहेब ह्मणाले.

" नाहीं. अद्यापि आले नाहींत. "

" मी जेव्हां येतो तेव्हां हा गृहस्थ घरांत नसतो ह्मणजे काय ? " कपाळाला आंठ्या घालून भाऊसाहेब ह्मणाले. " ही माझी तिसरी खेप ! आतां दाजी आल्यावर त्याला सांग कीं, मी आज स्वतः येथें आलों होतों. मला ही टाळाटाळी बिलकूल खपायची नाहीं. धान्याची विक्री करून पंधरवडा लोटला, आतां जुनीं बाकी द्यायला काय झालं आहे ?— उद्यां सकाळपर्यंत जर रक्कम माझ्या घरीं आली नाहीं तर मग वकिलापुढें मी ह्या सर्व गोष्टी ठेवीन. मग आपला विचार पहा असा तुझ्या बापाला माझा स्पष्ट निरोप सांग. "

भाऊसाहेबांचा निरोप ऐकून प्रभाकर अगदीं चकित झाला. आपल्या पित्याला भाऊसाहेबांचें कांहीं देणें आहे. पण त्यांत भाऊसाहेबांची कांहीं फसवणूक आहे असें त्याला माहिती होतें. तरी देखील त्या देण्याविषयीं इतका रागाचा आणि खरमरीत निरोप ऐकून तो क्षणभर विचारांत पडला. कदाचित् बाबुरावाबरोबर झालेला प्रकार त्यांच्या कानांवर जाऊन बाबुरावानें उलटसुलट कांहीं तरी सांगितल्यावरून भाऊसाहेब चिडून आपला राग ते आपल्या पित्यावर काढित आहेत, अशी त्याला शंका आली. आणि हा विचार त्याच्या मनांत येतांच तो बाबुरावावर मनांतल्या मनांत तडफडला. आणि म्हणाला,

" भाऊसाहेब, बाबुरावानें तुमच्याजवळ कांहीं कागाळी केली कीं काय ? "

" नाहीं. त्याला कागाळी करण्याचें काय कारण ? आणि कागाळी कशाबद्दल ? "

" नाहीं—ह्मटलें—त्याला चहाड्या करण्याची फार संवय आहे. मघां त्या भिमीला त्यानें उगाच मारलें—"

" बरं बरं—मरूंदे ती भिमी पण माझा निरोप दाजीला सांगण्यास विसरलास तर मात्र लक्षांत ठेव. " असें ह्मणून भाऊसाहेबानें घोडा फिरविला.

प्रभाकर दरवाजांतच उभा होता. क्षणभरानें भाऊसाहेबांच्या घोड्याच्या टापा ऐकूं येईनाशा झाल्या. इतक्यांत आंबराईच्या दरवाजांतून दाजीबा येतांना त्याच्या दृष्टीस पडले. त्यांचा बांधा उंच आणि शरीर बरेंच सदृढ होतें. त्यांच्या वयाला जरी बेचाळीस वर्षें झालीं होती, तरी अद्यापि त्यांचा चेहरा एखाद्या तरुणासारखा मोहक दिसत होता. अलीकडे चार सहावर्षें त्यांना चिंतारोगानें पछाडलें होतें, तरी ते बाहेरून सदा आनंदी दिसत होते.

" प्रभाकर, तूं का येथें उभा ? संध्याकाळ झाला, अद्यापि दिवे नाहीं लाविले घरांत ? मल्हारी कुठें आहे ? "

" बाबा, नुकतेच भाऊसाहेब येथें येऊन गेले—" असें ह्मणून प्रभाकरानें भाऊसाहेबांचा खरमरीत निरोप आपल्या पित्याला कळविला.

" काय ! बळवंतराव असं ह्मणाले ! काय चमत्कारिक गृहस्थ आहे हा ! माझ्या मुलांजवळ माझ्या देवघेवीबद्दल असा निर्वाणीचा निरोप—हरकत नाहीं. आतांच्या आतां जाऊन ह्या गोष्टीचा निकाल केला पाहिजे. " असें ह्मणून प्रभाकराकडे वळून ते पुढें ह्मणाले, " प्रभाकर, मी आतां बळवंतरावाकडे जातों. मला कदाचित् तेथें वेळही होईल, तर आकाला ह्मणावं कीं, तुह्मी जेवण आटोपून घ्या—माझी वाट पहात बसूं नका. "

असें ह्मणून दाजीबा त्याच पावलीं मागें फिरले.



# प्रकरण २ रें.



## बाबा कुठें गेले ?





थोडा वेळ झाला. प्रभाकर घरांत जाण्याकरितां वळला. इतक्यांत एक मरतुकडा कुत्रा अंबराईतून धांवत धांवत दरवाजाजवळ गेला. प्रभाकराची त्याचेकडे सहज दृष्टि गेली. तो कुत्रा क्षणभर दरवाजांत बसला आणि असा चमत्कारिक रीतीनें ओरडूं लागला कीं, त्याचें ओरडणें प्रभाकराला ऐकवेना. त्यानें पायाखालचा एक लहानसा धोंडा उचलला आणि तो कुत्र्यावर फेंकला. दगड नेमका पाठींत बसतांच कुत्रा पळून गेला. तें पाहून प्रभाकर घरांत गेला. तों राधाआकाचे खालील शब्द त्याच्या कानीं आले.

" काय झालं आहे ह्या मेल्या कुत्र्याला सकाळपासून रडायला ! सकाळीं दाजीबानें एकदां त्याला हांकललं—"

" मी आतां त्याला एक नेमका धोंडा मारला. " पुढें होऊन प्रभाकर ह्मणाला.

" प्रभाकर, कारे आले होते भाऊसाहेब ? " सावित्रीबाईनें मध्येंच विचारलें.

" बाबांना कांहीं पैशांचा निरोप सांगितला होता. बाबा आतां तिकडेच देशमुखवाडींत गेले आहेत. त्यांनीं तुह्माला जेवण आटपून घेण्यास सांगितलें आहे." असें ह्मणून तो आपल्या आईच्या कुशींत बसलेल्या भावंडांना ह्मणाला, " मधु, तुझा धडा झाला ?—कमला, चला आतां वर."

लवकरच प्रभाकराचें मन अभ्यासांत गुंतलें. मधून मधून मधुकर आणि कमला त्याला प्रश्न विचारीत होते. तासभर त्यांचा अभ्यास चालला होता. प्रभाकर इंग्रजी पांचवी इयत्ता शिकत होता. मधुकराचें मराठी तिसरें पुस्तक चालू होतें. कमलेची नुकतीच अक्षर ओळख होऊन ती जोडाक्षरें लावण्यास शिकत होती. त्यांचा अभ्यास झाल्यावर प्रभाकर आपल्या भावंडांबरोबर कविता ह्मणूं लागला. इतक्यांत

स्वयंपाकघरांतील सर्व काम आटोपून राधाआका वर आली. आणि तिनें मुलांच्या जवळ आपलें आसन ठोकून बटवा सोडला.

" आतां त्या भिमीचा बाप कसा आहे कुणास ठाऊक ? " सुपारी कुटीत असतां राधाआका ह्मणाली. " मघां ती भिमी लेप मागण्याकरितां आली होती. तिचा बाप संध्याकाळीं माडावरून पडला. त्याची काय ह्मणें कंबर दुखावली आहे असं भिमी सांगत होती–ऐक–प्रभाकर, हा पहा पुनः कुत्रा रडायला लागला ! झालाहें काय मेल्याला रडायला ?–"

" आका, त्याचं पोट दुखत असेल––"

" खरं ग खरं कमले ! आतां पहा मी जाऊन त्याला औषध देऊन येतों. " असें ह्मणून प्रभाकर कुत्र्याला मारण्याकरितां उठूं लागला. इतक्यांत कुत्र्याचा केंकाटण्याचा आवाज ऐकूं आला. प्रभाकर जाण्यापूर्वीं मल्हारीनें त्याचा चांगला समाचार घेतला. त्यानें काठीचे एक दोन तडाख़े देतांच कुत्रा दूर पळून गेला.

" भलं झालं ! ह्या मल्हारीनें मारलं वाटतं त्याला ! " राधाआका ह्मणाली.

" पण आका कुत्रं रडलं ह्मणजे काय होतंग ?" कमलेनें विचारलें.

" त्याचं कांहीं दुखत असेल ह्मणून तें रडतं ! " मधुकर ह्मणाला.

" त्याचं कांहीं दुखलं असलं तर तें ओरडत राहतं. पण हें त्याचं रडणं ह्मणजे कांहींतरी अशुभ गोष्टीचं चिन्ह आहे. " असें ह्मणून राधाआका क्षणभर थांबली. " सकाळीं उठल्याबरोबर त्याचं रडणं ऐकतांच माझ्या मनांत बरेच कुतर्क आले, तों संध्याकाळीं ही भिमी आली. "

" मग भिमीचा कुत्र्याच्या रडण्याशीं काय संबंध ?" प्रभाकरानें विचारलें.

" तिचा बाप माडावरून पडला आहे, कंबर मोडली आहे, तेव्हां तो जगेल असें नाहीं मला वाटत·–"

" ह्मणजे ? हें भविष्य तूं कशावरून सांगतेस आका ? "

" अरे ह्या कुत्र्याच्या रडण्याचा आणि मृत्यूचा तसाच कांहीं विलक्षण संबंध आहे. ज्या घरीं कुत्रा रडतो त्या घरीं असाच कांहींतरी प्रकार होतो, याचा मला कैक वेळां अनुभव आला आहे. "

" मग भिमीचा बाप जर मरणार असेल तर कुत्रा आपल्या दाराशीं कशाला रडायला येईल ? छे, मी नाहीं ह्या गोष्टीवर विश्वास ठेवणार ? आका, ही तुझी अगदीं वेडी समजूत आहे–"

इतक्यांत सगुणाबाईनें प्रभाकराला हांक मारली. तिला ' येतों ' ह्मणून सांगून प्रभाकरानें आपलीं पुस्तकें आटोपलीं. त्याचें पाहून मधुकर आणि कमला यांनींहि पुस्तकें उचलून फडताळावर ठेविलीं. राधाआका देखील आपला बटवा गुंडाळून उठली. सर्वजण खालीं आले. सावित्रीबाई जिन्याजवळच उभी होती.

" प्रभाकर, तुझा अभ्यास झाला काय ? " सावित्रीबाईनें विचारलें, " नऊ वाजून गेले अद्यापि येणं झालं नाहीं. का बरं इतका वेळ लागला असावा ! जरा जा पाहूं देशमुखवाडींत आणि शोध करून ये. "

आईच्या आज्ञेप्रमाणें प्रभाकर कपडे करून बाहेर पडला. त्यावेळीं आकाशांत साधारण चांदण्याचा प्रकाश होता. वारा थंड व मंद वहात होता. प्रभाकर तोंडानें शीळ वाजवीत चालला होता. त्यांच्या घरापासून पंधरा मिनीटांच्या रस्त्यावर देशमुखवाडी होती. मध्यें असलेलें कुपण ओलांडून शेतांतून गेल्यास देशमुखवाडी जवळ पडत असे परंतु शेतांतून न जातां प्रभाकर सडकेवरूनच चालला होता. देशमुखवाडी बरीच मोठी होती. देशमुखांचें घर जुन्या पद्धतीनें बांधलेलें फार मोठें आणि त्यांच्या वैभवाला शोभेल असेंच होतें. वाडीच्या सभोंवती काट्यांचें कुंपण केलें होतें. आंत जाण्यापूर्वी प्रथम देवडी लागत असे. सर्व वाडींत बागाईत चांगली केलेली होती. वाडीच्या एकाटोंकाला गवताची गंजी असून त्याच्या बाजूला घोड्यांचा तबेला होता. त्याच्या पलीकडे गाईम्हशींचा गोठा होता. त्याच्या जवळच एक छप्पर काढलेलें असून त्यांत मोतद्दार, माळी, आणि घरांत काम करणारे इतर नोकर रहात होते.

देवडीवर येतांच प्रभाकरानें दरवाजाचा कोयंडा वाजविला. क्षणभरानें रायबा देवडीवाल्यानें दरवाजा उघडला. प्रभाकराला पाहतांच झातारा रायबा ह्मणाला, " का प्रभाकर, रात्रीं कुणीकडे इकडे ? "

" बाबा आले आहेत ना इथें ! त्यांना ह्मणावं मी आलों आहे. "

" कोण ? दाजीसाहेब ! ते नाहींत येथें. "

" किती वेळ झाला त्यांना जाऊन ? "

" पण ते तेथें आलेच नाहींत. " असें ह्मणून रायबानें ' काशी ' ' काशी ' अशा हांका मारिल्या. थोड्या वेळानें चोवीस वर्षांची एक विधवा बाहेर आली. ही रायबाची मुलगी होती. देवडीवर हे दोघेच रहात असत. काशी वाड्यांतील दळण कांडण करीत असे आणि रायबा देवडीवर असे. तिला आलेली पाहून रायबा ह्मणाला, " काशे, दाजीसाहेब आले होते का येथें ? "

" नाहीं. "

" पण बाबा दिवे लागतांना येथें भाऊसाहेबांना मुद्दाम भेटण्याकरितां घरून निघाले." प्रभाकर ह्मणाला, "इतकी रात्र झाली अद्यापि आले नाहींत ह्मणून मला आईनें पाठविलें."

" मी आज दाजीसाहेबांना पाहिलें देखील नाहीं. संध्याकाळपासून मी वाड्यांतच होतें. आतांच तेथून परत आलें. "

" पण बाबा भाऊसाहेबांच्या खासगी खोलींत बसले असतील तें तुला काय माहिती ? "

" आज भाऊसाहेब त्या खोलींत गेलेच नाहींत. आज त्यांची प्रकृति बरी नाहीं. संध्याकाळीं बाहेरून आल्यावर थोडसं जेऊन ते तसेच माडीवर निजायला गेले. आज राघोजी नव्हता ह्मणून मीच त्यांची गादी आंथरून दिली. "

" आज बाजाराचा दिवस आहे, तेव्हां कदाचित् ते तेथें गेले नसतील कशावरून ?" मध्येंच रायबा ह्मणाला.

" नाहीं. देशमुखवाडींत जातो असेंच ह्मणून ते घरून निघाले हें मला पक्कं माहित आहे. पण काशी एकदां जाऊन घरांतून चौकशी करूं येना ? " काशी निघून गेल्यावर प्रभाकर क्षणभर स्तब्ध राहिला. इतक्यांत त्याच्या डोक्यांत कांहीं विचार येऊन यशवंता विषयीं कांहीं खबर काढावी ह्या उद्देशानें तो रायबाला ह्मणाला, " कांहीं घरांतील नवलविशेष खबर ?—आज यशवंताला ह्मणे जेवायला नाहीं घातलं ? "

" तें कांहीं विचारूं नको ! आतां ह्या घरांत नोकरी करण्याची शोभा नाहीं. ह्या देशमुखांच्या अन्नावर माझे हे केस पिकले ह्मणूनच आतां राहिलेले दिवस येथें काढायचे ! आणि आह्मी एक दोन जुनीं माणसं आहोंत ह्मणून भाऊसाहेब किंचित् वचकून आहेत.

नाहीतर त्या यशवंताला–" इतक्यांच काशी परत आली. आणि दाजीसाहेब येथें आलेच नाहींत असें तिनें सांगितलें. तें ऐकतांच प्रभाकर विचारांत पडला. क्षणभरानें त्यानें रायबाचा निरोप घेतला.

देशमुखवाडीची देवडी सोडून प्रभाकर रस्त्यावर आला. आतां कोठून जावें हा त्याला विचार पडला. शेतांतून कुंपण ओलांडून गेल्यास घरीं लवकर जाऊं हा विचार त्याच्या मनांत आला. तो तेथें उभा राहिला. कोठून जावें हा त्याच्या निश्चय ठरेना. पांच मिनीटें झालीं, तो शून्य मनानें तेथेंच उभा होता. शेवटीं शेतांतूनच जाण्याचें त्यानें ठरविलें. परंतु शेतांत वळण्यापूर्वीं तो स्वगत पुटपुटला—

" पण बाबा कुठें गेले ? "



# प्रकरण ३ रें.



## अपघात.





आतां चांदणें स्वच्छ पडलें होतें. घरीं जाण्याकरितां प्रभाकर शेतांतून शिरला परंतु पांच पावलें गेला नाहीं, तोंच त्याच्या मनांत कांहीं विचार येऊन तो पुनः थांबला. कुपणांत भाऊसाहेबांचा मारका बैल नेहमीं सुटा असतो त्याची त्याला आठवण झाली. सर्व गावांत त्या बैलाची विशेष ख्याती होती. त्यानें कैकवेळां कुंपणाची नासाडी केली होती; कैकवेळां नवख्या माणसांना त्यानें हैराण केलें होते; कैकवेळां त्यानें भाऊसाहेबांच्या गाड्या मोडल्या होत्या तरी देखील त्या दुष्ट बैलाला दूर करण्याचा विचार भाऊसाहेबांच्या मनांत आला नाहीं. पुष्कळदां त्या बैलाविषयीं लोकांनीं त्यांच्याजवळ कागाळ्या केल्या परंतु त्यांनीं तिकडे लक्षच दिलें नाहीं.

थोडा वेळ झाला. कुंपणांतून जावें कीं न जावें याचा विचार करीत प्रभाकर तेथेंच उभा होता. इतक्यांत रस्त्यांतून एक दहा बारा वर्षांचा पोर धांवत जातांना त्याच्या दृष्टीस पडला.

" गवळ्या, कुठे रे चाललास ? "

" कोन--तुह्मी व्हय--तुह्मासनीच मी हुडकतुया. दाजीसाब कुनीकड हाय ती ? तुमच्या घराकडं सुभानजी पाटील वाड्डुळ येऊन वसल्याती. "

" खरं कीं काय ? मग चल तर येथून कुंपणांतूनच जाऊं घरीं ह्मणजे लवकर पोहचूं. "

" पन दाजीसांबं कुणीकड हायती ? "

" कुठे गेले बाबा तें कांहींच कळत नाहीं. मी आतांच त्यांचा शोध करून देशमुखवाडींतून आलों. " असें ह्मणून प्रभाकर गवळ्याला घेऊन शेतांतून निघाला. त्याच्या डोक्यांत विचारांचें काहूर माजलें होतें. भाऊसाहेबांचा निरोप ऐकतांच घरून निघण्यापूर्वीं बापानें उच्चारलेले शब्द प्रभाकराला चांगलेच आठवत होते. शेवटचा निकाल करण्याच्याच उद्देशानें रागानें निघालेले बाबा देशमुखवाडींत न जातां दुसरीकडे जातील हें त्याला संभवनीय वाटेना. ह्या विचारांत तो कुपणाजवळ आला. गवळ्यानें एखाद्या माकडाप्रमाणें कुंपणावरून चटकन् उडी मारिली.

" परभाकरराव, हकडं भाऊसाहेबाचा बैल हाय, नव्हका ? मारील की जातांना ? "

" कांहीं मारीत नाहीं. चल सरळ—"

" अग बया, आला की—" एकदम दचकून गवळ्या मागें झाला. प्रभाकरहि दचकला. बैल आला असेंच विचार चटकन् त्याच्या मनांत आले. त्यानें भीतभीत आजुबाजूला पाहिलें, तोंच डाव्या बाजूला जोरानें कुंथण्याचा आवाज त्याच्या स्पष्ट कानीं आला. त्या बाजूला बोट दाखवून गवळ्या ह्मणाला, " तकड हय बघा बैल–प्ररभाकरराव पळा मागं ! " तोंच पुनः कुंथण्याचा आवाज आला. ज्या बाजूनें तो आवाज आला, त्या ठिकाणीं बराच रुंद व पुरुषाच्या उंची इतका खोल खाडा होता. पावसाळ्यांत तो खाडा पाण्यानें भरून जात असे. आतां त्या खाड्यांत चिखल सांचला होता. प्रभाकर भीतभीत पुढें झाला. आणि खाड्यांत डोकावून पाहूं लागला.

" कोण आहे ? "

" मी–प्रभाकर ! "

" बाळा—"

" कोण ! बाबा ?—काय झालं ? "

" बाळ, मी मरत आहें. "

अरेरे ! काय तो देखावा ? त्या खाड्यांत चिखलामध्यें अर्धे अधिक गाढलेले हताश स्थितींत दाजीबा पडले होते. त्यांचा शब्द खोल गेला होता. त्यांना हालचाल करण्याची शक्ति नव्हती. त्यांच्या बाजूचा चिखल रक्तमय दिसत होता. परंतु ही त्यांची अशी शोचनीय स्थिति कशामुळें झाली ?–भाऊसाहेबांच्या क्रूर बैलानें त्यांच्यावर हल्ला करून त्यांना त्या ठिकाणीं आणून टाकले होते.

" गवळ्या धांव–अरे कोणाला तरी बोलाव–जा–अरेरे बाबा !–अरे कोणी धांवा–" देहभान विसरून प्रभाकर वेड्यासारखा मदतीसाठीं कोणी यावें ह्मणून मोठ्यमोठ्यानें ओरडूं लागला. " बाबा, कोणी नाहींहो ' ओ ' देत ! आतां काय करूं ?–बाबा, मी काढतो तुह्मांला वर. "

" छेः तुला कसं हें होईल—"

" मग मी देशमुखवाड्यांतून कोणाला तरी बोलावितों. "

" नाहीं. देशमुखवाडीचं नांव काढूं नकोस. " त्यांतल्यात्यांत किंचित् जोरानें रागांत पण कुंथत दाजीबा ह्मणाले, " बेहत्तर आहे मी येथेंच मेलों तर ! पण त्यांची मला मदत नको. माझ्या सुखाचा बळवंतरावानें नाश केला; आणि आतां त्यांच्या बैलानें तर माझा सर्वस्वी घात केला ! "

" मग—गवळ्या, धांवत जा घरीं—"

" थांब, नको त्याला पाठवूं ! तो कांहीं तरी सांगेल आणि मंडळी घाबरतील. तूंच जा घरीं आणि मल्हारीला घेऊन ये. पण सांभाळ, तिला सांगतांना ती भिऊन जाईल असें सांगूं नकोस. "

प्रभाकरानें गवळ्याला तेथें उभा करून आपण घराकडे धांव मारिली. तो कोठल्या स्थितींत धांवत होता, याची आपणांस कल्पना देखील करतां येणार नाहीं. घराच्या पायऱ्या चढेपर्यंत त्यानें आपला श्वास देखील सोडला नाहीं. ओटीवर सुभानजी पाटील दाजीबांची वाट पहात डुलक्या देत गादीवर बसला होता. प्रभाकराच्या पावलांचा आवाज ऐकतांच तो जागा झाला. इतक्यांत दरवाजा उघडला. दिवाणखान्यांत राधाआका, सावित्रीबाई आणि मुलें होतीं. सावित्रीबाईनें बाहेर आवाज ऐकतांच दरवाजा उघडला होता. तिला पाहतांच आतां काय सांगावें ह्या विचारानें प्रभाकर गोंधळला !

" कोण प्रभाकर !—अरे बाजीसाहेब कुठें आहेत ? मी केव्हांपासून त्यांची वाट पहात बसलों आहें ! " सुभानजी पाटील ह्मणाला.

" सुभानजी, जरा इकडे या. " असें ह्मणून प्रसंगावधान साधून प्रभाकरानें त्याला एका बाजूला नेलें. [illegible]नच वाक्यांत सर्व हकीकत सांगितली.

" काय सांगतोस हें तूं प्रभाकर ? " आश्चर्यानें पाटील ह्मणाला, " दाजीसाहेबांना बैलानें— "

" ओरडूं नका असें—" त्याला दाबण्याचा प्रभाकरानें प्रयत्न केला. परंतु त्यानें आश्चर्यानें उच्चारलेले शेवटचे दोन शब्द दरवाजांत उभी असलेल्या सावित्रीबाईनें ऐकलेच !

" प्रभाकर, काय गडबड आहे ? ते कुठें आहेत ?—सांग—अरे, ते कुठें आहेत ? बैलानें काय केले ? बोल—अरे बोल—" एका मागून एक सावित्रीबाईनें भयाभीत होऊन त्याला प्रश्न विचारले. आतां मात्र प्रभाकराला मोठें संकट पडलें. तो विचारांत पडला.

"सांग, अरे तूं असा स्तब्ध कां ?"

"आई, बाबांचा शेतांत पाय लचकून–"

"पण बैलानें काय केलं ?"

"बैल–बैल अंगावर आला ह्मणून बाबा पळूं लागले–"

"मग ते आतां कुठें आहेत ?"

"शेतांत पडले आहेत."

प्रभाकरानें बरीच बाजू संभाळली ! सावित्रीबाईनें एकावर एक विचारलेल्या प्रश्नाचीं त्यानें सरळ उत्तरें दिलीं. इतक्यांत सुभानजीनें मल्हारीला हांका मारून बोलाविलें. आणि सावित्रीबाईकडेहि विशेष लक्ष न देतां प्रभाकराला बाहेर बोलाविलें. नंतर ते तिघे-जण झपाट्यानें शेतांत जाण्याकरितां निघाले. सावित्रीबाई स्तब्ध उभी राहून दरवाजाकडे शून्य दृष्टीनें पहात होती. आणि मुलें तिच्याकडे टकमका पहात होतीं. परंतु राधाआकाच्या मनांत कुतर्कांची गर्दी उडाली होती. प्रभाकराच्या सांगण्याप्रमाणें केवळ पाय लच-कला असतां दाजीबा शेतांत पडून राहील हें तिला खरें वाटेना ! कांहींतरी कमीजास्त प्रकार असला पाहिजे, असेंच तिला वाटत होतें. इकडे सुभानजी, मल्हारी आणि प्रभाकर कुंपणाजवळ येऊन पोहोंचले. गवळ्या अद्यापि तेथेंच उभा होता. मंडळी आलेली पाहतांच त्याला धीर आला. दाजीबा शरिराला लागलेल्या असह्य वेदनेमुळें एक-सारखे कण्हत होते. चिखलानें सर्व कपडे खराब होऊन भिजल्यामुळें त्यांचें शरीर गारठून गेलें होतें. संध्याकाळपासून जवळजवळ चार तास ते त्याच स्थितींत पडले होते. प्रभाकरानें भाऊसाहेबांचा निरोप सांगतांच दाजीबा निघाले, त्यावेळीं ते रागांत होते. तेव्हां त्या रागाच्या आवेशांत देशमुखवाडींत लवकर जाण्याच्या उद्देशानें रस्त्यावरून न जातां ते शेतांतून जाण्यास वळले. कुंपणाजवळ जातांच पलीकडे कुसाजवळ भाऊसा-हेबांचा बैल चरत असतां त्यांनीं पाहिला परंतु त्याकडे त्यांनीं लक्ष दिलें नाहीं. बै-लाची दृष्टि त्यांच्याकडे जातांच त्यानें एक डुरकणी फोडली. इतक्यांत शेतांतून कुंप-णांत येण्याकरितां दाजीबानें बांधावरून उडी टाकिली. तेव्हां आपणालाच ते मार-ण्याकरितां येत आहेत, असें वाटून बैल त्यांच्या अंगावर धांवला. बैल अंगावर धांवून येत आहे असें पाहून त्याला मारण्याकरितां आजुबाजूला कांहीं साधन आहे काय हें पहाण्या-करितां ते इकडेतिकडे पाहूं लागले, तोंच बैल त्यांच्या अंगावर आला. त्यांनीं बाजूला पळ-

ण्याचा प्रयत्न केला परंतु बैलानें त्यांना आडविलेंच ! दाजीबा मोठ्यानें ओरडले. परंतु त्यावेळीं आजुबाजूला कोणीच नव्हते. त्याचें शेत तेथून जवळच होतें. परंतु शेतकरी काम आटोपून केव्हांच घरीं गेले होते. मदतीची आशा नाहीं असें पाहून बैलाला आडविण्याचा त्यांनी प्रयत्न केला. अंगावर आला असतां एकदम त्याचीं शिंगें धरून त्याला जागच्या जागीं दाबावा, असा विचार करून मोठ्या सावधगिरीनें बैल डुरकाणी देत पुढें येतांच दाजीबानें त्याचीं शिंगें पकडली. परंतु त्या माजलेल्या जनावराच्या शक्तीची दाजीबांना काय कल्पना ? एक हिसका देतांच दाजीबाच्या हातून आपलीं शिंगें सोडवून बैलानें खालीं मुसंडी मारिली आणि त्यांस आपल्या शिंगावर घेतले. त्याचें एक शिंग दाजीबांच्या कुशींत भोंसकलें आणि दुसरें उजव्या खांद्यांत घुसलें. शरिराला जखमा होतांच दाजीबा बेशुद्ध झाले. बैलानें मानेला दिसके देत व जमिनीवर लोळवीत त्यांना बाजूच्या खाड्यांत आणून टाकलें आणि त्यांच्या शरिरांत घुसलेलीं आपलीं शिंगें पुनः हिसके देत काढून घेतलीं. त्यांना भयंकर जखमा झाल्या. तीन साडेतीन तास ते बेशुद्धस्थितींत होते. प्रभाकर तेथून जाण्यापूर्वीं थोडावेळ ते शुद्धीवर आले होते. रक्तस्राव बराच झाल्यामुळें व सर्वांग जखमांनीं भरल्यामुळें त्यांच्या अंगांत हालचाल करण्याचेंहि सामर्थ्य उरलें नव्हतें.

सुभानजी, मल्हारी आणि प्रभाकर येतांच गवळ्या तेथून निसटला. दाजीसाहेबांस बैलानें मारलें ही हकीकत आपण दुसऱ्याला केव्हां सांगतों, असें त्या पोराला झालें होतें. तो शेतांतून निघाला तों रस्त्यावर येऊन उभा राहिला. समोरच देशमुखवाडी होती. त्याबाजूला दृष्टि जातांच प्रथम तिकडे जाण्याचा त्यानें विचार केला. वाड्याची देवडी बंद होती परंतु त्या अचपळ पोराला आंत जाण्याचा थोडाच प्रतिबंध होता ? माकडासारखा दरवाज्यावर चढून तो आंत गेला.

दिवाणखान्यांत दिवा झगझगीत तेवत होता. मध्यभागीं बैठकीवर बाबुराव आणि वत्सला बेझीक खेळत होतीं. यशवंत आणि कृष्णी झोपेनें पेंगलें असतांहि नाइलाजास्तव त्यांच्याजवळ बसून त्यांचे मार्क मांडीत होतें. बाजूला गादीवर तीन वर्षांची एक मुलगी झोंपली होती. मधून मधून कृष्णा तिला थोपटीत होती. ह्या गोजीरवाण्या लहान मुलीचें नांव इंदुबाळ असें ठेविलें होतें. पलीकडच्या खोलींत सगुणाबाई पडली होती. तिचा चेहरा अगदीं निस्तेज दिसत होता. तिला एकंदर सहा मुलें झालीं. वत्सलेच्या

मागून झालेली तिन्हीं मुलें महिना दोन महिन्यांची होऊन मेली होती. त्या तिन्हीं बाळंतपणांत तिला शरीरकष्ट बरेंच भोगावें लागून तिचें फार हाल झाले. पुढें इंदूचा जन्म झाल्यापासून तिची प्रकृति कायमची बिघडली. तिला बाळंतरोग जडला. वास्तविक पाहिलें असतां ती सर्व घराची मालकीण. परंतु घरांत तिची काडी इतकी देखील सत्ता नव्हती. घरची सर्व व्यवस्था तिची विधवा नणंद दुर्गाताई पहात असे. तिला सासरचा कांहीं आधार नव्हता. वैधव्य प्राप्त झाल्यावर ती आपल्या भावाच्या आश्रयाला येऊन राहिली होती. सगुणाबाई प्रकृतीच्या अस्वस्थतेमुळें गृहकृत्याकडे विशेष लक्ष देत नसे. परंतु त्याचा फायदा घेऊन दुर्गाताईनें घराचीं सर्व सूत्रें आपल्या हातीं घेतली होती. तिचा स्वभाव विशेष हेकेखोर होता. बाबुरावाचा स्वभाव कसा होता तो पहिल्या प्रकरणांत वाचकांना समजून चुकलाच आहे. त्याच्या बहिणीचा—वत्सलेचा स्वभाव कसा होता याची ओळख करून घेण्यास क्षणभर आपण त्यांचें भाषण ऐकूं ह्मणजे झालें.

" कुशे, कार्टे तुझं लक्ष कुठें आहे ? माझे दहा मार्क नाहीं मांडलेस ते ? " कृष्णीच्या मांडीवर जोराचा चिमटा घेऊन वत्सला ह्मणाली.

" वत्से, कसलेग दहा मार्क ? असें चोरतेस मार्क काय ? देऊं का एक थोबाडींत ?" बाबुराव ह्मणाला.

" कुठलें ह्मणजे ? हें नाहींत का माझें दहा मार्क ! "

" मग तसें माझें देखील आहेत. हें पहा—येशा, मांड दहा मार्क आपले—"

" हें रे काय बंडुनाना ? एकदां तूं दहा मार्क घेतलेस आणि पुनः तेच दाखवितोस ह्मणजे काय ? "

" अग चल चल. केव्हां ग दाखविले ? "

" अशी लबाडी करतोस काय नाना ? मी नाहीं खेळत जा—" असें ह्मणून वत्सलेनें हातांतील पानें खालीं टाकलीं. इतक्यांत दरवाजा वाजला !

" बंडु—वत्से, तुमचा खेळ आटोपला कीं नाहीं ? किती वाजले ? " आंतून दुर्गाआत्या ह्मणाली. " कुशे, इंदू झोंपली असेल तर तिला नेऊन दे तिच्या आईजवळ. चला— उठा आतां पुष्कळ झाला धांगडधिंगा ! "

पुनः दरवाजा वाजला !

" कोण आलं आहे ग बाहेर?–वत्से पहा पाहूं. " दुर्गाआत्या ह्मणाली. परंतु वत्सला थोडीच ऐकणार होती ? तिनें कृष्णीला ढकलून ह्मटलें, " कुशे, उठ–पहा कोण ठोकतं दरवाजा ? "

मुकाट्यानें कृष्णी उठली. दरवाजा उघडतांच गवळ्या तिच्या दृष्टीस पडला.

" काय आहे रे गवळ्या ? " तिनें आश्चर्यानें विचारलें.

" भाऊसाह्यब हायत का ? "

" आहेत, पण वर झोंपले आहेत. "

" आन् ताईसाह्यब ? "

" कोण आहेग कुशे ? " दुर्गाआत्यानें मधून विचारलें.

" गवळ्या आला आहे आत्या. " मान वळवून कृष्णी ह्मणाली.

" काय पाहिजे त्याला ? "

" खबर आनलिया आत्याबाई. " पुढें होऊन गवळ्या ह्मणाला.

" कसली खबर ? "

" भाऊसायबांच्या बैलानं दाजीसाबास्नी हाणलिया. मारमारून फाडून टाकलिया शेतामंदी. "

सर्वांचें लक्ष गवळ्याकडे वेधलें. बाबुराव आणि वत्सला धांवत पुढें आले. सगुणाबाईहि आंतून हळु हळू बाहेर आली. आणि ह्मणाली, " काय झालंरे गवळ्या ? "

" ताईसाब, बैलान बघा दाजीसाबास्नी बेदम मारलिया–"

एकदम सगुणाबाई दचकली ! तिची चर्या बदलली. कांपऱ्या स्वरानें तिनें पुनः विचारलें, " गवळ्या, तूं स्वतः पाहिलंस का ? "

" आतां काय सांगूं ताईसाब ! मी होतो की वाहूळ वखत थिकडंच उभा. त्या खांड्यामंदी दाजीसाब कन्हत पडल्याती. ते म्हंगले, ' परभाकर, बाल मरतुया आतां मी ! ' "

" झालं ! शेवटीं मी ह्मणत होतें तेंच खरं ठरलं ! " अत्यंत दुःखानें डोळ्यांत अश्रु आणून सगुणाबाई ह्मणाली, " त्या दुष्ट बैलाला दूर करा ह्मणून मी कितीदां तरी सांगितलं. पण नाहीं. शेवटीं असं झालं ना ! "

---

# प्रकरण ४ थें.



## मृत्युशय्या.





जवळ जवळ मध्यरात्र झाली होती. दाजीबांना सुभानजी पाटील आणि मल्हारी यांनीं उचलून दिवाणखान्यांत एका गादीवर आणून नुकतेंच ठेविले होते. त्यावेळचा देखावा फारच हृदयद्रावक होता. दाजीबांच्या अंगावरील सर्व कपडे चिखलानें आणि रक्तानें भरले होते. घरांतील सर्व मंडळी त्यांच्या बिछान्यासभोंवतीं गोळा झाली होतीं. त्यांची ती हृदयविदारण करणारी शोचनीय स्थिति पाहून प्रत्येकाचे डोळे अश्रूनें डबडबले होते. सावित्रीबाईची छाती दुःखानें अगदीं पूर्णपणें भरली होती. तरी तिनें आपलें दुःख बाहेर येऊं दिलें नाहीं. ती मोठी धीराची बायको होती. अशा बिकट प्रसंगीं काय करावयाचें तें ठरवून प्रथम तिनें मुलांना एका खोलींत बसवून मल्हारीला केशवशास्त्र्याकडे पिटाळविलें. आणि आपण आकाच्या मदतीनें दाजीबांच्या अंगावरील कपडे नीट काळजीपूर्वक काढून त्यांच्या अंगाला लागलेला सर्व चिखल पुसून स्वच्छ केला. थोड्या वेळांत शास्त्रीबुवा आले. त्यांनीं प्रथम दाजीबांची नाडी पाहिली. नंतर अंगावरील कपडा त्यांनीं बाजूला केला. परंतु जखमा दृष्टीस पडतांच ते एकदम मागें सरले. कारण त्या जखमा फारच भयंकर होत्या.

" सावित्रीबाई, प्रथम इस्पितलांत मनुष्य पाठवा. " गुंगीत पडलेल्या दाजीबाजवळून उठून शास्त्रीबुवा ह्मणाले.

" पण तुह्माला काय वाटतं तें खरं सांगा शास्त्रीबुवा ? तुमच्याकडून नाहीं कांहीं कांहीं उपाय होणार ? " डोळ्यांत अश्रू आणून सावित्रीबाईनें हळूंच विचारलें.

" मी काय करणार येथें ! ह्या वीत वीत लांब पडलेल्या जखमा मला कशा शिवतां येतील ? हें काम ते इस्पितलांतील डाक्तरच करूं जाणत ! आतां तुह्मीं वेळ नका गमावूं. प्रथम कोणाला तरी पाठवा आणि डाक्तर आणण्याची व्यवस्था करा. तो येईपर्यंत रक्तस्राव बंद होण्याचं मी औषध घेऊन येतों. तुह्मी अशा घाबरूं नका.

तुह्मीच जर धीर सोडला तर हीं मुलं आक्रांत करतील. ईश्वरावर भार टाका. दाजीबांच्या आयुष्याची दोरी सबळ असेल, तर आमच्या प्रयत्नाला ईश्वरकृपेनें खात्रीनें यश येईल.. हं–उभ्या नका राहूं आतां, पाठवा कोणाला तरी इस्पितलांत."

सावित्रीबाईनें डोळे पुसले. आपणावर कोणता प्रसंग ओढवणार आहे, तें ती समजून चुकली. परंतु आशा ही कोणाला सुटली आहे काय ! तिनें मल्हारीला हांक मारिली, आणि घोडी घेऊन पळत हॉस्पिटलमध्यें जाण्यास सांगितलें. त्यावेळीं फुलशहरांतील हॅास्पिटलमध्यें मुख्य डॅाक्टर मुसलमान होता. जंजिरा संस्थानाधिपतीनें आपल्या रयतेच्या सुखाकरितां मुरुड आणि स्वतः नवीन वसविलेल्या फुलशहरांत ज्या अनेक सोई केल्या होत्या, त्यांत ह्या हॉस्पिटालाची सोई फारच उत्तम होती. डॉक्टरसाहेबहि फारच दयाळू व वयवंत होते. इतक्या रात्रीं, इतक्या लांबचें बोलावणें आलें असतांहि किंचित् कांकूं न करतां डॅाक्टरसाहेब मल्हारी बरोबर निघाले. निघण्यापूर्वी त्यांनीं मल्हारीला सर्व हकीकत विचारून शस्त्रें आणि ओषधें यांची पेटी बरोबर घेतली होती.

तितक्या अवधींत शास्त्रीबुवा औषध घेऊन परत आले. त्यांनीं प्रथम एकमात्रा उगाळून ती दाजीबांना दिली. क्षणभरानें दाजीबानें डोळे उघडले आणि एकवेळ सभोंवार पाहिलें. मुलें जवळच उभीं होतीं. सावित्रीबाई आणि आका एकाबाजूला आणि वैद्यबुवा एका बाजूला असे बिछान्याजवळ उभे होते. मुलांकडे दाजीबांची दृष्टि जातांच त्यांच्या नेत्रांत घळकन् अश्रू आले. ते खोल आवाजांत ह्मणाले, " लाडक्यांनों, या–या अगदीं माझ्याजवळ या—"

प्रभाकरानें आपले अश्रु पुसून तो आपल्या बापाच्या उशाजवळ गेला. मधुकर आणि कमला रडतच होती. त्यांनाहि जवळ येण्याची खूण करून दाजीबा पुनः ह्मणाले, "बाळांनों, अगदीं मजजवळ या. मला एकवेळ दृष्टि भरून तुह्माला पाहूं द्या. प्रभाकर बाळ, मी आतां मरणार. आणि मी मरावं अशीच ईश्वराची इच्छा दिसते. पण अशा रीतीनें मी गेल्यावर तुमचं कसं होईल ? ह्या घरदाराचं, ह्या शेतवाडीचं कसं होईल–अरेरे ! मला आतां कांहींच सुचत नाहीं. मी तुमच्या करितां कांहींच तजवीज करून ठेविली नाहीं. ह्या बळवंतरावानें माझा सर्वस्वी नाश केला—"

दाजीबांनी अतिशय बोलणें चांगलें नाहीं, असें जाणून शास्त्रीबुवा हळूंच ह्मणाले, "दाजीबा, तुह्मीं आतां बोलण्याचें श्रम घेऊं नका. त्यापासून तुह्माला मानसिक—"

"शास्त्रीबुवा, आतां मला माझ्या ह्या लाडक्यांच्याबरोबर बोलूं द्या. मी आतां ह्याच स्थितींत मरणार आहें, अशी माझी मनोदेवता मला सांगते. मला दुसरें कशाचें दुःख होत नाहीं. फक्त ह्या माझ्या लाडक्या मुलांचें पुढें कसें होईल, हीच मला मोठी काळजी आहे. आजपर्यंत मी सद्वर्तनानें चालून मिठभाकर मिळविली. परंतु ती देखील ह्या बळवंतरावानें मला सुखासमाधानानें खावूं दिली नाहीं. आजपर्यंत मी त्याच्याबरोबर टक्कर दिली परंतु आतां माझ्या मागें काय होईल ? हें घरदार, शेतवाडी सर्व तो आपल्या ताब्यांत घेईल. आणि तुह्मांला ह्या घरांतून हांकून लावील. " असें ह्मणून त्यांनीं आपल्या पत्नीकडे पाहिलें, " आतां माझा सर्व भार तुझ्यावर आहे. तूं आपली जबाबदारी ओळखून वागशील अशी माझी खात्री आहे. आतां प्रभाकरानें शेतांतच खपलें पाहिजे. तुह्माला मिठभाकरीकरितां अंगमेहनती शिवाय दुसरा मार्ग नाहीं. तुह्मीं सचोटीनें सरळ वागा. आपल्या जरूरीच्या गरजा भागल्या कीं, त्यांतच संतुष्ट रहा. बळवंतरावानें मजप्रमाणें जरी तुह्मांला छळलें, तरी त्याच्या सुखाचा तुह्मी हेवा करूं नका. त्याला खावयाला जरी पंचपक्कान्नें आहेत; वापरावयाला मौल्यवान वस्त्रें आहेत; रहावयाला जरी मोठी देशमुखवाडी आहे, तरी त्याच्यापासून त्याला सुख नाहीं, परंतु माझ्यासारखी अंगमेहनत करून ईश्वरानें दिलेल्या मिठभाकरींत व एखाद्या झोंपडींतहि एखाद्या सार्वभौम राजाच्या वांट्याला नाहीं असें सुख तुह्मी अनुभवाल. प्रभाकर, मी आतां तुह्मापासून दूर होत आहे—कायमचा दूर, तुमच्या दृष्टीआड होणार आहें. परंतु तुमच्या हातून होणाऱ्या बऱ्यावाईट सर्व गोष्टी मला स्पष्ट दिसणार आहेत. तूं कधीं वाईट मार्गानें जाऊं नकोस. आतां सर्व भार तुझ्यावर आहे. कुटुंबाची जबाबदारी तुझ्या शिरावर आहे. आपल्या लहान भांवडांना आतां तूं माझ्या जागीं आहेस. तूं आपल्या आईच्या वचनाबाहेर कधींहि वागूं नकोस."

दाजीबांना बोलण्याचे अतिशय श्रम झाले. अद्यापि त्यांच्या मनांतून पुष्कळ बोलावयाचें होतें. त्यांच्या जखमांना असह्य वेदना लागल्या होत्या. परंतु आपलें दुःख पाहून आपल्या मुलांना दुःख होईल ह्मणून त्या धीराच्या माणसानें आपलें दुःख किंचितहि बाहेर दिसूं दिलें नाहीं. इतक्यांत आंबराईच्या दरवाजापाशीं गाडीचा आवाज ऐकूं आला. शास्त्रीबुवा आणि प्रभाकर पुढें झाले. थोड्या वेळानें डॉक्टरसाहेब आंत आले. त्यांच्या मागून मल्हारी त्यांचीं औषधाची पेटी घेऊन आला.

" सलाम डॉक्टरसाहेब, " दाजीबा ह्मणाले, " आतां ही माझी शेवटची सलाम. "

" छे, छे ! दाजीसाहेब तुह्मी असा भलताच काय बोलतां ? " डॉक्टरसाहेब ह्मणाले. दाजीबांची आणि डॉक्टरसाहेबांचीं फार चांगली ओळख होती, हें वरील भाषणावरून वाचकांच्या लक्षांत येईलच ! क्षणभरानें डॉक्टर साहेबांनीं नाडी पाहून सर्व जखमा तपासल्या. परंतु जसजशा ते जखमा तपासूं लागले, तसतसा त्यांचा चेहरा बदलूं लागला. त्यांच्या चर्येवर निराशेचीं चिन्हें स्पष्टपणें उमटूं लागली. क्षणभरानें त्यांनीं सर्व मुलांना बाहेर जाण्यास सांगून आपली औषधांची पेटी उघडली. आणि शास्त्रीबुवांच्या साह्यानें जखमा बांधून औषध लावण्यास सुरवात केली. प्रत्येक जखम बांधतांना ज्या प्राणान्त वेदना होत होत्या, त्या दाजीबा अगदीं मुकाट्यानें सहन करीत होते.

" डॉक्टरसाहेब, अपायाला उपाय करणें योग्यच आहे परंतु ह्यापासून कांहीं उपयोग होईल असें मात्र मला वाटत नाहीं. माझी शक्ति आतां क्षीण होत चालली आहे, माझे प्राण आतां मध्यें ओढूं लागले आहेत. आतां माझें काय होणार हें मी समजून चुकलों आहे ! " दाजीबाच्या तोंडांतून निघणारें प्रत्येक वाक्य अगदीं खोल आणि अडखळेत असें निघत होतें !

" दाजीसाहेब, तुह्मी समजूतदार आहांत, तेव्हां आतां तुह्मीं पुढल्या व्यवस्थेला लागावें हें चांगलें असें मला वाटतें. " दुःखित स्वरानें शेवटीं डॉक्टर ह्मणाले.

" मला कांहीं सांगयचं आहे--" क्षणभर विचार करून दाजीबा ह्मणाले, " पण सांगण्यापेक्षां मी लिहून ठेवल्यास जास्त चांगलं ! मी कांहीं मृत्युपत्र केलं नाहीं. तेव्हां हें एक मृत्युपत्रच होईल. " असें ह्मणून त्यांनीं शास्त्रीबुवाकडे पाहिलें, " शास्त्रीबुवा, घेतां का मी सांगतों ती दोन अक्षरं लिहून ? डॉक्टरसाहेब आहेत तेव्हां ते माझ्या ह्या मृत्युपत्राला साक्षीदार होतीलच ! "

दाजीबांच्या इच्छेप्रमाणें शास्त्रीबुवांनीं बाहेर येऊन प्रभाकराजवळून लेखनसाहित्य आंत नेलें. त्यावेळीं दाजीबांच्या जवळ फक्त डॉक्टरसाहेब आणि शास्त्रीबुवाच होते. बाकी सर्व मंडळी बाहेर होती. सर्वत्र अगदीं शांतता होती. बाहेरच्या ओटीवर खांबाला टेकून प्रभाकर अश्रु गाळीत उभा होता. त्याच्या मनांत हजारों विचारांचें तुमुल युद्ध चाललें होतें. आतां आपलें कसें होणार ? ह्या एका प्रश्नावर त्याच्या मनांत चाललेल्या सर्व विचारांची गर्दी होती. शेवटीं ती भयाण रात्र संपण्याच्या बेतांत आली, इतक्यांत

दरवाजा उघडून शास्त्रीबुवा बाहेर आले आणि हताश स्थितींत अश्रू गाळीत बसलेल्या सावित्रीबाईकडे पाहून ह्मणाले, " तुम्ही सर्वजण आतां आंत या. "

तो समय दाजीबांचा प्राणन्त होण्याचा होता ! त्यांचा श्वास आतां मोठ्यानें होत होता ! ! डोळे खोल गेले होते ! ! ! मुलें आंत येतांच त्यांनीं एकदम रडण्यास आरंभ केला. परंतु डॉक्टर साहेबांनीं त्या सर्वांना दाबले. दाजीबानीं आपले निस्तेज आणि खोल जात चाललेले डोळे उघडले. ते बोलण्याचा प्रयत्न करीत होते परंतु त्यांना बोलवेना. सर्व मुलांवरून त्यांनीं आपली दृष्टि फिरविली आणि शेवटीं ती दृष्टि आपल्या पत्नीच्या मुखावर स्थीर केली. किंचित् काल त्यांनीं तिजकडे एकाग्रतेनें पाहिले व त्यांचे डोळे पाण्यानें भरून आले. नंतर त्यांनीं पुनः एकवार सर्व मुलांकडे आपल्या अश्रुयुक्त दृष्टीनें पाहिलें.

"इकडे ये--" त्यांनीं सावित्रीबाईला अगदीं जवळ बोलाविले " मी तुला उघडी टाकून जात आहे. ईश्वरावर भार ठेवा आणि सरळ वागा-प्रभाकराला अंतर देऊं नको-तो तुझा मुलगा नाहीं-पण माझा आहे-प्रभाकर, आपल्या आईला अंतर देऊं नकोस-लाडक्यांनों-मी आतां जातो-रडूं नका-देवा-माझ्या ह्या वासरांना सुखी-ठेव-"

प्रभाकरानें हुंदके देत आपल्या पित्याचें मस्तक वर उचलून धरलें. राधाआकानें तितक्यांतच देवघरांतून गंगाजल आणून प्रभाकराकडून तुळशीच्या पानानें तें दाजीबांच्या मुखांत घालविलें. तोंच सावित्रीबाईनें मोठ्यानें हंबरडा फोडला ! ! !

दाजीबांचा आत्मा नश्वर देह सोडून पंचमहाभूतांत जाऊन मिळाला ! सर्व घरांत एकच आकांत झाला ! ! !



# प्रकरण ५ वें.



## स्मशानयात्रा.



सूर्याची कोमल किरणें क्षितिजावर पसरली होती. हीच कोमल किरणें एका दिवसापूर्वी एका सुखी कुटुंबाला उत्साह आणि आनंद देत होती. परंतु एकाच दिवसांत ती स्थिति पालटली ! तींच किरणें आणि तेंच कुटुंब ! परंतु फरक इतकाच कीं, तीं किरणें मात्र कोमल होती आणि तें कुटुंब दु:खी होतें–उत्साहा ऐवजीं निरुत्साही होतें आणि आनंदा ऐवजीं शोकमग्न होतें. यावरून आजच्या दिवसावरून उद्याच्या दिवसाचें भविष्य सांगतां येत नाहीं असें ह्मणतात तें सर्वथैव खरें आहे.

प्रभाकर आंबराईच्या दरवाजाजवळ खांबाला टेकून उभा होता. तो उघड्या डोक्यानें असून दुःखातिशयानें त्याचा म्लान झालेला चेहरा काळवंडलेला दिसत होता. त्याच्या नेत्रांत आतां एकहि अश्रु दिसत नव्हता. त्याचा अश्रूंचा सर्व सांठा रात्रींच संपला होता. आतां तो स्मशानयात्रेकरितां जमणाऱ्या मंडळींची वाट पहात येथें उभा होता. त्यावेळीं तो इतका विचारांत चूर झाला होता कीं, आपणासमोर कोणी येऊन उभें राहिले हें देखील त्याला कळलें नाहीं !

" तुझ्या बापाला झालें काय ? हा प्रकार कसा घडला ? त्याची आतां काय स्थिति आहे ? "

प्रभाकरानें वर पाहिलें, तों भाऊसाहेब आपणापुढें उभे असून उत्कंठेनें आपणास एकावर एक प्रश्न विचारीत आहेत, असें त्याला दिसून आलें. त्यानें भाऊसाहेबाकडे पाहून एक दीर्घ श्वास सोडला व त्यांच्या सर्व प्रश्नाला एकच उत्तर दिलें.

" बाबा सकाळीं चार वाजतां वारले ! "

भाऊसाहेब एकदम दचकले.

" काय ! दाजी वारला ?–पण हें झालं कसं ? " भाऊसाहेब आश्चर्यानें ह्मणाले, " आतां मी उठलों तों पाहिली बातमी मला ही लागली. पण दाजी बैलाजवळ गेला कशाला ? "

" ते तुमच्याच घरीं शेतांतून येत होते, तेव्हां तुमच्या बैलानें त्यांच्यावर हल्ला—"

" पण केव्हां ? केव्हां येत होता ? "

" काल संध्याकाळीं. तुह्मीं काल निरोप सांगून गेल्यावर लागलेच बाबा घरीं आले. मी त्यांना तुमचा निरोप सांगतांच ते तसेच तुमच्याकडे जाण्याकरितां निघाले—तुह्मीं दिलेला निरोपच ह्या सर्व गोष्टीला कारण झाला!" हें शेवटचें वाक्य प्रभाकरानें मुद्दाम कपाळ आकुंचित करून भाऊसाहेबाच्या चेहऱ्याकडे पहात उच्चारलें.

भाऊसाहेबांचा चेहरा खर्रकन् उतरला. त्यांचें मन त्यांना खात होतें. आजपर्यंत त्यांनीं दाजीबाला पैशाच्या बाबतींत विनाकारण बरेच छळलें होतें. परंतु त्या छळाचें पर्यवसान इतकें भयंकर झालेलें पाहून त्यांचें निष्ठुर मन हाललें यांत मोठेसें नवल नाहीं. ते क्षणभरानें दुःखित स्वरानें ह्मणाले, " झाला हा प्रकार फारच वाईट झाला ! मला फार वाईट वाटतें. परंतु आतां शेतवाडीचें कसें होईल ? तुमचा आतां कसा निभाव लागेल ? "

" हाच एक विचार मरणापूर्वी बाबांना एकसारखा अस्वस्थ करीत होता. तुम्हीं जर थोडी दया दाखविली, तर अद्यापि आमचा ह्या शेतवाडीवर गुजारा होईल पण तुम्हीं आपला निष्ठुरपणा कधींहि सोडणार नाहीं असेंच बाबा ह्मणत होते–"

" माझा निष्ठुरपणा ! " प्रभाकराकडे टक लावून पहात भाऊसाहेब ह्मणाले, " माझा यांत कांहींच निष्ठुरपणा नाहीं. उलट त्याचाच गर्विष्ठपणा होय. माझी एक पै देखील देणें नाहीं असें समजून तो मजबरोबर मोठ्या गर्विष्ठपणानें वागत होता. पण आतां काय त्याचं ! तो तर मेला. तुला पोराला हा व्यवहार काय कळणार आहे ? " असें ह्मणून ते क्षणभर थांबले, " तुझ्या आईला सांग कीं, इतक्यांतच ह्या गोष्टीविषयीं तुला काळजी करण्याचें कारण नाहीं. मी पुढें केव्हांतरी येईन तेव्हां मग त्याचा विचार करूं. आणि हें पहा प्रभाकर, तुह्माला एखाद्या गोष्टीची जरूरी असेल तर मला येऊन कळवा. मी त्याची व्यवस्था करीन. काय समजलास ?—जातो मी आतां. "

भाऊसाहेब निघून गेल्यावर प्रभाकराचें निरुत्साही विचारयंत्र पुनः सुरू झालें. तो पुनः खांबाला टेंकून उभा राहिला. आपण आतां अगदीं पोरके झालों, असें त्याला वाटूं लागलें. सापत्न मातेनें—सावित्रीबाईनें त्याच्या खऱ्या मातेची जागा भरून काढली होती, तरी त्यांत खरें मातृप्रेम नव्हतें. नैसर्गिक नियमाला अनुसरून तिच्या प्रेमाचा ओढा मधुकर आणि कमला यांच्याकडे जास्त होता यांत नवल नाहीं. परंतु त्याबद्दल आजपर्यंत प्रभाकराला कांहींच वाटलें नाहीं. कारण मातृप्रेमाची रिकामी जागा दाजीबानें भरून काढली होती. ते प्रभाकरावर फारच प्रेम करीत असत. परंतु आतां काय ?—तेहि गेले !

इतक्यांत प्रभाकराची दृष्टि समोर गेली. एक अकरा वर्षांची मुलगी झप्झप् पावलें टाकीत व मधुन मधुन मागें वळून पहात येतांना त्याच्या दृष्टीस पडली. तिचा परकर फाटका असून अंगांतील चोळी मळकट दिसत होती. ती वयानें लहान होती आणि तिचें कपडे जरी मलीन होते, तरी त्यांतूनहि तिचें नैसर्गिक सौंदर्य प्रगट होत होतें. ती अत्यंत देखणी होती. बांध्यानें ती सडपातळ व नाजुक असून किंचित् अशक्त दिसत होती. सांप्रत तिचा चेहरा निस्तेज आणि भयाभीत झालेला दिसत होता. वाचकहो, ही मुलगी तुमच्या परिचयाची आहे. मागच्या एका प्रकरणांत तुम्हीं हिला पाहिली असून दोनचारदां तिचा गोष्टीशीं संबंधहि आला आहे. ती यशवंताची धाकटी बहिण कृष्णा होती. पण ती इतक्या सकाळींच अशी भीत भीत पण लगबगीनें कुणीकडे निघाली ? ती आतां प्रभाकराच्या बरीच जवळ आली. तो तिच्याकडे एक सारखी दृष्टि लावून पहात होता. ती अगदीं जवळ आल्यावर प्रभाकराला तिनें एकदम उत्कंठेनें विचारलें, " प्रभाकरदादा, आतां दाजीबांचं कसं आहे ? त्यांना त्या दुष्ट बैलानें फार मारलं कां रे ? आह्माला कालरात्रीं गवळ्यानें येऊन सांगितलं, तेव्हांपासून मला कांहीं सुचत नाहीं. मी येथें येण्याचा रात्रींतून कितीदां तरी विचार केला, पण बाहेर काळोख असल्यामुळें तशा भयाणरात्रीं घराबाहेर पडण्याचा माझा धीरच होईना ! दोनतिनदां दुर्गाताई रात्रींतून उठली होती. तिनें मला जागींच पाहून मी झोंपत का नाहीं ह्मणून विचारलें. शेवटीं मला झोंप न येण्याचें कारण मी तिला सांगितलें तेव्हां किनई प्रभाकर, ती ह्मणाली, " तंगडं मोडीन तिकडे गेलीस तर. तिकडे जाण्याचं कांहीं कारण नाहीं. " तरी देखील माझा जीव राहिना. मी अगदीं पहाटेस उठले आणि सगुणाआत्याजवळ गेले. प्रभाकर,

सगुणाआत्याला ही दाजीबांची गोष्ट ऐकून किती वाईट वाटत आहे ह्मणून सांगूं! त्या मेल्या बैलाला ' विका ' ' विका ' ह्मणून तिनें कितीदांतरी भाऊसाहेबांना सांगितलं. पण तिचं काय चालतं आहे घरांत? तिचं कोणी ऐकेल तेव्हांना! पण प्रभाकर, तूं असा गप्प कां?"

बालिकेनें एका दमांत सर्व गोष्टी भराभर सांगून टाकल्या. प्रभाकर तिच्या मुखाकडे पहात मुकाट्यानें सर्व गोष्टी ऐकत होता. तितक्या वेळेपुरतें तो आपलें दुःख जवळ जवळ साफ विसरून गेला होता. परंतु बालिकेच्या शेवटच्या वाक्यानें त्याचें दुःखी मन पुनः जागृत झालें. त्यान एक दीर्घ श्वास सोडला. त्याच्या डोळ्यांत अश्रू आले. त्याला एक दुःखाचा हुंदका आला, त्या हुंदक्यांतच तो ह्मणाला " कृष्णा, बाबा वारले!"

अरेरे! त्या बालिकेला जबरदस्त धक्का बसला. तिचा चेहरा एकदम निस्तेज पडला. तिचा सुकुमार देह थरथर कापूं लागला. ती हुंदके देत देत ह्मणाली, ' प्रभाकर, आतां तुझं कसंरे होईल?—दाजीबांचा स्वभाव कितीतरी चांगला! यशवंतावर आणि माझ्यावर त्यांचा कितीतरी लोभ!" इतक्यांत प्रभाकराला बोलाविण्याकरितां मल्हारी बाहेर आला. तेव्हां प्रभाकर म्हणाला, " कृष्णा, आतां तूं परत जा. तूं येथें आली होतीस असें कळलें तर दुर्गाताई—"

" पण एकवेळ मला दाजीबांना पाहूंतरी देरे प्रभाकर! आतां ते पुनः कधीं दृष्टीस पडणार आहेत?" रडत रडत हुंदके देत करूण वाणीनें ती बालिका म्हणाली.

ते आंत गेले. हळूहळूं मंडळी बाहेर जमा होऊं लागली. आठ वाजण्याच्या सुमाराला पोलिसचा शिपाई येऊन चौकशी करूं लागला. आतां मात्र भाऊसाहेबांच्या बैलानें दाजीबांना ठार मारलें ही बातमी सर्व गांवभर झाली. जो तो दाजीबांच्या मृत्युविषयीं हळहळूं लागला. दहाच्या सुमाराला तेथें पंचनामा झाला. त्यांत ' दाजीबांचा मृत्यु अपघातानें झाला ' असा पंचानीं निकाल देऊन भाऊसाहेबांचा बैल सरकारांत जप्त करून नेला.

बारा वाजून गेल्यावर सर्व तयारी झाली. दाजीबांचा छिन्नभिन्न झालेला मृतदेह बाहेर आणला. वाचकहो! त्यावेळच्या आकांताचें वर्णन कोण करूं शकेल?

दाजीबांच्या स्मशानयात्रेला पुष्कळच मंडळी जमली होती.

# प्रकरण ६ वें.

## मृत्युपत्राचें वाचन.





वरील गोष्टीला आज तेरा दिवस झाले. दाजीबांच्या घरीं—दाजीबांच्या घरीं ह्मणण्यापेक्षां आतां आपण प्रभाकराच्याच घरीं असें ह्मणूं. आज प्रभाकराच्या घरीं सायंकाळीं बरीच मंडळी जमली होती. रीतीप्रमाणें मंडळीनीं प्रभाकराला आणि मधुकराला शेजारच्या एका देवळांत नेऊन आणले होते. त्या दोघां मुलांना परत घरीं आणल्यावर मंडळी परत जाऊं लागली. तेव्हां केशवशास्त्री पुढें होऊन ह्मणाले, " मंडळीनीं आणखी पांच मिनिटें थांबण्याची कृपा करावी. दाजीबांची एक शेवटची इच्छा आहे. ती आपणांसर्वांच्या कानावर आजच मी घालावी अशी त्यांनीं मरणापूर्वी मला आग्रहाची विनंति केली होती. आज आपण येथें जमला आहांत—भाऊसाहेब आहेत, शिवाय दाजीबांच्या शेतांत काम करणारी ही सर्व शेतकरी मंडळीहि आहे. तेव्हां त्यांची शेवटची इच्छा आपण ऐकावी अशी माझी आपणांस विनंति आहे. "

सर्व मंडळी पुनः ओटीवर येऊन बसली. शास्त्रीबुवा आंत गेले आणि त्यांनीं आपल्या हातांत एक कागदाची घडी आणली. ती घडी उघडून शास्त्रीबुवा ह्मणाले, " आतां मी आपणांस इतकंच सांगतों कीं, ह्या कागदावर लिहिलेलें प्रत्येक अक्षर दाजीबांच्या मुखांतून बाहेर पडलेलें आहे. "

" मग हें दाजीनें मृत्युपत्र आहे कीं काय ?" भाऊसाहेब घसा साफ करीत ह्मणाले.

" आपणास वाटेल तर आपण ह्याला मृत्युपत्र म्हणा ! किंवा वाटेल तें ह्मणा ! परंतु त्यांनीं मरणापूर्वी सांगितलेला प्रत्येक शब्द मी यांत लिहिला आहे. शिवाय आपल्या हॉस्पिटलचे डॉक्टरसाहेब ह्या गोष्टीला साक्षीदार आहेत. "

ह्यावर कोणीहि बोललें नाहीं. प्रत्येकजण त्या कागदांत काय लिहिलें आहे, तें ऐकण्यास अत्यंत उत्सुक झाला होता. कोणीहि बोलत नाहीं असें पाहून शास्त्रीबुवांनीं हातांतील घडी उघडून वाचण्यास सुरुवात केली.

"मी—सदाशिव त्रिंबक सरदेसाई ह्या पत्रांत—पत्रांत ह्मणण्यापेक्षां मृत्युपत्रांत ईश्वराला स्मरून ज्यांच्याविषयीं हें लिहित आहें, त्याचा त्यांनीं विचार करावा व त्याप्रमाणें सत्याला स्मरून वागावें ह्मणजे त्यांत त्यांचें कल्याण आहे. हे शब्द माझ्या अंतःकरणापासून खऱ्या कळकळीनें त्या मृत्युशय्येवर मी हताश स्थितींत पडलों असतां निघत आहेत, हें त्यांनीं लक्षांत ठेवावें.

"माझ्या संसाराची घडी आतां चांगल्या रीतीनें बसण्याचा योग आला होता, तोंच बळवंतरावाच्या बैलानें माझा सर्वस्वी नाश केला. मला हा अकल्पित मृत्यु आल्याबद्दल वाईट वाटत नाहीं. कारण मी मरावें अशीच त्या प्रभूची इच्छा दिसते. परंतु आतां माझ्या जिवाला जी एक भयंकर तळमळ लागली आहे, ती माझ्या कुटुंबाविषयीं होय. माझ्या बायकोमुलांकरितां मला हा वेळपर्यंत कांहीं एक तर्तूद करून ठेवतां आली नाहीं. यंदांप्रमाणें पुढें एक दोन वर्षें चांगला पाऊस पडून पीक चांगलें येईल ह्मणजे आपण बळवंतरावाच्या मगरमिठींतून सुटूं आणि मग मुलाबाळांची योग्य व्यवस्था करून ठेऊं अशी मला कितीतरी आशा होती. पण आतां काय ?—बळवंतरावाच्या बैलानें माझा सर्वस्वी नाश केला.

"आज बारा वर्षें झालीं, दादासाहेब देशमुख निर्वतल्यापासून विनाकारण बळवंतरावाच्या हातांत माझी मान अडकली गेली. माझ्या वडिलांच्या हयातींत सतत सहा वर्षें अवर्षण पडल्यामुळें त्यांनीं ही सर्व शेतजमीन, आंबराई आणि घर दादासाहेब देशमुखाकडे सात हजार रुपयांला गहाण ठेविलें. पुढें त्यांच्या मृत्यूनंतर चार वर्षें मी स्वतःच खपून व्याजासुद्धां एक हजाराची फेड केली. दादासाहेब देशमुखाचे वडील चिरंजीव यशवंतराव यांचा आणि माझा फारच स्नेह होता. यशवंतराव जर आतां हयात असते तर मी ह्या सांप्रतच्या शोचनीय स्थितींत कधींहि नसतों अशी माझी पूर्ण खात्री आहे. ते आणि मी एके दिवशीं कातळावर फिरावयास गेलों असतां तेथें असलेले काळे दगड पाहून 'तुह्मी येथें दगडाची खाण खणा, ही कातळ तुमच्या मालकीची आहे तेव्हां तुह्माला

पुष्कळ फायदा होईल’ असें त्यांस सांगून नबाबसाहेब नवीन वसवीत असलेल्या फुलशहरांत त्या काळ्या दगडांचा इमारतीकरितां दांडगा खप होईल इत्यादि गोष्टी मी त्यांच्या मनांत भरवून दिल्या. यशवंतरावांना त्या गोष्टी पटून त्यांनीं आपल्या वडिलांजवळ खाण खणण्याची गोष्ट काढली. परंतु त्यांत कांहीं फायदा होईल असें त्यांस वाटेना इतकेंच नव्हे, तर मुलानें खाणीचें भलतेंच वेड घेतल्याबद्दल दादासाहेब त्यांना फार टाकून बोलले. यशवंतरावांचा स्वभाव बापासारखा करारी असल्यामुळें ते तत्काळ वडिलांवर रागावून घर सोडून निघाले. पुढें दादासाहेबांना आपल्या बोलण्याचा पश्चात्ताप झाला. व मुलानें परत यावें ह्मणून माझ्या देखरेखीखालीं त्यांनीं कातळावर खाण सुरू केली.

“ पहिल्याच वर्षांत त्यांना तीन हजार रुपये फायदा झाला. त्या माझ्या कामाबद्दल ते मला स्वसंतोषानें कांहींतरी देत असत. पुढें त्याच वर्षी दादासाहेबांचें दुसरे चिरंजीव गंगाधरपंत प्रकृति नादुरुस्त असल्यामुळें पुण्यास गेले होते, ते एकाएकीं निवर्तले. ह्या मुलाच्या धक्क्यामुळें दादासाहेब आजारी पडले. तोंच आठ दिवसांनीं त्यांची सून–गंगाधरपंताची बायको बाळंतपणांत एकाएकीं मेल्याची बातमी येथें आली. त्यामुळें दादासाहेबांचें दुखणें बळावून सहाव्या दिवशीं त्यांचा अंत झाला. आतां मी ज्याप्रमाणें ह्या मृत्युशय्येवर पडलों आहें, त्याच प्रमाणें त्यावेळीं दादासाहेब मृत्युशय्येवर पडले होते. ती त्यांची शेवटची रात्र होती. मी त्यांच्या समाचाराला गेलों होतों, त्यावेळीं यशवंतरावाची आठवण करून त्यांच्या नेत्रावाटे अश्रूपूर लोटला. आपल्या मुलानें आपणांजवळ फारच फायदेशीर अशा खाणीची गोष्ट काढली असतां आपण त्यास झिडकारलें, टाकून बोललों त्याबद्दल त्यांना फारच वाईट वाटत होतें. शेवटीं त्यांच्या खाणीमध्यें मी कशी अंगमेहनत केली, आणि खाण रंगारूपास येण्याकरितां मीं केलेले सर्व श्रम लक्षांत घेऊन त्यांनीं माझे वडिलांचें सर्व कर्ज मला माफ केलें. ते ह्मणाले, ‘ दाजी, हें कर्ज मी तुला माफ करीत आहें, हें कशाचें फळ आहे असें तुला वाटतें ? ’ मी त्यांना काय उत्तर देणार ? पुढें तेच ह्मणाले, ‘ दाजी, हें तुझ्या सद्वर्तनाचें, सचोटीचें आणि सत्यप्रियतेचें फळ आहे. जा, त्या घडवंचींतील तुझा करारकर्जनामा घेऊन ये आणि आपल्या हातानें फाडून टाक ! ’ मी मुकाट्यानें उठलों आणि घडवंची उघडली परंतु त्यांत तो कर्जरोखा नव्हता. तेव्हां ते पुढें ह्मणाले, “ नाहीं का त्याच्यांत ? मग बळवंतरावानें काढून ठेवला असेल. बरं–तूं आतां कर्जाची काळजी करूं नकोस. आतां जांवई आले, कीं, प्रथम तो तुझा

कर्जरोखा मी त्यांच्याकडून मागून घेऊन फाडून टाकतों.'' हे दादासाहेबांचे शब्द अद्यापि जसेच्या तसे माझ्या कानांत गुणगुणत आहेत. मी सत्याला स्मरून ह्या मृत्युशय्येवर पडलों असतां 'माझें सर्व कर्ज दादासाहेबांनीं माफ केलें आहे' हें त्रिवार सत्यतेनें सांगतों. पुढें त्यांचा मृत्यु झाल्यावर आठ दिवसांनीं मी ही हकीकत बळवंतरावाला सांगितली. तेव्हां तो आश्चर्यचकित होऊन ह्मणाला, 'दाजी, अशी गोष्ट कशी होईल ? उलट मरणापूर्वी दादासाहेब मला ह्मणाले, कीं, 'बळवंतराव, ती दाजीकडे रक्कम गुंतली आहे आणि तिचें व्याजहि चढत चाललें आहे, त्याची लवकर वसुली करण्याची व्यवस्था करा.' परंतु हें बळवंतरावानें मला निव्वळ फसविलें. दादासाहेबांनीं त्याला कर्जरोखा फाडून टाकण्यास सांगितला असेल परंतु त्यानें तसें न करतां तो कर्जरोखा तसाच कायम ठेवला. असो. त्याचें पाप त्याच्याबरोबर. परंतु आज मी ही खरी खरी हकीकत लिहीत आहें. त्या कर्जामुळेंच आजपर्यंत मला ह्या दुष्काळाच्या दिवसांत डोकें वर करतां आलें नाहीं. माझा सर्वस्वी नाश होण्यास तोच कारण आहे.

'' पुढें त्यानें व्याज वाढविलें. दुष्काळांत पिक नसतांहि त्यानें पैशाकरितां मला अनेक रीतीनें छळलें. माझी वडिलोपार्जित शेतजमीन मजकडून काढून घेण्यास त्यानें आजपर्यंत अनेक उपाय योजले परंतु माझ्या चोख आणि सरळ वर्तनामुळें त्याचा कांहींच इलाज चालला नाहीं. आतां त्या कर्जापोटीं पांच हजार रुपये बाकी आहे. मी आणखी दोन वर्षें जगलों असतों तर त्याची पैन् पै फेडून त्याच्या कचाट्यांतून मोकळा झालों असतों. पण ईश्वरी नियमानियम कांहीं निराळा आहे. आतां माझ्या मागें तो माझ्या बायकोला व माझ्या लाडक्या मुलांना छळण्यास कमी करणार नाहीं. कदाचित् माझ्या वाडवडिलांच्या ह्या घरांतून त्या पैशाकरितां तो माझ्या मुलाबाळांना हांकून देखील देईल. कारण माझ्या घरादारावर आणि शेतजमिनीवर त्याच्या पूर्वीपासून डोळा आहे.

'' प्रभाकर, तूं माझा मोठा मुलगा, तुझ्यावर माझा सर्व भार आहे. तूं आपलें वर्तन नेहमीं चोख ठेव. सदाचरणाची कास कधींहि सोडूं नकोस. आपल्या आईच्या आज्ञेशिवाय कांहीं करूं नकोस. ती फार विचारी आहे, याचा मला वेळोवेळीं अनुभव आला आहे. तिच्या विचारानें वागत गेल्यास तुला पश्चात्ताप करण्याची कधींही पाळी येणार नाहीं. आतां तुला इतकेंच सांगावयाचें कीं, आपली वाडवडिलांची ही शेतजमीन आणि

हें घरवाडी वाटेल ती अंग मेहनत करावी लागली तरी कर पण बळवंतरावाच्या हातीं जाऊं देऊं नकोस. आणि आपल्या धाकट्या भावंडांना कधींहि अंतर देऊं नकोस. मी तुमच्यापासून दूर झालों, तरी तुमच्या हातून होणारीं बरी वाईट कृत्यें पहात आहें, हें सदैव लक्षांत बाळगा. तुमच्या हातून वाईट कृति झाल्यास माझ्या आत्म्याला दुःख होईल, आणि चांगली कृति झाल्यास आनंदच होत जाईल हें कधींहि विसरूं नका.

"यंदाचें पीक चांगलें आलें आहे. त्यांतून मी तिनशें रुपयाचें नुकतेंच खत खरेदी केलें आहे. बाकीची रक्कम बळवंतरावास त्याच्या कर्जाच्या आणि व्याजाच्या पोटीं द्या. त्यानें नच ऐकल्यास आंबराईचें येणारें उत्पन्न त्याला द्या. नाहींतर त्या पैशांतून आपली अर्धी खणावयाची पडलेली विहीर पूर्ण करून आंबराईची दुरुस्ती करा. खत आणि मुबलक पाणी याची जोड मिळाल्यास आंबराईचें एक दोन वर्षांत चांगलें उत्पन्न होईल अशी माझी खात्री आहे. शिवाय पुढें दोन वर्षें ह्या सालाप्रमाणें पाऊस पडला तर शेताचेंहि उत्पन्न सोळा आणे होईल. अशा रीतीनें हीं दोन्ही उत्पन्नें करून दोन वर्षांत तुम्हाला ह्या बळवंतरावाच्या हातांत मी निरुपायानें दिलेली तुमची मान तुम्हाला सहज सोडवितां येईल.

"शेवटीं इतकेंहि करून कर्जाकरितां माझ्या कच्याबच्यांना बळवंतरावानें रस्त्यावर आणून सोडलें तर शास्त्रीबुवा ! तुम्हीं, सुभानजी पाटील, रंगोपंत तात्या इत्यादि मंडळींनीं माझे उपकार स्मरून त्यांना अंतर देऊं नका. माझी मुलें लहान आहेत, त्यांना सांभाळा बस !—आतां मला जास्त कांहींच सांगावयाचें नाहीं. ईश्वर तुमचें सर्वांचें कल्याण करो."

शास्त्रीबुवांनीं मृत्युपत्राचें वाचन आटोपलें. ओटीवर बसलेली सर्व मंडळी एकाग्र चित्तानें प्रत्येक शब्द ऐकत होती. आजपर्यंत दाजीबा आणि भाऊसाहेब यांच्यामध्यें देवघेवीचा कांहीं संबंध असेल, असें कोणालाही माहिती नव्हतें. मृत्युपत्राचें वाचन होत असतां मधून मधून भाऊसाहेबांची चर्या बदलत होती. परंतु त्यांनीं आपली स्थिति कोणाच्याहि नजरेस येऊं दिली नाहीं. वाचन आटोपतांच क्षणभर अगदीं शांतता होती. प्रथम भाऊसाहेब बोलतील असेंच प्रत्येकाला वाटत होतें. परंतु ते कांहीं बोलत नाहींत असें पाहून सुभानजी पाटील ह्मणाला, "दाजीसाहेबांच्या घराण्याला जी जी मदत पाहिजे असेल व जी जी मदत मला माझ्या शक्तीप्रमाणें देतां येईल, ती मोठ्या आनं-

दानें मी देईन. एका काळीं त्यांचे माझ्यावर मोठे उपकार झाले आहेत, त्या उपकारांचा त्या थोर मनुष्यानें कधींहि एका शब्दानें उच्चार केला नाहीं. परंतु अगदीं शेवटीं मरतांना नाइलाजास्तव त्यांनीं आह्मांला आठवण दिली. ती दिली नसती तरी त्याच्या कुटुंबाला मदत करणें हें मी माझें मुख्य कर्तव्य समजतों. प्रभाकर सध्यां लहान आहे तेव्हां त्यांच्या शेतजमिनीची व आंबराईची देखरेख निरपेक्ष आणि निस्वार्थ बुद्धीनें करण्याची कामगिरी मी आपल्या शिरावर घेतों."

"आतां मला कांहीं तरी बोललें पाहिजे," शांत आणि सभ्यपणाचा आव घालून भाऊसाहेब ह्मणाले, "परंतु काय बोलावें हेंच मला कळत नाहीं. दाजीनें मजविषयीं जें कांहीं लिहून ठेविलें आहे, तें त्याच्या स्वभावामुळें त्याला तसें वाटून लिहून ठेविलें आहे. आतां माझ्या भाषणाची सत्यता कशी पटेल? ती सत्यता पटविण्याकरितां मी आतां इतकेंच सांगतों कीं, मी त्याच्या मुलाबाळांना आतांच घरांतून काढून टाकित नाहीं. कायद्यानें मला केव्हांहि तसें करतां येण्यासारखें असलें तरी मी तो लिहितो तसा नाहीं. याची सत्यता पटवून देण्याकरितां आणखी दोन नव्हे तीन वर्षें माझ्या रकमेवर होणाऱ्या व्याजाची मी मागणी करणार नाहीं. दाजीच्या मतें ह्या पुढल्या दोन वर्षांत कर्ज फिटेल अशी खात्री होती, ह्मणूनच मी ही दोन सोडून तीन वर्षांची जास्त सवलत देत आहें. माझ्याविषयीं त्यानें हा कमीजास्त प्रकार लिहून ठेविला आहे, त्याबद्दल मी त्याला बिलकुल दोष देत नाहीं. तो तर बिचारा गेला! परंतु हा एक मनुष्यस्वभाव आहे." असें ह्मणून भाऊसाहेब क्षणभर थांबले व पुनः पुढें ह्मणाले, "सुभानजी, उद्यां तूं मुद्दाम दुपारीं येथें ये. मीहि येईन मग आपण स्वस्थ चित्तानें पुढल्या गोष्टीचा विचार करूं. मी मनापासून सांगतों कीं, दाजीविषयीं माझें मत केव्हांहि वाईट नव्हतें. त्यानें माझें केव्हांहि ऐकलें नाहीं त्याला माझा नाइलाज होता. आतां त्याच्या कुटुंबावर प्रसंग आला आहे तेव्हां त्याचें कल्याण करण्यास मी बिलकुल कसूर करणार नाहीं"

ह्या शेवटच्या भाषणानें भाऊसाहेबांनीं आपल्या वर्तनावर पांघरूण घालण्याचा सोळा आणे घाट जुळवून आणला. परंतु तो कितपत सिद्धीस गेला हें आतां पाहणें आहे.

हळुहळू सर्व मंडळी आपआपल्या घरीं गेली.

---

# प्रकरण ७ वें.



## पूर्व वृत्तांत.





गेल्या सर्व प्रकरणांत बळवंतराव उर्फ भाऊसाहेब यांचें नांव मुख्यत्वेंकरून येत गेलें आहे. तेव्हां आतां त्यांच्या बरोबर वाचकांची ओळख करून देणें अवश्य आहे. परंतु ही ओळख करून देण्यापूर्वी आपणास बराच काल मागें जावें लागणार आहे.

जंजिरा संस्थानाचे अधिपति नबाबसाहेब सिद्दी अहमदखान सिद्दी इब्राहिमखान यांच्या ताब्यांतील राजपुरी गांवाच्या वेशीवर प्रस्तुत कथानकाची भूमिका-देशमुखवाडी असून तेथील देशमुखीचें वतन दादासादेब देशमुख यांच्याकडे होतें. दादासाहेबांचा स्वभाव फारच करारी आणि लहरी होता. सर्व गांवांत त्याचा फार दरारा असे. त्यांना तीन मुलें होती. मोठ्या मुलाचें नांव यशवंतराव, दुसऱ्या मुलाचें नांव गंगाधर आणि तिसरी मुलगी हिचें नांव ताई ऊर्फ सगुणाबाई होतें. ह्या मुलीच्या मागून आणखी एक मुलगी झाली होती परंतु ती देवींत गेली, आणि दोन महिन्यांनीं दादासाहेबांच्या कुटुंबाला जलोदर होऊन त्यांतच तिचा अंत झाला. त्यानंतर दादासाहेबांनीं द्वितीय संबंध मात्र केला नाहीं.

यशवंतरावाचा स्वभाव थेट आपल्या वडिलांसारखा होता. पहिल्यापासून त्याचें लक्ष शरीर कमविण्याकडे विशेष होतें. शिवाय त्याला गाण्याचा फारच नाद होता. मुळांत आवाज मधुर असल्यामुळें आणि चांगल्या गवई शिक्षकाची जोड मिळाल्यामुळें लवकरच पेहलवान आणि गवई ह्या दोन नांवांनीं यशवंतरावाला मंडळी ओळखूं लागली. तो इतका नादी होता कीं, सकाळ, दुपार आणि संध्याकाळ केव्हांहि पहावें तेव्हां यशवंतराव तालीमखान्यांत पडलेला. तेवढ्याकरितां त्यानें देशमुखवाडीजवळ एक आखाडा तयार करून घेतला होता. त्याच्या वयाची गांवांतील बरीच मंडळी तेथें रोज एकत्र जमत असत. त्यांत दाजीबाहि येत असत. त्या सर्व मंडळींत यशवंतरावाची दाजी-

बाबरोबर विशेष मैत्री होती. यशवंतराव सोळा वर्षांचा झाला तेव्हां त्याच्या वडिलांनीं त्याचें लग्न करण्याचा बेत केला. परंतु त्यावेळीं त्याचें लक्ष खेळाकडे आणि विशेष आखाड्यांत गुंतलें असल्यामुळें, आपणास इतक्यांतच लग्न कर्तव्य नाहीं, असें त्यानें वडिलांस स्पष्टपणें सांगितलें. परंतु मुलाचें लवकर लग्न करावें अशी दादासाहेब व माई-साहेब यांची इच्छा असल्यामुळें ते मुलीच्या शोधाला लागले. आपणाकरितां मुलीचा शोध चालू आहे असें यशवंतरावांस कळतांच त्यानें आपल्या मातुश्रीची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. परंतु ती ऐकेना. तेव्हां तो दादासाहेबांजवळ गेला आणि इतक्या लवकर आपली लग्न करण्याची इच्छा नाहीं, असें त्यानें वडिलांस कळविलें. आपल्या मताविरुद्ध मुलगा जात आहे असें पाहून दादासाहेब हट्टाला पेटले. यशवंत-रावहि वडिलांचीच प्रतिमा! तो देखील हट्टाला पेटला. व शेवटीं त्यानें आपल्या वडि-लांच्या समोर त्यांच्याच पायाची शपथ घेऊन ‘ मी कधींहि लग्न करणार नाहीं. आजन्म अविवाहित राहीन अशी ’ भीष्म प्रतिज्ञा केली! त्यावेळपासून दादासाहेबांची त्याच्या-वर इतराजी झाली.

बरींच वर्षें लोटलीं. पुढें गेल्या प्रकरणांत दाजीबांच्या मृत्युपत्रांत उल्लेख केल्याप्रमाणें तो आणि दाजीबा एके दिवशीं समुद्र किनाऱ्यावर फिरावयास गेले होते. तेथें त्या दोघां मित्रांत भाषण होऊन दाजीबाच्या सांगण्यावरून कातळांत दगडाची खाण चालू करावी असें यशवंतरावास वाटूं लागलें. त्यानें घरीं आल्यावर दादासाहेबांची खाण चालू कर-ण्यास परवानगी मागितली परंतु लग्नाच्या बाबतीमुळें त्याच्यावर इतराजी झालेली अस-ल्यामुळें मुलाच्या बोलण्याकडे दादासाहेबांनीं दुर्लक्ष केलें इतकेंच नव्हे तर ‘ दोनदां स्वस्थ खाऊनपिऊन पोळासारखा असतोस आणि हे रिकामे उद्योग करतोस ’ इत्यादि कटुशब्दांनीं त्याचें मन दुखविलें. त्याबरोबर रागाच्या भरांत यशवंतरावानें घर सोडलें. त्यावेळीं त्याचें वय एकोणतीस–तीस वर्षांचें होतें. मुलगा दोनचार दिवसांत परत येईल असें प्रथम दादासाहेबांस वाटलें परंतु आठ दहा दिवस त्याचा पत्ता लागेना, असें पाहून त्यांनीं दाजीबाला बोलावून मुलाच्या इच्छेप्रमाणें तो परत यावा म्हणून मोठ्या झपाट्यानें कातळावर खाण सुरू केली.

एक महिना लोटला. यशवंतराव परत येण्याचें चिन्ह दिसेना. तों एके दिवशीं

काळकाईच्या खोऱ्यावरील एक मनुष्य कामानिमित्त देशमुखवाडींत आला. त्यानें ' आज आठ दिवस काळकाईच्या देवळांत बाळासाहेब–यशवंतराव–पुजाऱ्याकडे वस्ती करून आहेत ' अशी बातमी आणिली. ही बातमी कळतांच दुसऱ्या दिवशीं दादासाहेबांनीं यशवंतरावाची समजूत करून त्यास परत आणण्याकरितां दोन मनुष्यें आणि गाडी पाठविली.

काळकाईचा खोरा हें बंदर देशमुखवाडीपासून आठ मैल दूर असून अतिशयच वाईट आहे. ह्या बंदरापासून जवळजवळ मैलाच्या अंतरावर पाण्यांत जंजिऱ्याचा प्रसिद्ध किल्ला आहे. ह्या किल्ल्याच्या बाजूनेंच बोटी, पडाव, मचवे आणि होड्या यांचा बंदरांत येण्याचा रस्ता आहे, परंतु वर्षाकालांत ह्या जलमार्ग फारच धोक्याचा असतो. आह्मी ज्या वेळच्या प्रसंगाचें हें वर्णन लिहीत आहोंत, तो वर्षाकाळच होता. समुद्राचें पाणी ह्या दिवसांत फारच तुफान असतें. आठ दिवसांतून एखाद दुसरा मालाचा मचवा किंवा होडी बुडाली नाहीं, असा आठवडा क्वचित्च जात असे. दादासाहेबांनीं आपल्या मुलाला समजूत घालून परत घरीं आणण्याकरितां मनुष्य पाठविले, त्याच दिवशीं जंजिऱ्याच्या किल्ल्यापासून दोन मैलांच्या अंतरावर पाण्यांत असलेल्या कासा किल्ल्याजवळ तुफानांत सांपडून एक उतारूंचा मोठा मचवा बुडाल्याची बातमी बंदरांत आली होती. त्याच मचव्यांतून यशवंतराव मुंबईत जाण्याकरितां निघाला होता.

पुष्कळ शोध केला परंतु यशवंतरावाचा पत्ता लागला नाहीं ! आपल्या मुलाच्या मृत्यूला आपणच कारण झालों हे विचार मरेपर्यंत दादासाहेबांच्या मनाला सारखे डंवचत होते !

मोठ्या मुलानें लग्न न करितां आपला हेका पुरा केला तेव्हां खालच्या दोन मुलांच्या लग्नाची गोष्ट लांबणीवर पडली. दादासाहेब अगदीं नाउमेद झाले. शेवटीं ताई–सगुणा–ही तेरा वर्षांची झाली तेव्हां नाइलाजास्तव गांवांतीलच एक सधन मनुष्य पाहून त्याच्या मुलाबरोबर–बळवंतरावाबरोबर तिचें लग्न करून टाकलें. गंगाधराचें मात्र त्या वर्षी कोठें जमलें नाहीं. नाहीं तर दोन्हीं लग्नें एकदमच करून टाकण्याचा त्यांचा विचार होता. शेवटीं सहा महिन्यांनीं त्यांचेंहि जमलें. तत्काळ गंगाधराचेंहि त्यांनीं लग्न केलें. व सून घरांत आणिली. सगुणाबाईच्या सासरची मंडळी ह्मणजे सासू, एक नणंद आणि पतिराज इतकींच होतीं. पुढें सासू चार वर्षांनीं निवर्तली आणि नणंद–दुर्गाताई–हिला एकाएकीं वैधव्य प्राप्त होऊन ती आपल्या भावाच्या आश्रयाला येऊन राहिली.

गंगाधराच्या सासुरवाडीची मंडळी बरीच होती. सासू, सासरा, दोन मेहुणे, तीन मेहुण्या, मुलीच्या आईचा मामा आणि त्याचें कुटुंब ही इतकी मंडळी होती. परंतु एकाएकीं त्याच्या घराला कीड लागली. दुर्दैवानें दोन वर्षांच्या आंत प्लेग आणि कॉलेरा यांच्या भक्ष्यस्थानीं सात मंडळी पडली. राहत्यापैकीं सुमित्रा, गोविंदरावमामा आणि त्यांचीं दोन मुलें इतकीच मंडळी राहिली. सुमित्रा–गंगाधराची बायको–आपल्या घरीं ह्मणजे देशमुखवाडींत आली आणि मामा आपल्या मुलांना घेऊन मुरुड सोडून नाशिकास मुलांच्या आजोळीं जाऊन राहिला.

गंगाधर मात्र शरीरानें आपल्या भावाच्या अगदीं विरुद्ध होता परंतु त्याच्या स्वभावांत काडी इतका देखील फरक नव्हता. तो मुळचा अगदीं अशक्त होता. पुढें लग्न झाल्यावर त्याची प्रकृति जास्त बिघडत चालली. आणि त्या वेळीं यशवंतराव घरांतून निघून गेला होता. पुढें त्याच्या संबंधानें विपरीत बातमी ऐकल्यापासून दादासाहेब अगदीं मऊ पडले. ते आपल्या दुसऱ्या मुलाला–गंगाधराला–आपल्या देशमुखीच्या वतनाच्या वारसाला फार जपूं लागले. त्याच्याकरितां त्यांनीं पुष्कळ औषधोपचार केले परंतु त्याला गुण येईना. शेवटीं त्याला घाटावरील हवेंत दोन चार वर्षें ठेवावें असेंच बहुतेक वैद्यांचें मत पडलें. तेव्हां नाइलाजास्तव दादासाहेबांनीं गंगाधराला बायकोसह पुण्यास पाठविलें.

घरांतून मुलगा आणि सून पुण्यास गेल्यावर दादासाहेब एकटेच राहिले. नोकरचाकर पुष्कळ होते परंतु मायेचें माणूस कोणी नव्हतें ह्मणून त्यांनीं मुलीला आपल्या जवळ रहावयास बोलाविलें. अर्थात जांवई बुवा–बळवंतराव घरजांवई झाले. त्याच्यामागें त्यांची विधवा बहिण दुर्गाताई हिचाहि भावाच्या मागें देशमुखवाडींत प्रवेश झाला. आपल्या सासऱ्याचें वैभव पाहतांच बळवंतरावाच्या मनांत निरनिराळे विचार येऊं लागले. पुढें मागें आपण प्रयत्न केल्यास सर्व देशमुखी आपल्या हातांत खात्रीनें येईल असें बळवंतरावास वाटूं लागलें. त्यांनीं हळुहळू त्या दिशेनें प्रयत्न सुरू केले. प्रथम दादासाहेबांचा स्वतांवर पूर्ण विश्वास बसवून घेतला. व क्रमाक्रमानें ह्मातान्याला बाजूला बसवून सर्व सूत्रें आपल्या हातांत घेण्यास हळुहळू सुरवात केली. दादासाहेबांचा आपल्या एकुलत्या एक जांवयावर लवकरच पूर्ण विश्वास बसला. त्यांचीहि आतां साठी उलटून

गेली असल्यामुळें पूर्वी सारखी त्यांच्याकडून आतां दगदग होत नसे. त्यांतून जांवई-बुवा मेहनती आणि विश्वासाचे मिळाले तेव्हां सर्व भार त्यांच्यावरच टाकून ते आतां स्वस्थ विश्रांति घेत पडले.

बहुतेक सर्व सूत्रें पूर्वी योजल्याप्रमाणें बळवंतरावाच्या हातीं गेलीं. दादासाहेबांच्या मृत्यूनंतर आपणामध्यें आणि देशमुखीच्या मालकीमध्यें त्यांना एकच मोठी अडचण दिसून येत होती. आणि ती अडचण ह्मणजे गंगाधराची ! त्याला मार्गांतून दूर कर-ण्यास काय युक्ति करावी ह्या विचारांत त्यांनीं कैक रात्री जागूनहि घालविल्या. केव्हां केव्हां त्यांच्या मनांत कांहीं भयंकर विचार येत परंतु असे विचार मनांत येतांच त्यांचें धैर्य मात्र पळून जात असे. पुढें त्यांच्या सुदैवानें औषधोपचाराकरितां पुण्यास गेलेले गंगाधरपंत एकाएकीं निवर्तले. एक मोठी अडचण आपोआप दूर होते न होते तोंच आठ दिवसांनीं बाळंतपणांत सुमित्राबाईनें आपल्या पतीच्याच मार्गाचें अवलंबन केलें. त्यावेळीं गंगाधरपंतांना दोन मुलें—यशवंत आणि कमला—होतीं. परंतु त्यावेळीं यशवंत सारा तीन वर्षांचा आणि कमला आठ दिवसांची होती.

दादासाहेबांनीं आपल्या नातवाचें नांव ‘ यशवंत ’ असें आपल्या मोठ्या मुलाच्या स्मरणाकरितां मुद्दाम ठेविलें होतें. आतां सर्व इस्टेटीचा व देशमुखीच्या हक्काचा तोच एकटा वारस राहिला. परंतु त्याच्या विषयीं बळवंतरावास कांहीं विशेष वाटलें नाहीं. दादासाहेबांच्या नंतर त्या पोराची आपणास वाटेल तशी सहज वाट लावतां येईल, असें त्यांस वाटत होतें. हीं दोन पोरकीं पोरें आतां आपल्याच ताब्यांत येतील तेव्हां त्या गोष्टीचा विचार पाहूं असें त्यांनीं ठरविलें. इकडे गंगाधराच्या मृत्यूची बातमी ऐकतांच दादासाहेबांची कंबर खचली. तोंच पुढें सुनेच्या मृत्यूची बातमी येऊन धडकली ! झाले—म्हाताऱ्यानें शेवटचें अंथरुण पकडलें ! आणि सहाव्या दिवशीं आपल्या भावी वारसाला—छोट्या यशवंताला विश्वासानें आपल्या जांवयाच्या—बळवंतरावाच्या हवालीं करून त्यांनीं आपली इहलोकींची यात्रा संपविली !

परंतु मरणापूर्वी दादासाहेबांनीं पुढली सर्व व्यवस्था बळवंतरावाच्या मार्फत व्यवस्थे-शीर रीतीनें करून ठेविली होती. देवघेवीसंबधानें सर्व प्रश्न, शेतांची लागवड, त्याच्या उत्पन्नाची व्यवस्था आणि धाकट्या यशवंताच्या नांवाने सर्व इस्टेटीचें व देशमुखीच्या

हक्काचें मृत्युपत्र करून ठेविलें. परंतु ह्या ह्मातान्यानें केलेल्या सर्व गोष्टी अमलांत आणणें बळवंतरावाच्या हातांत असल्यामुळें त्यानें त्या कशा अमलांत आणल्या असतील याची वाचकांना सहजच कल्पना होण्यासारखी आहे. गेल्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें दादासाहेबांनीं मृत्युशय्येवर असतांना दाजीबांना दिलेली कर्जाची सूट बळवंतरावांनीं कशी अमलांत आणिली हें वाचक जाणतच आहेत. त्याचप्रमाणें मृत्युपत्राची गोष्ट ! तें मृत्युपत्र मधल्यामध्यें दाबून टाकून दादासाहेबांच्या नंतर बळवंतराव हे ‘ भाऊसाहेब ’ बनले !

सगुणाबाईला आपल्या पतीचीं हीं सर्व कृष्णकृत्यें समजत नव्हतीं असें नाहीं. परंतु बळवंतरावांनीं तिला दादासाहेबांच्या मृत्यूनंतर तशाच करड्या अमलांत ठेविली होती. त्यामुळें तिचा सर्वस्वी नाइलाज झाला होता. शिवाय ती जात्याच भीरु असल्यामुळें बळवंतरावाला चांगलेंच फावलें. परंतु अलीकडे मात्र जसजसा यशवंत मोठा होऊं लागला तसतशी त्यांना काळजी वाटूं लागली. त्या पोराला जरा जास्त प्रमाणानें छळल्यास तो आपल्या जीवाचें अविचारानें कांहीं तरी बरें वाईट करून घेईल अशी त्यांना खात्री वाटत होती. कारण त्या पोराचा आपल्या बापाप्रमाणें, चुलत्याप्रमाणें आणि आज्याप्रमाणें हेकेखोर आणि करारी स्वभाव आहे, त्याचा त्यांना पुष्कळदां अनुभव आला होता. तेव्हां नखानें काम होणाऱ्या गोष्टीला कुऱ्हाड लावण्याची जरूरी नाहीं, असें वाटून त्या पोराच्या छळाला त्यांनीं सुरवात केली.

हा देखमुखवाडीचा व देशमुखांचा पूर्व वृत्तांत झाला.



# प्रकरण ८ वें.

## मला नोकरी नको.




ती दुपारची वेळ होती. आधल्या दिवशीं ठरविल्याप्रमाणें भाऊसाहेब आतां प्रभाकराच्या घरीं येणार होते. मुद्दाम येण्यांत त्यांचा कांहीं तरी उद्देश असेल हें वाचकांनीं ताडलेंच असेल! होय—तसें करण्यांत भाऊसाहेबांचा उद्देश होता खास. दाजीबानें अंगमेहनतीनें पिकंत घातलेलें फळ पदरांत पाडून घेण्याचा त्यांचा उद्देश होता. सर्व जंजिरा संस्थानांत दाजीबांच्या पांच शेतासारखीं उत्तम पीक देणारीं शेतें व दांडगें उत्पन्न देणारी आंबराई दुसरी कोठलीच नव्हती. ती आपल्या घशांत उतरविण्याचा त्यांचा कित्येक वर्षांपासून सारखा विचार चालला होता. दाजीबा होते तोंपर्यंत अनेक बिकट संकटांना टक्कर देऊन त्यांनीं बळवंतरावाचें कांहींच चालू दिलें नाहीं. आतां दाजीबांच्या मृत्यूनंतर त्यांनीं मृत्युपत्रांत लिहिल्याप्रमाणें आपल्या कर्जापोटीं त्यांची सर्व इस्टेट भाऊसाहेबांस ताब्यांत घेतां आली असती. परंतु एकदम तसें केलें असतां जनमन खवळेल अशी त्यांना भीति होती. कारण राजपुरींतील सर्व लोक दाजीबांना फारच चहात असत.

दाजीबांचें मृत्युपत्र वाचून झाल्यावर सुभानजी पाटलानें सर्व व्यवस्था करण्याची हमी आपणाकडे घेतली हें भाऊसाहेबांना बिलकुल पसंत पडलें नाहीं. सुभानजी पाटील हा वृद्ध, दाजीबांच्या कुटुंबाचा हितकर्ता, सत्यप्रिय आणि सरळ वर्तनी होता. तेव्हां दाजीबानें भविष्य केल्याप्रमाणें पुढच्या दोन वर्षांत जर खरोखरच उत्पन्न व्हावयाचें असेल तर दाजीबाप्रमाणेंच सर्व व्यवस्था चोख करून सुभानजी पाटील आपलें कर्ज सहज फेंकून देईल आणि मोठ्या श्रमानें इतकीं वर्षें चातुर्यानें पसरलेलें जाळें फुकट जाईल असें भाऊसाहेबांस वाटूं लागलें. सावित्रीबाईला हरप्रयत्नानें वळवून सुभानजीकडून सर्व व्यवस्था काढून ती आपल्या हातीं घ्यावी अशा विचारानें त्यांनीं आज मुद्दाम तेथें जाण्याचा विचार केला होता. एकदां दाजीबाच्या शेतजमिनीची व्यवस्था हातीं आल्या-

वर मग ती शेतजमीन, आंबराई आणि घर आपल्या हातून निसटणार नाहीं, अशी त्यांची खात्री होती. शिवाय प्रभाकराविषयीं त्यांना थोडी काळजी वाटत होती. त्या चाणाक्ष पोराला सुरवातीलाच जर दाबून टाकलें नाहीं, तर पुढें त्याच्यापासूनहि आपणांस त्रास भोगावा लागेल हें ते जाणून होते.

प्रभाकर दिवाणखान्यांत म्लान वदन करून बसला होता. मधुकर आणि कमला जवळच एका पुस्तकांतील चित्रें पहात होतीं. त्या पोरांना त्यांच्यावर ओढवलेल्या प्रसंगाची काय बरें कल्पना ! सावित्रीबाई खोलींत अश्रु गाळीत बसली होती. राधाआका स्वयंपाकघरांत कांहीं काम करण्यांत गुंतली होती. इतक्यांत सुभानजी पाटील आणि शास्त्रीबुवा आले. त्यांना पाहून बाहेर बसण्याकरितां प्रभाकर जाजम पसरूं लागला, तेव्हां शास्त्रीबुवा ह्मणाले, " आंतच टाक तें जाजम. येथेंच बसूं ह्मणजे सावित्रीबाईना बोलण्यास ठीक पडेल. "

प्रभाकरानें तेथेंच जाजम पसरलें. इतक्यांत भाऊसाहेब आले. नमस्कार चमत्कार होऊन मंडळी खालीं बसली. सुभानजी पाटलानें प्रभाकराला आपल्याजवळ बसावयास सांगितलें. क्षणभरानें भाऊसाहेब गंभीर स्वरानें ह्मणाले, "माझ्या दुष्ट बैलामुळें दाजीबाचा अशा चमत्कारिक रीतीनें अंत झाला, ही गोष्ट मला रात्रंदिवस चैन पडूं देत नाहीं. शास्त्रीबुवा, मीं तुह्मांला सांगितलें तर कदाचित तुह्मांला खोटें वाटेल परंतु मी खरेंच सांगतों, आज बारातेरा दिवस झाले ह्या दाजींच्या आकस्मिक मृत्यूमुळें मला स्वस्थ झोंप देखील येत नाहीं. आतां मी जेव्हां दाजीचा हा पसारा नीट व्यवस्थेला लागलेला पाहीन तेव्हां माझ्या मनाला स्वस्थता येईल. "

" पण आतां व्यवस्था तर सर्व लागली आहे." सुभानजी ह्मणाला, " आपण तीन वर्षेपर्यंत कर्जापोटीं कांहीं रक्कम किंवा व्याज मागणार नाहीं असें ह्मणाला आहांत. "

" होय—पण—असें पहा पाटील, " किंचित घोंटाळून भाऊसाहेब ह्मणाले. " मी तीन वर्षे थांबतों, मला कांहीं नाहीं त्याचें ! परंतु तीन वर्षांनीं एकदम रक्कम फुगेल मग जड जाईल द्यावयाला ! ह्मणून ह्मणतों जसें जसें हें कर्ज फिटेल तसें ह्या मुलानांच चांगलें!"

भाऊसाहेबांचा कावा मंडळीच्या लक्षांत आला नाहीं. त्यांचें भाषण सावित्रीबाई दरवाजा आडून ऐकत होती. ती हळूंच ह्मणाली, " सुभानजी, भाऊसाहेब ह्मणतात तें एका अर्थी खरें आहे. देत जाऊं त्यांचे पैसे जसे हातांत येतील तसे ! "

" ठीक आहे तर मी आपल्या शब्दाबाहेर नाहीं. " सुभानजी पाटील ह्मणाला " मग भाऊसाहेब, आपल्या थकलेल्या बाकीपैकीं आणि व्याजापोटीं रुपये सव्वातीनशें सावित्रीबाई यंदा येऊं शकतील—"

" सव्वा तिनशें ! " आश्चर्यानें भाऊसाहेब ह्मणाले. कारण इतकी मोठी रक्कम त्यांस देतां येणार नाहीं असा त्यांचा समज होता.

" होय. आणि आपणास जास्तच निकड असेल तर आंबराईचें उत्पन्नहि त्या सवड करून देऊं शकतील—"

" छे, छे ! निकड कसली ! " भाऊसाहेब विषय बदलण्याच्या उद्देशानें पुढें ह्मणाले, " पण काय हो पाटील, तुह्मीं ह्या प्रभाकराला आतां दाजीसारखें शेतांत खपायला लावणार कीं काय ? "

" त्याविषयीं मी अद्यापि सावित्रीबाईचा विचार घेतला नाहीं " क्षणभर थांबून सुभानजी पाटील ह्मणाला.

" त्यांत विचार कसला घ्यावयाचा ! मी ह्मणतों आतां त्याची शाळा करावी बंद आणि त्याला व्यापारांत कुठें तरी गुंतवून टाकावा. "

" पण माझी नाहीं इच्छा. " मध्येंच प्रभाकर ह्मणाला.

" तुझ्या इच्छेला काय करतोस ! आणि त्यांत तुला कळतं काय ? " भाऊसाहेब त्याला झिडकारून ह्मणाले.

" पण मी ही सगळी संस्कृतचीं पुस्तकं मुंबईहून मागविलीं आहेत—"

" बरं मग ? त्यांत काय झालं !–पाटील, " सुभानजीकडे वळून भाऊसाहेब ह्मणाले, " माझ्या सांगण्याचा अर्थ घ्या लक्षांत. ह्या मुलांचा खर्च कांहीं कमी नसतो. त्यांना मोठ्या माणसासारखा खर्च लागतो. आणि आतां तुह्मी जितका खर्च कमी कराल तितका तुह्माला चांगला. ह्मणून ह्मणतों ही एक अनायासें संधी आली आहे कीं, काल मला शहरांतील मुकुंदशेट भेटले होते. त्यांना पेढीवर एका मनुष्याची जरूरी आहे–"

" मी नाहीं जाणार त्या पेढीवर. " प्रभाकर रागानें ह्मणाला.

" ऐक प्रभाकर. " आंतून सावित्रीबाईनें त्याला दाबलें.

" ह्या पोराला आपलं हिताहित काय कळणार आहे ! " तुच्छतेनें भाऊसाहेब ह्मणाले, " माझा आणि मुकुंदशेटचा चांगला परिचय आहे. तेव्हां त्यांना सांगून प्रभाकराला

तेथें लावून देतों. ह्मणजे ही त्याची फी, त्याला लागणाऱ्या पुस्तकांचा खर्च वांचून उलट पगाराच्या रूपानें कांहींतरी पैसे प्रत्येक महिन्याला नियमितपणें घरांत येऊं लागतील. "

" तेंहि कांहीं खोटं नाहीं—" आंतून सावित्रीबाई ह्मणाली, " आतां जरा हात राखूनच वागलं पाहिजे. आजपर्यंत तिकडच्या बळावर सर्व झालं परंतु आतां मी पडलें बायको माणूस ! "

" पण आई, माझा खर्च होत असेल तर मी नाहीं जाणार शाळेंत. " आईकडे वाईट मुद्रा करून पहात प्रभाकर ह्मणाला, " पण मला पेढीवर नको पाठवूं. मला शेताची फार आवड आहे. मी सुभानजी पाटलाबरोबर शेतांतच जात जाईन. "

" शेतांत जाऊन तूं करणार काय ? " सावित्रीबाईनें विचारलें, " तूं अद्यापि लहान आहेस. "

" पण मला त्याची आवड आहे. आई, मला नको पाठवूं पेढीवर. "

" हेंच का आतां तूं माझं ऐकणार ! " सावित्रीबाई किंचित् रागानें ह्मणाली.

" मग ठरलं तर ! " आपल्या मनासारखें घडून आलेलें पाहून भाऊसाहेब आनंदानें ह्मणाले, " मी आतां मुकुंदशेटला भेटतों आणि करतों त्याची व्यवस्था. "

" पण भाऊसाहेब, माझ्यावर तुमचा एवढा जुलूम कां ? " कपाळ आकुंचित करून प्रभाकर ह्मणाला.

" आतां जुलूम वाटतो पण उद्यां पगार आणूं लागलास ह्मणजे भाऊसाहेबांचे उपकार आठवतील ! " असें ह्मणून भाऊसाहेब उठले. त्यांच्या मागून प्रभाकरहि उठला. त्याला भाऊसाहेबांचा अतिशय राग आला परंतु करतो काय ? मनांतल्या मनांत तो एकसारखा जळफळूं लागला.

" उपकार ह्मणतां तर मग आपल्या बंडूलाच पाठवा पेढीवर. " प्रभाकराला बोलल्या शिवाय रहावेना. तो भाऊसाहेबांच्या मागून खिडकीजवळ जाऊन बोलला.

" अरे माझ्या बाबुरावाचें कशाला नांव काढतोस ! तो तर पुढें देशमुख होणार समजलास ! " तोऱ्यानें भाऊसाहेब ह्मणाले.

" पण मी तुह्माला साफ सांगतों भाऊसाहेब, मी त्या पेढीवर कधींही जाणार नाहीं."

क्षणभर भाऊसाहेबांनीं त्याच्याकडे डोळे ताणून पाहिलें. प्रभाकरहि तितक्याच रागानें त्यांच्याकडे पहात होता. किंचित्कालानें भाऊसाहेबांनीं आपली चर्या पालटून त्याच्या खांद्यावर हात दिला व त्याला खिडकीजवळ ओढून ते हळूच म्हणाले, "प्रभाकर, दोन आठवड्यापूर्वीं ह्याच दिवाणखान्यांत मृत्यूच्या द्वारीं कोण पडलं होतं तें तुला आठवतं काय ? त्याच दाजीनें—तुझ्या बापानें आपली शेवटची इच्छा म्हणून काय लिहून ठेवलं आहे ? 'आपल्या आईच्या आज्ञेंत वागत जा.'—हीच ना तुझ्या बापाची तुला शेवटची आज्ञा ! ती इतक्या लवकर तूं विसरून जावीस काय ?"

प्रभाकराची छाती धडाडली ! भाऊसाहेबांची गोळी लागूं पडली ! प्रभाकराच्या डोळ्यापुढें दाजीबाची प्रतिमा मूर्तिमंत उभी राहिली. इतकेंच नव्हे तर 'प्रभाकर, आपल्या आईच्या आज्ञेंत वागत जा. ती फार विचारी आहे. तिच्या आज्ञेंत जर तूं वागलास तर पश्चात्ताप करण्याची तुला कधींहि पाळी येणार नाहीं.' हे शब्द प्रत्यक्ष आपला प्रियकर पिता बोलत आहे, असा त्याला भास झाला. तो तेथेंच खिडकीला टेंकून उभा राहिला.

जवळ जवळ एक तास झाला. अद्यापि प्रभाकर तेथेंच उभा होता. आपणास आवड नसतांना, केवळ बापाची आज्ञा म्हणून आईच्या सांगण्याप्रमाणें पेढीवर जाव-यास तो सिद्ध झाला, तरी त्याच्या डोक्यांतील विचार बंद होईनात. दिवाण-खान्यांत बसलेली मंडळी सावित्रीबाईला विचारून केव्हांच निघून गेली होती. राधाआका स्वयंपाकघरांतील काम आटोपून केव्हांच येऊन दिवाणखान्याच्या दरवाजाशीं बसली होती. आंत येतांना तिनें प्रभाकराला खिडकींत विचार करीत उभा असलेला पाहिला. आपण आलों आतां तो आपणाजवळ येऊन बसेल, असें तिला प्रथम वाटलें. तिची सुपारी खाऊन झाली, तरी प्रभाकर खिडकींतून हालेना असें पाहून तिनें एक दोन हांका मारल्या. परंतु प्रभाकराचें लक्ष कुठें होतें ? तो आपल्याच विचारांत गर्क होता. शेवटीं म्हातारी उठली. आणि हळूच जवळ जाऊन ती प्रभाकराला, म्हणाली "बाळा असं वेड्यासारखं दुःख तूं किती करणार ! झाली गोष्ट ! आतां काय आहे त्यांत—"

"आका, हें दुःख आतां माझ्या जन्माला लागलं !"

" असं वेड्यासारखं काय म्हणतोस ! तूं चांगला समजूतदार मुलगा आणि असं भलतंच कसं वेड्यासारखं बोलतोस ! " प्रभाकराची समजूत करीत राधाआका प्रेमळ शब्दानें म्हणाली, " आज दुःख आहे अन् उद्यां सुख होईल. दुःख हें सदा असंच राहणार आहे का ? अरे वेड्या, सुखदुःखाचं हें राहाटगाडगं सदा असंच फिरत राहणार—"

" पण माझ्या इच्छेविरुद्ध मला त्यांनीं पेढीवर पाठविण्याचें का ठरवावं ? "

" वेड्या, तुझ्या बऱ्याकरितां ! तुझं अकल्याण व्हावं अशी का त्यांची इच्छा आहे ? शिवाय आजकाल नोकऱ्या तरी आहेत कुठें ? "

" पण मला नोकरी नको. मी नोकरी करावी अशी बाबांची इच्छाच नाहीं. मग मजवर भाऊसाहेबांचा जुलूम कां ! त्यांनीं मला काय म्हणून पेढीवर पाठवावं ! " प्रभाकर जोरानें म्हणाला.

राधाआकाला देखील त्याचें बोलणें पटलें. प्रभाकरानें नोकरी केली पाहिजे आणि ती देखील आतांच केली पाहिजे, नाहींतर प्रसंग कठीण आहे, असा कांहीं प्रकार आहे काय ? याचा तिनें बराच वेळ विचार केला. परंतु प्रभाकरानें आतां नोकरी केली नाहीं, तरी गृहखर्चाला आज तूट पडणार नाहीं, हें ती चांगलें जाणून होती. शिवाय प्रभाकरानें इतक्या कोंवळ्या वयांत नोकरी करितां हाडें झिजविणें तिला पसंत नव्हतें. अशा रीतीनें तिनें बराच वेळ विचार केला. घरची शेत, वाडी आणि आंबराई यांचें पोटापुरतें उत्पन्न असतां केवळ भाऊसाहेबांच्या कर्जाकरितां आज आपल्या पोराला दुसऱ्याचें दास्यत्व पत्करावें लागत आहे,ह्या शेवटच्या विचारानें म्हातारीचें मन अस्वस्थ केलें.

नोकरीच्या विचारानें डोकें भडकून प्रभाकरानें ' मजवर भाऊसाहेबांचा जुलूम कां ! त्यांनीं मला काय म्हणून पेढीवर पाठवावें? ' हीं दोन वाक्यें उच्चारिलीं. त्याचें मस्तक अगदीं भणभणून गेलें. क्षणभर तो स्तब्ध राहिला. इतक्यांत एकाएकीं त्याला कसली आठवण पडली असेल ती असो, त्याच्या नेत्रांतून घळघळ पाणी येऊं लागलें. आणि क्षणभरानें तो अगदीं दीन स्वरानें म्हणाला, " बाबा ! तुम्ही जर आतां असतेत तर !!! "

प्रभाकराचे हे दीन शब्द आणि केविलवाणी स्थिति पाहून राधाआकालाहि दुःखाचा हुंदका आला. तिनें चटकन् प्रभाकराला जवळ ओढून आपल्या हृदयाजवळ घट्ट धरलें. आणि दोघेही क्षणभर मनसोक्त रडले !

---

# प्रकरण ९ वें.

## पेढीवरून सुटका.



त्या गोष्टीला आज आठ दिवस लोटले. प्रभाकर मुकुंदशेटच्या पेढीवर जाऊं लागला होता. ही पेढी फुल शहरांत असून दाजीबांच्या आंबराईपासून सहा मैल होती. प्रभाकराला रोज सकाळ संध्याकाळ सहा मैल जावें यावें लागूं लागलें. हें फुल शहर सध्याच्या नबाबानें वसविलें. मुरुडला लागूनच ह्या नव्या शहराची व्यवस्था केलेली आहे. शहरांत नबाब साहेबांचा राजवाडा असून इतर इमारतींची रचना व्यवस्थेशीर रीतीनें केलेली आहे. ह्या शहराची रचना होत असतांना दादासाहेब देशमुखांनीं आपली दगडाची खाण सुरू केली होती. त्यामुळें त्या खाणीपासून त्यांना फारच फायदा झाला, हें मागें सांगितलेंच आहे. त्यांच्याच खाणींतील दगड शहरांत खपूं लागला.

फुलशहरांत प्रसिद्ध मंडळीपैकीं मुकुंदशेट हे एक होते. भाऊसाहेब आणि मुकुंदशेट यांची लहानपणापासून ओळख होती. त्यांनींच खटपट करून प्रभाकराला त्यांच्या पेढीवर नोकरीस ठेविलें होतें. अशा रीतीनें प्रभाकराला नोकरी मिळवून देण्यांत भाऊसाहेबांनीं जी कळकळ दाखविली, ती केवळ निरपेक्ष बुद्धीनें आणि त्याचें कल्याण व्हावें ह्या इच्छेनें दाखविली असें पुष्कळजणांस वाटलें, परंतु केशवशास्त्र्यांस पाहिल्यापासून भाऊसाहेबांचा संशय होता. दाजीबांचें मृत्युपत्र त्यांनीं लिहिलें असल्यामुळें, आणि तें लिहीत असतां मधून मधून दाजीबांच्या तोंडून जीं इतर वाक्यें त्यांनीं ऐकिलीं होतीं, त्यावरून भाऊसाहेबांचा खरा स्वभाव त्यांच्या चांगलाच लक्षांत आला होता. दाजीबांच्या मृत्यूमुळें त्यांची मुलें उघडीं पडलीं, तेव्हां त्यांचें पुढें कांहींतरी कल्याण व्हावें आणि प्रभाकर मार्गाला लागावा, ह्याच उद्देशानें भाऊसाहेबांनीं ही सर्व खटपट आरंभिली आहे असें त्यांस वाटेना. कारण त्यांच्यासारख्या पाषाणहृदयी माणसाला दाजींच्या

मृत्यूमुळें उपरति होणें शक्य नाहीं, हें ते जाणून होते. आज सहा दिवस ते ह्याच एका गोष्टीचा विचार करीत होते, तों आज त्यांना एक विशेष महत्वाची गोष्ट कळली. नेहमीं प्रमाणें ते आपल्या रोग्यांना तपासून परत घरीं जात असतां मुकुंदशेटच्या पेढीवरील एक मनुष्य त्यांना वाटेंत भेटला. प्रथम क्षेमसमाचार विचारून झाल्यावर शास्त्रीबुवांनीं प्रभाकराची चौकशी केली. तेव्हां तो मनुष्य म्हणाला, " उद्यां प्रभाकराचं नक्की होईल. पोर मेहनती आहे आणि तो काम करील यांत शंका नाहीं. पण त्याला हें काम बिलकुल आवडत नाहीं. उद्यां त्याच्याकडून भाऊसाहेब नौकरीचा करारनामा लिहवून देणार आहेत. "

" करारनामा ! तो कशाबद्दल ? " शास्त्रीबुवांनीं विचारलें.

" 'मी पांच वर्षें नोकरी करीन,' अशा अर्थाचा ! "

" पण भाऊसाहेबास असा करारनामा लिहवून देण्याचें कारण काय ? "

" कारण काय असणार ! उद्यां त्यानें नोकरी सोडूं नये, हेंच ! "

शास्त्रीबुवांचा संशय दृढ झाला. आणि खरी वस्तुस्थितीहि तशीच होती. प्रभाकराला पेढीवर अडकवून पांच वर्षांत हरप्रयत्न करून दाजीबांची आंबराई आणि शेती घशाखालीं उतरविण्याचा त्यांचा विचार होता. शास्त्रीबुवांना ही नवीन गोष्ट कळतांच ते घरीं न जातां सुभानजी पाटलाकडे गेले. आणि त्यांनीं नुकतीच कळलेली गोष्ट त्यास सांगितली.

" शास्त्रीबोवा, आतां मलाहि तुमच्या सारखंच वाटूं लागलें आहे. प्रभाकराला येथून दूर करण्यांत भाऊसाहेबांचा कांहींतरी डावपेंच आहे, यांत शंका नाहीं. " सुभानजी पाटील ह्मणाला.

" शंका तर नाहींच ! " शास्त्रीबुवा ह्मणाले, " दाजीबांनीं मृत्युपत्रांत लिहिलें आहे तें अगदीं खरं खरं आहे. त्यांच्या शेतवाडीवर भाऊसाहेबांची नजर आहे, यांत बिलकुल शंका नाहीं. "

" तें तर झालंच ! पण आतां पुढें काय ? "

" माझ्या मनांतून त्या मुकुंदशेटला भेटावं असं आहे. "

" ठीक आहे. तुह्मी जाऊन त्या शेटनां भेटा. आणि मी आतां जाऊन सावित्रीबाईंना ह्या सर्व गोष्टी सांगतों. आणि हें पहा शास्त्रीबुवा, प्रभाकरानें नोकरी करण्यापेक्षां तो

आपल्या बापासारखा शेतकीकडे पाहूं लागला, तर फार चांगलं होईल. कारण बापासारखा त्याचा सर्व ओढा शेतकीकडेच आहे. ''

शास्त्रीबुवा घरीं आल्यावर त्यांनीं आपलें भोजन उरकलें. आणि टांगा बोलाविला. वास्तविक जेवण झाल्यावर शास्त्रीबुवा तासभर झोंपावयाचे ! पण आज त्यांनीं आपल्या झोंपेला फांटा दिला. त्यांनीं जरी आज झोंपण्याचा प्रयत्न केला असता तरी त्यांस झोंप येतीना. कारण दाजीबानें मृत्युशय्येवर असतांना त्यांच्यावर एक मोठी जबाबदारी टाकिली होती. आणि त्या जबाबदारीची जाणीव त्यांना ताजी होती.

फुलशहरांत येतांच शास्त्रीबुवांनीं पेढीसमोर आपला टांगा उभा केला. दुकानावर एका भागांत कांहीं सुवर्णकार कारागिर काम करीत होतेः कोंपऱ्यांत भट्टी पेटलेली होती. दुसऱ्या बाजूला पेढीच्या गादीवर दोन कारकून काम करीत असून मुख्य मुनीम कांट्याजवळ बसला होता. मुकुंदशेट आंतल्या बाजूला एका स्वतंत्र खोलींत बसले होते. शास्त्रीबुवा वर चढले, त्यावेळीं प्रभाकर दुकानांत नव्हता. त्याला कांहीं कामा निमित्त मुनिमानें बाजारांत पाठविलें होतें. शास्त्रीबुवा वर येतांच मुनिमानें त्यांचा सत्कार केला. आणि शेटची भेट घ्यावयाची आहे, असें कळतांच त्यांस आंतल्या खोलींत नेलें.

'' या शास्त्रीबुवा, आज कुणीकडे ? '' नमस्कार करून खुर्ची देत मुकुंदशेटनें विचारलें.

'' आलों होतों आज मुद्दाम आपल्या भेटीकरितां. '' शास्त्रीबुवा ह्मणाले.

'' वाः आनंद आहे ! बोला काय आज्ञा आहे ? कांहीं चांदी सोन्याची खरेदी आहे वाटतं ? ''

'' छे छे ! मी आलों आहे दाजीबांच्या प्रभाकराविषयीं. '' शास्त्रीबुवांनीं विषयाची सुरवात केली. '' आज आठ दिवस झालें, प्रभाकर आपल्या पेढीवर येऊं लागला आहे; तेव्हां ह्मटलें, कसं काय, त्याचं काम आपल्याला पसंत आहे ? ''

'' मुलगा काम तर अगदीं चोख करतो पण त्यांत त्याला आनंद वाटत नाहीं, असें दिसतं. कारण त्याची मुद्रा दुर्मुखलेली असते. पण त्याविषयीं कांहीं विशेष नाहीं. सध्यां तो आहे दुःखांत ! आतां हळुहळूं काम आंगवळणी पडलं ह्मणजे मग सर्व यथास्थित होईल. आज भाऊसाहेब येणार आहेत तेव्हां काय तें नक्की ठरणार आहे. ''

" कशाविषयीं नक्की ठरणार आहे ? "

" प्रभाकराच्या नोकरीविषयीं. त्याच्याकडून पांच वर्षांचा करारनामा ते लिहून देणार आहेत. "

" ते लिहून देणार आहेत ! ह्मणजे ? त्यांचा काय संबंध ? "

" संबंध ह्मणजे ? आतां तर दाजीबाच्या घराण्याचं कल्याण भाऊसाहेबांवरच अवलंबून आहे. "

" असं आपणास कोणी सांगितलं ? ", असा शास्त्रीबुवांनीं प्रश्न केल्यावर मुकुंदशेटनें त्यांना जें उत्तर दिलें, तें एकतर्फी होतें. भाऊसाहेबांनीं मुकुंदशेटचा सर्व गोष्टींत अगदीं गैरसमज केला आहे, हें कळतांच शास्त्रीबुवांना अतिशय राग आला. त्यांनीं हळुहळू सर्व खऱ्या गोष्टी शेटजीला सांगितल्या आणि शेवटीं ते ह्मणाले, " शेटजी, ह्या अंतस्थ कारणामुळेंच प्रभाकराला आपल्या पेढीवर अडकाविण्याचा भाऊसाहेबांचा विचार आहे. त्याची इच्छा, आपल्या स्वतःच्या शेतांत खपून दाजीबाच्या इच्छेप्रमाणें भाऊसाहेबांचे सर्व कर्ज फेडावें व आपण मुक्त व्हावें अशी फार आहे. आणि माझी खात्री आहे कीं, तो जर स्वतः शेतांत राबेल तर दोन चार वर्षांत खरोखरीच ते कर्ज मुक्त होतील. आणि भाऊसाहेबांसहि असेंच वाटतें, ह्मणून त्यांनीं हा सर्व व्यूह रचला आहे."

" शास्त्रीबुवा, तुह्मी ह्मणतां त्या सर्व गोष्टी खऱ्या परंतु त्याच्याशीं मला काय ? कोणीहि झाला तरी तो आपल्या मतलबा पुरतंच पाहणार ! मला तुह्मी ह्या सर्व गोष्टी सांगितल्या पण मी ह्मणतों, मी तरी आपला फायदा कां व्यर्थ दवडूं ? प्रभाकरासारखा चुणचुणीत पोर अल्प वेतनांत पांच वर्षांचा करारनामा लिहून देण्यास तयार आहे, तेव्हां मी आपला फायदा काय ह्मणून व्यर्थ दवडूं सांगा ? "

शेटजीचें भाषण ऐकून शास्त्रीबुवांची अगदीं निराशा झाली. त्यांना मोठी आशा होती कीं, आपण खरी वस्तुस्थिति मुकुंदशेटला समजावून सांगितल्यावर त्यांचें मन खात्रीनें वळेल. परंतु ती सर्व आशा आतां निर्फळ झाली. शेवटीं जास्त भाषण वाढविण्यांत कांहीं अर्थ नाहीं, असा विचार करून शास्त्रीबुवा उठले. मुकुंदशेट कांहीं एक बोलले नाहींत. फक्त त्यांना पोंचविण्याकरितां ते खोलीच्या दरवाजापर्यंत आले. शास्त्रीबुवांनीं जातांना त्यांना नमस्कार मात्र केला. त्याचवेळीं प्रभाकर बाहेरून येऊन नुकताच-

पेढीच्या पायऱ्या चढत होता. त्याच्या हातांत एक थैली होती. ती त्यानें मुख्य मुनिमापुढें ठेविली. मुनिमानें ती उघडून आंतील एक चांदीची लगडी बाहेर काढिली आणि कांट्यावर घालून तोलली. हा सर्व प्रकार शास्त्रीबुवा दरवाजांत उभे राहून पहात होते. पलीकडे खांबाला टेकून प्रभाकर आपल्या धोतरानें कपाळावरील घाम पुशीत उभा होता. त्याचें तोंड उन्हांतून आल्यामुळें लाल झालें होतें. थोड्या वेळानें शास्त्रीबुवा पुढें झाले आणि प्रभाकराच्या खांद्यावर हात ठेवून ते ह्मणाले, " कायरे प्रभाकर, काय खबर आहे ? "

" शास्त्रीबुवा, माझी खबर मला विचारण्यापेक्षां भाऊसाहेबांना विचारलेली जास्त चांगली ! माझें सर्वतोपरी कल्याण करण्याची त्यांनीं हमी घेतली आहे तेव्हां आपण त्यांनाच विचाराल तर बरें ! " कठोर स्वरानें प्रभाकर ह्मणाला. परंतु क्षणभरानें त्याची मुद्रा पालटली. शास्त्रीबुवा आपले खरे हितचिंतक आहेत, ही जाणीव त्याला उत्पन्न झाली. त्यांनीं आपणास साधा प्रश्न विचारला असतां आपण त्यांस असें चमत्कारिक तुच्छतेनें उत्तर दिलें हें अगदीं गैर केलें, असें त्यास वाटलें. त्यानें वर मान करून शास्त्रीबुवांच्या मुखाकडे पाहिलें. तेव्हां त्यांच्या चर्येवरून आपल्या उत्तरामुळें त्यांस वाईट वाटलें आहे असें स्पष्ट त्याला दिसलें.

" शास्त्रीबुवा, आतां माझी कसली आली आहे खबर ! " स्वर बदलून प्रभाकर पुढें ह्मणाला, " माझ्या नशिबीं ही श्वानवृत्तीच शेवटपर्यंत लिहिली आहे, तेव्हां आतां मी व्यर्थ धडपड करण्यांत काय अर्थ आहे ! आईची इच्छा आहे, आणि तिच्या मर्जी-प्रमाणें मी वागावें अशी बाबांची मला शेवटची आज्ञा आहे. तेव्हां मला आईच्या मर्जीप्रमाणें वागलेंच पाहिजे आणि तसें वागणें माझें कर्तव्यच आहे, परंतु यांत भाऊ-साहेबांना मात्र आपला डाव साधतां येणार आहे. "

" मग त्याबद्दल तूं काय विचार केला आहेस ? "

" विचार काय करायचा ? माझ्या इच्छेविरुद्ध जरी मला येथें नोकरी करावी लाग-णार आहे, तरी ती मी मोठ्या उल्हासानें कर्तव्य ह्मणून करीन. आणि शेवटीं मी ह्या कर्तव्यांतच स्वप्राणाची आहुती देईन. "

" पण असं कां ? त्यालाहि कांहीं उपाय काढतां येईल. "

प्रभाकरानें निकरावर येऊन केलेलें भाषण शास्त्रीबुवांना लागलें !

" आतां उपाय कसला ? माझा कांटा काढण्याकरितां भाऊसाहेबांनीं हा दीर्घ प्रयत्न चालविला आहे—"

इतकें त्यांचें भाषण होत आहे तोंच समोरून प्रत्यक्ष भाऊसाहेबच घोड्यावर स्वार होऊन येतांना दृष्टीस पडले. तेव्हां नाइलाजास्तव शास्त्रीबुवांना तेथून आपला पाय काढावा लागला. भाऊसाहेबांना येतांना पाहून इतका वेळ दरवाजा आड उभे असलेले मुकुंदशेटहि आंत झाले. त्यांनीं प्रभाकराचा प्रत्येक शब्द ऐकला होता. आणि त्या प्रत्येक शब्दाचा त्यांच्या मनावर फार अनुकूल परिणाम झाला होता. थोड्या वेळानें भाऊसाहेब पेढेजिवळ आले. त्यांना पाहतांच पेढीवरील एक नोकर पुढें झाला. त्याच्या हातीं घोड्याची लगाम देऊन भाऊसाहेब घोड्यावरून उतरले आणि पेढीवर चढले.

" काय प्रभाकर, काय खबर आहे ? " थोडया वेळापूर्वी शास्त्रीबुवांनीं विचारलेल्या प्रश्नाचीच त्यांनीं पुनः आवृत्ति केली. परंतु प्रभाकरानें मात्र त्यांना कांहींच उत्तर दिलें नाहीं. भाऊसाहेबहि त्याच्या उत्तराची अपेक्षा न करतां आंत शिरले. त्यांना आंत आलेले पाहून मुकुंदशेटनीं फक्त मानेनें त्यांचें स्वागत करून खुर्ची पुढें केली. त्या वेळीं मुकुंदशेटची चर्या विशेष गंभीर दिसत होती.

" मग कसें काय मुकुंदशेट, काय ठरलं शेवटीं ? " भाऊसाहेबांनीं खुर्चीवर बसतां बसतां विचारलें.

" ठरायचं तेंच ठरलें ! "

" मला वाटलंच तें ! कारण असं पहा, मुलगा आहे चलाख. तेव्हां असा चलाख मुलगा तुझी हातचा कसा दवडाल ? "

" तेंहि खरंच आहे. पण भाऊसाहेब मी असं विचारतों कीं, हा तुह्मी मला पांच वर्षांचा करारनामा लिहून देणार आहांत पण त्यापेक्षां तो करारनामा दोन वर्षें जास्त वाढविला तर ? "

" तर माझी कांहीं हरकत नाहीं. उलट मला त्यांत आनंदच आहे. "

" मग कराना तेवढं. "

" ठीक आहे. हें पहा—" आपल्या खिशांतून कागद काढून भाऊसाहेब पुढें ह्मणाले, "यांत पांच वर्षांचा उल्लेख केला आहे. पण आतां आपली इच्छाच आहे. तेव्हां हा पांचाचा आंकडा खोडून त्याचें सात केले ह्मणजे झालें ? "

" अस्सं ! अस्सं ! ! एकूण तुह्मी करारनामा लिहून, सर्व जय्यत तयारीनिशीं आलां आहांत ह्मणायचें ! " तीक्ष्ण मुद्रेनें भाऊसाहेबांकडे पहात मुकुंदशेट ह्मणाले, " बरं मग मी प्रभाकराला आंत हांक मारितों. कारण त्याच्या समक्ष सर्व होईल तेवढं ठीक."

" हं हं–बोलवा. तो असला तरी त्यांत काय बिघडतं ! कारण माझं कामच मुळीं चोख आहे. एकदां एखादं काम हातीं घेतलं ह्मणजे त्याचा शेवट लावल्याशिवाय मला चैनच पडत नाहीं. अहो, हा एक स्वभाव आहे झालं ! "

" स्वभाव चांगला आहे, यांत मुळींच शंका नाहीं. "असें ह्मणून प्रभाकराला मुकुंदशेटनीं हांक मारिली. थोड्या वेळानें प्रभाकर आंत आला आणि त्यांच्या जवळ उभा राहिला. त्यांच्याकडे पहात मुकुंदशेट ह्मणाले, "प्रभाकर, तूं माझ्याकडे पांच वर्षें, महिना पांच रुपये प्रमाणें नोकरी करण्याबद्दल हा करारनामा तुझे हितचिंतक भाऊसाहेब यांनीं लिहून आणिला आहे, त्यांत भाऊसाहेबांनीं थोडी सुधारणा करावी, असें मी त्यांना सांगितलें."

" कसली सुधारणा ! " शांत चित्तानें प्रभाकरानें विचारिलें.

" फक्त पांच वर्षांच्या ऐवजीं सात वर्षें आणि ही सुधारणा तुला मान्य आहेना ? "

"शेटजी मला मान्य आहे किंवा नाहीं हें विचारण्याची आतां कांहींच जरूरी नाहीं. " निश्चयी स्वरानें प्रभाकर ह्मणाला, " भाऊसाहेब माझे खरे व पुरे हितचिंतक आहेत, मी माझी मान त्यांच्या हातीं दिली आहे, तेव्हां आतां त्यांना वाटेल तर सात वर्षेंच काय पण जन्मभर सुद्धां माझी मान त्यांनीं अडकवून टाकावी. "

" पहा मुकुंदशेट, कशी जीभ चुरचुर चालते ती ! कायरे प्रभ्या, फारसा बोलूं लागलास ? मी तुझी मान अडकवितों कायरे ? फाजील कुठला ! काय मौज आहे; आजकाल भल्याची दुनियाच नाहीं ! "

" बरं तर आतां एक ठरलं ! आतां भाऊसाहेब असं करा, हा पांचाचा आंकडा खोडून तुह्मी साताचा आंकडा घालाल, तसंच ह्या प्रभाकराचें नांव खोडून त्या ठिकाणा तुमच्या बंडुनानाचें नांव घाला."

" ह्मणजे ? "

" ह्मणजे काय ? तुह्मी हित साधायला निघाला आहांत, तेव्हां दुसऱ्याचें हित साधण्यापेक्षां प्रथम स्वहित साधावें, आणि हें मी कांहीं जगावेगळें सांगतों असें नाहीं. आजपर्यंत तुह्मीं जसें स्वहित साधत आलांत तसेंच हेंहि साधा. "

" मुकुंदशेट, तुह्मी माझी थट्टा आरंभिली आहे कीं काय ? "

" छे ! मुळींच नाहीं ! उलट मी हें तुमच्या हिताचेंच सांगतों. तुमचा बंडू आज काल कोणाचेंहि न ऐकतां दिवसें दिवस बंड बनत चालला आहे, तेव्हां त्याला येथें पाठवा, ह्मणजे पहा, आठ दिवसांत मी त्याला कसा वळणीवर आणतों तो ! "

" मकुंदशेट, हें तुह्मीं कोणाविषयीं आणि कोणाजवळ बोलतां याचा नीट विचार केला काय ? " रागानें कपाळाला आंठ्या घालून भाऊसाहेब ह्मणाले.

" मी विचार केल्याशिवाय बोलतो, असं तुह्माला वाटतं कीं काय ? " शांत स्वरांत मुकुंदशेट ह्मणाले, " तुमचा बंडू दोन दिवसांनीं मोठा बडा मनुष्य होणार आहे. बडा ह्मणजे, तुह्मी त्या यशवंताची–खऱ्या वारसाची–मान मुरगाळून देशमुख बनलां, त्या देशमुखीचा तो तुमच्या मागून वारस बनणार आहे. तेव्हां आतां पासूनच त्याला चांगली शिक्षा लावून देणें हें पिता ह्या नात्यानें तुमचें पहिलें कर्तव्य आहे. "

" बस्स ! मुकुंदशेट, तुह्माला ह्या गोष्टी बोलण्याचा अधिकार नाहीं. " रागानें डोळे लाल करून भाऊसाहेब ह्मणाले.

" मग ह्या प्रभाकराला–दुसऱ्याच्या मुलाला पांच वर्षें नी सात वर्षें माझ्या पेढीवर अडकविण्याचा तुह्माला काय अधिकार ? "

" अधिकार पुष्कळ आहे. माझ्या मार्गांत आडवें येईल, तें मी वाटेल तसें कापून काढण्यास समर्थ आहें. "

" शेवटीं खऱ्या त्याच गोष्टी बाहेर पडल्या. हा प्रभाकर तुमच्या मार्गांत आड येतो ह्मणूनच हा सारा खटाटोप ! बळवंतराव, अद्यापि सावध व्हा, ऐका–मी तुमचा बालपणीचा एक स्नेही आहें. माझं ऐका, आणि हे ढंग आतां सोडून द्या. यांत तुह्माला कधींहि जय नाहीं. "

" मुकुंदशेट, तुह्मी हें माझ्या–प्रत्यक्ष देशमुखाच्या तोंडावर बोलतां आहांत हें लक्षांत ठेवा. माझ्याशीं असं तेढ्यानें वागाल तर मी सिधा मनुष्य नाहीं हें लक्षांत ठेवा–"

" अहो देशमुख, तुमचा तो विश्वासघातानें मिळविलेल्या देशमुखीचा टेंभा मजपुढें नका मिरवूं. मी तुह्मांला ओळखीत नाहीं असं का तुह्मांला वाटतं ? तुमची कर्तबगारी मी पूर्ण ओळखून आहें. तुह्मी लोकांचा विश्वासघातच करावा. तुमच्यासारख्याकडून

माझें काय वांकडं होणार आहे? " आपल्या शांत शब्दानें भाऊसाहेबांच्या मर्मस्थानीं घाव करीत मुकुंदशेट ह्मणाले. " प्रभाकर, ये– तुझ्यासारख्या कर्तव्यदक्ष मुलाचें नुकसान करण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं. उलट तुझें कल्याण व्हावें अशीच माझी इच्छा आहे. तुह्मांला ह्या बळवंतरावाचें कांहीं देणें आहे असें मी ऐकतों. तर घरीं गेल्यावर मला तो आंकडा कळीव ह्मणजे मी सर्व देणें देऊन टाकून तुह्मांला ह्या मनुष्याच्या कचाटींतून सोडवितों. आणि इतकेंहि मी तुला वचन देतों कीं, तुला जेव्हां जेव्हां ह्मणून तुह्माला पैशाची जरूर भासेल तेव्हां तेव्हां तूं मजकडे ये. मी मोठ्या आनंदानें तुला मदत करीन. जा—"

" शेटजी, आज आपण मला बाबांच्या ठिकाणीं अहांत ! " अत्यंत कृतज्ञतेनें प्रभाकर क्षणभरानें ह्मणाला, " आपले उपकार मी कधींहि विसरणार नाहीं. आज आपण मला ह्या नोकरीच्या बंधनांतून मुक्त केलेंत हेच मजवर अगणित उपकार आहेत. मला द्रव्य सहाय्य करण्यास तयार झालांत हा आपल्या मनाचा थोरपणा आहे. परंतु ह्या थोरपणाचा मी फायदा घेऊं इच्छित नाहीं. आपण मला स्वातंत्र्य दिलें आहे. आतां मी बाबांच्या इच्छेप्रमाणें रात्रंदिवस शेतांत खपून ह्या भाऊसाहेबांच्या कर्जांतून मुक्त होईन. "

" अरे माहित आहे तुझें स्वातंत्र्य ! आणि तें किती दिवस टिकतें तें !" तुच्छतेनें भाऊसाहेब ह्मणाले. आणि खुर्चीवरून उठतां उठतां मुकुंदशेटकडे वळून ते पुढें ह्मणाले, ' मुकुंदशेट, तुह्मीहि लक्षांत ठेवा कीं, सापाच्या शेपटीवर पाय दिल्यानें काय– "

" थांबा बळवंतराव, इतकी घाई करूं नका. आपल्या ह्या वृथा वल्गना ह्या प्रभाकरासारख्या किंवा त्या यशवंतासारख्या पोरासोराजवळच चालू द्या. मी व्यापारी बच्या आहे आणि आपल्या सारख्या सापाचे दांत कसे पाडावे हेंहि मला चांगलें कळत आहे- "

अकल्पित रीतीनें सर्व बाजू उलटली ! बरोबर भरलेला बार उलट अंगावर आला ! मुकुंदशेटचे शेवटचे शब्द ऐकून एखाद्या दंतहीन भुजंगाप्रमाणें सुस्कारे सोडीत भाऊसाहेब बाहेर आले आणि इकडे तिकडे न पाहतां मुकाट्यानें घोड्यावर स्वार होऊन चालते झाले.

---

# प्रकरण १० वें.

## सगुणाबाईची मनःस्थिति.



पिंजऱ्यांतून मोकळा सोडलेला पक्षी किती आनंदानें आणि स्वच्छंदानें उडतो, याची खरी कल्पना आज प्रभाकराला झाली. भाऊसाहेब निघून गेल्यावर तो शेटजीच्या खासगी खोलींतून बाहेर पडला. त्यावेळीं त्याची चर्या अत्यंत प्रफुल्लित दिसत होती. तो बाहेर येतांच पेढीवरील सर्व कामगारांचे लक्ष त्याच्याकडे लागलें. कारण थोड्या वेळापूर्वींच भाऊसाहेब कोणाबरोबरहि चकार शब्द न बोलतां रागारागानें घोड्यावर बसून गेले होते, त्यावरून शेटजीच्या खोलींत कांहीं तरी कमी जास्त प्रकार झाला असावा असें प्रत्येकानें अनुमान केलें होतें.

" काय प्रभाकर, काय झालं ? " मुख्य मुनिमानें त्याला जवळ येण्याची खूण करून हळूंच विचारलें.

" काय झालं म्हणून काय विचारतां ? आज सर्व स्वर्ग माझ्या हातीं आला ! भाऊसाहेबांची पक्की रेवडी उडाली ! शेटजीनीं त्यांना असं चीत केलं कीं यंव !–आतां आम्ही जातो आमच्या घरा, आमचा रामराम घ्यावा—"

" अरे पण थांब—"

छे !—प्रभाकरानें त्यांच्या बोलावण्याकडे लक्षच दिलें नाहीं. त्यानें पेढीच्या पायरीवरून ताडकन् रस्त्यांत उडी टाकिली. आतां त्याला स्वतंत्र्य प्राप्त झालें होतें. आणि त्या स्वतंत्र्याचा उपभोग घेत तो रस्त्यानें चालला होता. तो आतां इतक्या झपाट्यानें चालला होता कीं, त्याचें पाऊल क्वचित्च रस्त्याला लागत होतें. फुल शहरापासून तों घरापर्यंत—सहा मैलाचा रस्ता त्यानें हां हां म्हणतां मागें टाकिला. रस्त्यानें चालत असतांना क्षणोक्षणीं त्याच्या चर्येवर आनंदाचे निरनिराळे विकार दृष्टिगोचर होत होते.

आंबराईतून आंत शिरतांच दरवाजांत राधाआका उभी असलेली त्याच्या दृष्टीस पडली. तिच्या चर्येत निराशेची छटा स्पष्ट दिसत होती. प्रभाकर जवळ येतांच ती म्हणाली, " कायेरे प्रभाकर, तूं परतसा आलास ? कांहीं गडबड झाली वाटतं ? आतां नुकतेच भाऊसाहेब ताड्ताड् घोडा उडवीत येथें आले आणि तुझ्या आईवर कितीतरी रागावले–"

" हं–रागावूं दे. त्यांच्या रागावण्याला आतां कोण भीक घालतों ! "

" अरे पण झालं काय, तें तरी सांगशील ? "

" सांगतों–सगळं सांगतों. पण आई कुठें आहे ? "

" ती आहे वर. "

प्रभाकर तडक वर आला. राधाआकाहि त्याच्या मागें होतीच. सावित्रीबाई वर एका खोलींत सचिंत बसली होती. प्रभाकर आंत येतांच तिनें त्याच्याकडे आश्चर्ययुक्त मुद्रेनें पाहिलें.

" आई, मी आलों म्हणून तुला आश्चर्य वाटलें काय ? तूं माझ्यावर रागावलीस काय ? " पुढें होऊन प्रभाकर म्हणाला, " पण आई, मी तुला सर्व खरं खरं सांगतों. "

" काय सांगतोस ? "

" आई, मला पेढीवर नोकरीस ठेवण्यांत भाऊसाहेबांचा खरोखरीच कांहीं तरी दुष्ट हेतु होता. मी पुष्कळ विचार केला पण आज–आतां पेढीवर भाऊसाहेब आले होते. माझ्याकडून पांच वर्षांचा करारनामा लिहून घ्यावा असें त्यांच्या मनांत होतें. परंतु शेटनीं त्यांच्या पोटांतील सर्व काळें बाहेर काढिलें. " हळुहळूं प्रभाकरानें मुकुंदशेटच्या पेढीवर घडलेली सर्व हकीकत आपल्या आईला–सावत्र आईला सांगितली. ती ऐकून सावित्रीबाई क्षणभर विचार करींत राहिली. नंतर ती राधाआकाकडे वळून म्हणाली, " आतां आलं लक्षांत ! तरी म्हटलं, मघां भाऊसाहेब येथें अचानक आले आणि इतकें तडफडून का गेले? "

" काय काय म्हणाले ते ? " राधाआकानें विचारले, " ते एकदम आले तेव्हां मी मागीलदारीं होते. त्यांची ओरडा ओरड मी ऐकली, आणि मी वर येणार होते, तों ते तडक जिना उतरून गेले सुद्धां ! "

" ते ह्मणाले, ' तुमचा प्रभ्या मोठा हलकट पोर आहे. त्याला लहान थोर कांहीं कळत नाहीं. त्यानें माझा मुकुंदशेटच्या समक्ष पाणउतारा केला. माझा जर तो कारटा असतां तर तेथल्या तेथेंच त्याला घोड्याच्या चाबकानें लोळवला असता ' असें त्यांनीं एक सारखें प्रभाकरावर तोंड सोडलें. नंतर ते मला ह्मणाले, ' आतां तुमच्या विषयीं माझ्या मनांत किंचित्हि सहानुभूति राहिली नाहीं. मी तुह्मांला माझ्या कर्जाच्या फेडीबद्दल जी मुदत दिली होती ती सर्व आतां रद्द केली आहे. माझे गेल्या दोन महिन्यांचे बाकी राहिलेले व्याजाचे सर्व पैसे ह्या पांच तारखेच्या आंत मला मिळालेच पाहिजेत. ' अशी मला धमकी देऊन ते रागारागानें येथून चालते झाले. "

" असं काय ? " राधाआका मान हालवीत हालवीत ह्मणाली, " अग हा जात्याच दुष्ट, सगळ्यांना छळतोय पण हें कांहीं चांगलं नाहीं. देवाच्या ठिकाणीं हें कांहीं रुजूं होणार नाहीं. ह्याला केव्हां ना केव्हां तरी मुकुंदशेट सारखाच कोणीतरी पुरा डोक्याचा मिळेल ! बरं पण आतां पुढें काय ? "

" प्रभाकरानें तिकडच्या इच्छेप्रमाणें आतां शेतांतच जावं. "

" मलाहि तेंच संयुक्तिक दिसतं. "

" आई, मला आतां किती आनंद झाला ह्मणून सांगूं ! " आईचें आणि आकाचें भाषण ऐकून क्षणभरानें प्रभाकर ह्मणाला, " पहिल्यापासूनच शेतांत जाण्याची माझी किती कितीतरीं इच्छा होती. पण मध्येंच ह्या भाऊसाहेबांनीं येऊन घोंटाळा केला. बाबांनीं पण मला शेवटीं असंच सांगितलं होतं. आई, मी आतां अशी मेहनत करीन— बाबा काय करीत होते तें मी विसरलों नाहीं. मी पण तसंच करीन—"

प्रभाकरानें शक्य तितक्या शब्दांनीं आपणास स्वातंत्र्य मिळाल्याबद्दल झालेला आनंद आणि आपला उत्साह आका आणि आई यांना दाखविला. बराच वेळ त्यांच्या गोष्टी चालल्या होता. परंतु वाचकहो ! त्याच वेळीं देखमुखवाडींत काय प्रकार चालू आहे, तो आपण क्षणभर अवलोकन करूं या.

दिवाणखान्यांत अगदीं शुकशुकाट होता. वास्तविक ह्यावेळीं तेथें बडुंनाना आणि वत्सला ह्या पैकीं कोणीं तरी बिचाऱ्या यशवंत आणि कृष्णा यांची कुचेष्टा करीत धांगड

धिंगा घालीत असलेले दृष्टीस पडायचे ! दिवाणखान्याच्या पलीकडे असलेल्या खोलींत सगुणाबाई एका खिडकीजवळ सचिंत उभी होती. ती आज बऱ्याच दिवसांनीं आपल्या पलंगावरून उठून खिडकीजवळ आली होती. तिचें मन आज विशेष अस्वस्थ झालें होतें. बराच वेळ खिडकींत उभें राहिल्यावर तिचे पाय दुखूं लागले. खरोखरीच ती इतकावेळ खिडकींत उभी राहिली हेंच आश्चर्य होतें. कारण दोन दिवसापूर्वी इतराच्या मदती वांचून तिला क्वचितच उठून बसतां येत होतें, इतकी ती अशक्त झाली होती. असें असतांना आज ती इतकावेळ खिडकींत उभी राहिली, तेव्हां त्याला कारणहि तसेंच सबळ असलें पाहिजे यांत शंका नाहीं. उभें राहून पाय फार दुखूं लागतांच आतां जाऊन पलंगावर पडावें अशा उद्देशानें खिडकींतून ती मागें वळली, इतक्यांत दरवाजा वाजला आणि कृष्णा आतां आली.

" आत्या, तुम्ही एकट्याच उठून खिडकीजवळ आलांत ? "

" होय बाळे. मीं एकटीच–कोणाच्या साहाय्यावांचून उठलेली पाहून तुला आनंद झाला ना ? "

" खरंच आत्या, तुम्ही किनई रोज असं थोडें थोडें चालाल तर तुम्हाला लवकर बरं वाटेल. "

" होय वाटेल खरं पण–कृष्णा, बाळ तुझे डोळे कां इतके लाल दिसतात ?–पाहूं–कृष्णा, तूं रडत का होतीस ?–ये, इकडे ये. काय झालं बाळ ? " असें म्हणून सगुणाबाईनें तिला जवळ घेऊन तिच्या पाठीवरून हात फिरविला. त्याबरोबर तिनें ' आई–ई ' असा अगदीं हलके व दुःखयुक्त शब्द, हुंदका देत उच्चारिला.

" काय झालं ?–पाहूं–" असें म्हणून सगुणाबाईनें तिच्या अंगातलें पोलकें वर केलें, तेव्हां तिच्या पाठीवर पांच बोटांचा वळ उठलेला दिसला. " हें काय ? कोणी मारलें तुला बाळ ? "

कृष्णानें आपला दुःखवेग आवरण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. मधून मधून तिनें दोन-तिनदां मागें वळून दरवाजाकडे पाहिलें. तेव्हां तिचा आशय ओळखून सगुणाबाई म्हणाली, " तूं अशी भिऊं नको. दुर्गाताई नाहीं येणार आतां इकडे. सांग पाहूं. तुला कोणीं मारलं–सांग पाहूं ? "

" आत्या, आह्मी त्या नव्या तट्टाला पहात रामजी जवळ तबेल्यांत उभे होतो. " आपले डोळे पुसून कृष्णा बोलूं लागली, " रामजी मोठ्या घोड्याला खरारा करीत होता. इतक्यांत बंडुनाना आणि वत्सला हळूंच आमच्या मागून तिकडे आली. आणि बंडुनानानें माझें आणि यशवंतचें डोकें धरून जोरानें एकमेकांवर आपटलें.' हें पहा आत्या, केवढं टेंगूळ आलं आहे तें !" सगुणाबाईचा हात धरून तिनें आपल्या डोक्यावरील जागा दाखविली. " मग किनई आत्या, बंडुनाना रामजीला त्या तट्टावर जीन घालण्यास सांगूं लागला. परंतु रामजी त्याचें ऐकेना. तेव्हां आमच्याकडे वळून बंडुनाना ह्मणाला, 'अरे चोरांनो, तुह्मी ' नको ' ह्मणून रामजीला डोळ्यानें खुणावतां काय ?' पण आह्मी खरंच रामजीला खूण केली नाहीं. आह्मी मुकाट्यानें तेथें डोकें चोळीत उभे होतें. नंतर थोड्यावेळानें ' मला तट्टू बसायला मिळत नाहीं ह्मणून तुह्माला आनंद होतो काय ? थांबा आतां तुमचा आनंद काढतो. ' असें ह्मणून बंडुनाना आह्माला पकडण्याकरितां धांवला. यशवंत आणि मी पळालें. यशवंत तबेल्याच्या मागें गेला. इतक्यांत दुसऱ्या बाजूनें वत्सलेनें येऊन मला पकडले. तेव्हां बंडुनाना धांवत आला आणि माझ्या पाठींत जोरानें मारून पळाला. "

कृष्णानें सांगितलेली हकीकत सगुणाबाईनें मुकाट्यानें ऐकून घेतलेली आणि तिनें एक दीर्घश्वास सोडला. आपल्या मुलांनीं तिला मारिले, तथापि त्यांना शिक्षा करण्याचा अधिकार आपणास नसावा याचेंच तिला दुःख झालें. तिनें कृष्णाला जवळ घेऊन तिच्या गालाचें चुंबन घेतलें आणि तिच्या तोंडावरून हात फिरविला.

" कृष्णा, ती चांडाळ पोरं तशींच द्वाड आहेत-पण थांब, आतां दुर्गाताई इकडे आल्या ह्मणजे त्यांना सांगतें आणि कारट्यांचा बंदोबस्त करते. अलीकडे तीं फारच शेफारलीं आहेत. "

" नको, नको आत्या ! तुह्मी ताईंना सांगितलं ह्मणजे त्या मलाच रागें भरतील. त्या ह्मणतात, तूंच द्वाड आहेस. तूंच बाईंना जाऊन खोट्यानाट्या चहाड्या सांगतेस ! "

इतक्यांत दरवाजा पुनः उघडला आणि रामजी आंत आला. आपल्या धनिणीला खिडकीजवळ उभी असलेली पाहून त्यालाहि आनंद झाला. सगुणाबाईवर सर्व नोकर चाकरांचें अत्यंत प्रेम होतें. दादासाहेब देशमुखांच्या मागून देशमुखीचा सर्व अधिकार जरीं

भाऊसाहेबांच्या हातीं आला, तथापि मानमरातब मात्र सगुणाबाईकडेच राहिला. सर्वजण तिला ‘ बाईसाहेब ’ ह्मणत असत. परंतु तिची विधवा नणंद—दुर्गाताई घरांत आल्यावर सर्व सूत्रें तिनें आपल्या हातीं घेतलीं खरी परंतु सगुणाबाईचा मान मात्र तिला मिळेना. घरांत आपल्या भावाला ज्याप्रमाणें भाऊसाहेब ह्या नांवानें नोकरचाकर व इतर जन संबोधितात, त्याप्रमाणें आपणासहि सर्वांनीं ‘ ताईसाहेब ’ ह्मणावें, अशी तिची फार इच्छा होती. परंतु प्रयत्न करून तसें कांहीं जुळेना. सर्वजण सगुणाबाईलाच फक्त ‘बाई-साहेब ’ ह्मणून हांका मारित. परंतु तेंहि तिला खपेना. तिनें सर्वांना सक्त ताकिद देऊन सगुणाबाईला फक्त ‘ बाई ’ ह्मणून ह्मणावें असा सर्वत्र हुकूम सोडला. तथापि त्या हुकूमाची अमलबजावणी होईना. कारण सगुणाबाईबरोबर बोलण्याचा केव्हांहि प्रसंग येई, त्या वेळीं नोकरचाकर स्वाभाविकपणें तिला ‘ बाईसाहेब ’ ह्मणूनच ह्मणत. आणि अशा वेळीं दुर्गाताई जवळ असली, ह्मणजे तिला तिडीक उठत असे. असो.

रामजी आंत आल्यावर सगुणाबाईला मोठ्या आदबीनें ह्मणाला, “ बाईसाहेब, त्या नव्या तट्टावर जीव घालण्याकरितां बाबुरावानें मघापासून माझा जीव काढला आहे. आणि दुर्गाताईनीं हुकूम केला आहे कीं, त्या जनावराला ठाणावरून सोडावयाचें नाहीं. मग आतां मी काय करावें ? आपण हुकूम देत असाल तर जीन घालतो. ”

“ छे ! छे ! रामजी, त्या गोष्टी तूं मला विचारूं नयेस हेंच चांगलें ! ताईनीं सांगि-तलं आहे तसंच कर. जा. ”

“ मग दुर्गाताईना विचारूं का ? ”

रामजीनें दुर्गाताईचें नांव काढतांच दुर्गाताई आंत आली. तिला पाहतांच आपल्या आत्या जवळ बसलेली कृष्णा हळूच उठली आणि बाहेर जाऊं लागली. कारण कृष्णा किंवा यशवंत सगुणाबाईजवळ बसलेली तिला बिलकूल खपत नसे.

“ कायग कृष्णे, कांग मघां मोठ्यानें ओरडलीस ? तुला इतक्या मोठ्यानें ओरडायला झालं होतं तरी काय ? अलीकडे तूं फार दांडगी होत चालली आहेस बरं का ? ”

“ ताई ती पोर ओरडेल नाहीं तर काय करील ! ” सगुणाबाई ह्मणाली, “ त्या बंड्यानें पहा तिला कसं मारलं आहे तें ! ”

" बंडू उगाच नाहीं मारायचा ! तिनेंच प्रथम कांहीं तरी खोडी केली असेल. "

" नाहीं-नाहीं ताई. मी होतों तेथें. " मध्येंच रामजी ह्मणाला.

" होतास तर ठीक झालं !—पण तूं कशाला इकडे आलास ? "

" त्या नव्या तट्टावर जीन घालूं का, हें बाईसाहेबांस विचारण्याकरितां—"

" कांहीं विचारायला नको. मी एकदां सांगितलं ना कीं, त्या घोड्याला बाहेर काढावयाचें नाहीं ह्मणून ? मग कशाला आलास पुनः विचारायला ?—जा—चालता हो आपल्या कामाला. "

रामजी मुकाट्यानें बाहेर पडला. त्याच्यामागून कृष्णाहि हळूंच बाहेर पडली.

" ही नोकर मंडळीं अलीकडे फार शेफारली आहे. " थोड्यावेळानें दुर्गाताई ह्मणाली. " मी एकदां सांगितलं तरी हा रामजी तुह्माला विचारायला आलाच ! " सगुणाबाई काय उत्तर देतें, ते ऐकण्याकरितां दुर्गाबाई क्षणभर थांबली. परंतु सगुणाबाईनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. ती शून्य दृष्टीनें तशींच खिडकींतून बाहेर पहात होती. ती कांहींच उत्तर देत नाहीं असें पाहून दुर्गाताई पुढें ह्मणाली, " आज तुह्मी अशा का ?—कसला इतका विचार चालला आहे ? "

" ताई, आज मला बिलकूल चैन पडत नाहीं. मी निजून उठल्यापासून माझ्या छातींत एकसारखी धडकी भरल्यासारखें झालें आहे. "

" कां बरं ? औषध घेतलं का तुह्मी ? "

" हो घेतलं. पण आतां मी झोंपलें असतां मला एक चमत्कारिक स्वप्न पडलं. "

" हेंच तें ! तुमचं चुकतं तें हेंच ! स्वप्नं आह्माला नाहींत का पडत ? पण तुमचं अगदींच उलट ! एखाद्या क्षुल्लक स्वप्नावर विचार कर करून उगाच प्रकृति मात्र बिघवून घेतां. दुसरं काय ! "

" पण ताई, तें स्वप्नच तसं पडलं त्याला मी काय करूं ! "

" काय पडलं स्वप्न ? "

" त्या प्रभाकराचेंच ! " दीर्घ निश्वास सोडून सगुणाबाई म्हणाली " आज इकडून त्याचा करारनामा लिहून घ्यावयाचें होणार आहे—ताई हें चांगलं का? त्या गरीब कुटुंबाच्या मागें लागण्यांत काय बरं अर्थ आहे ? "

" का बरं? भाऊसाहेब करतात तें त्यांच्या बऱ्यासाठींच!"

" नाहीं नाहीं. बऱ्यासाठीं असतं तर मला स्वप्नच पडतं ना. स्वप्नांत दाजीबा माझ्यापुढें येऊन उभे राहिले आणि ह्मणाले, ' सगुणाबाई, तुह्मी दादासाहेब देशमुखांच्या मुली, बाणेदार आणि सत्यप्रिय यशवंतराव देशमुखाच्या–माझ्या हितचिंतक मित्राच्या भगिनी, तुह्माला हा अन्याय खपतो कसा? मी जिवंत असतांना तुमच्या पतीनें मला छळलं, माझ्या मृत्यूलाहि तेच कारण झाले. अद्यापि तुमच्या मनाची शांती झाली नाहीं काय? का आतां उगाच माझ्या लाडक्या प्रभाकराला छळतां?' असें ह्मणून त्यांनीं चमत्कारिक मुद्रा केली आणि कांहीं विलक्षण शब्द उच्चारिले. हा पहा, ताई, अद्यापि माझ्या अंगावर कांटा येतो आहे!" असें ह्मणतांच सगुणाबाईच्या अंगावर खरोखरीच शहारे आले.

" काय काय उच्चारिले शब्द? सांगा तरी?"

" ताई, मी ते शब्द कसें सांगूं! ते चांगलें का शब्द आहेत?"

" पण सांगितल्याशिवाय माणसाला कसं कळावं?–काय आहे तें कळलं म्हणजे त्याला कांहीं तरी इलाज करतां येईल."

" काय सांगूं! ते ह्मणाले, ' इकडे लवकरच देशोधडीला लागावं लागेल."

" हात्तिच्या! इतकंच ना?" ताई हांसत हांसत ह्मणाली, " माझ्या दादाला–भाऊसाहेब देशमुखांना देशोधडीला लागावं लागेल, हें शक्य तरी आहे काय? तुह्मी उगाच भलत्याच गोष्टी मनांत आणून झूरत असतां. ह्या अशा स्वप्नांतच्या गोष्टी कुठें खऱ्या होतात का?"

" पण—"

" मला का तट्टू मिळूं नये?—" धाड्कन दरवाजा उघडून बाबुराव आंत आला, " मला तट्टू नको ह्मणून कोणी सांगितलें?"

" मी सांगितलं." दुर्गाताई त्याच्याकडे वळून ह्मणाली.

दुर्गाताईनें रागानें दिलेलें उत्तर ऐकून बाबुराव तिच्याकडे रागानेंच पाहूं लागला.

" आई, मी तट्टू नेऊं का?" थोड्या वेळानें सगुणाबाईकडे वळून बाबुरावानें विचारलें.

" मला त्यांत कांहीं विचारूं नको."

" ठीक आहे तर. मी आतां असाच पायीं फुलशहरांत जाणार. आणि मला परत यावयाला रात्र झाली तर ताईसाहेब आपण भाऊसाहेबांना सांगा काय कारण तें—"

" अरे बंडू, पण तूं शहरांत कशाला जातोस ? काय—आहे काय तुझं तिथें ? " सगुणाबाईनें विचारलें.

" कशाला जातोस ह्मणजे ? त्या प्रभ्याला मोठी मिजास आली होती काय ? मला त्या दिवशीं मोठ्या बाजीरावाच्या गोष्टी सांगत होता. पण आज त्याचा करारनामा होणार आहे. तेव्हां आतां जाऊन त्याला विचारतो—"

" काय विचारतोस त्याला ? "

" श्वानवृत्ती ह्मणजे काय तें ! "

" बरं बरं, बंडू फार शहाणा होऊं नकोस ! " मनाचा मोठा हिय्या करून सगुणाबाई ह्मणाली.

" काय ग केलं मी आई ? काल भाऊसाहेबच तसं ह्मणत होते—"

" काय—काय ह्मणत होतों मी ! " एकदम आंत येऊन भाऊसाहेब ह्मणाले. त्यांची चर्या रागावलेली दिसत होती. ते आतां कोठून आले होतें, हें वाचकांना माहितीच आहे. गेल्या पंधरा वर्षांत आजच्या सारखा अनुभव त्यांना केव्हांच आला नव्हता. त्यांचें लग्न झाल्यापासून दादासाहेबांची मर्जी संपादन करण्यांत, त्यांच्या देशमुखीची सूत्रें आपलीशीं करण्यांत आणि स्वतः देशमुख बनण्यांत त्यांनीं आजवर जीं कुटील कारस्थानें रचिलीं, तीं सर्व यशस्वीच होत गेली. परंतु आज रचिलेलें कारस्थान मात्र त्यांच्या अंगाशीं आलें; इतकेंच नव्हें तर उलट मुकुंदशेटनीं त्यांच्या तोंडावर त्यांचा पाणउतारा केला. तेव्हां आज त्यांची चर्या रागीट दिसत होती, यांत नवल नाहीं.

" काल तुह्मी नाहीं का ह्मणालांत भाऊसाहेब, कीं उद्यां दोन प्रहरीं त्या प्रभाकराचा करारनामा— "

" पुनः त्या प्रभ्याचें नांव माझ्यापुढें !—" लडिवाळपणानें पुढें आलेल्या बंडूच्या खाडकन् तोंडांत मारून भाऊसाहेब रागानें पुढें ह्मणाले, " आतां पुनः सांगतो—सर्वांनीं लक्षांत ठेवा—इतःपर त्या प्रभ्याचें नांव मजपुढें कोणीहि उच्चारितां कामा नये. "

हा अचानक स्फोट झालेला पाहून सगुणाबाई आणि दुर्गाताई आश्चर्यानें अगदीं चकित झाल्या. भाऊसाहेबांनीं आपल्या मुलांवर आणि त्यांतल्या त्यांत आपल्या आवडत्या बंडूवर हात उगारण्याचा हा पहिला प्रसंग ! तेव्हां अर्थातच हा प्रसंग सर्वांना जाणवला. बंडुनाना तर भयभीत होऊन गाल चोळीत दोन पावलें मागें जाऊन उभा राहिला. त्याला जवळ घेऊन दुर्गाताई हळूंच ह्मणाली, " त्या पोरावर का उगाच राग ? दुसऱ्यांच्या पोरांचा राग आपल्या मुलांवर कशाला ? केलं काय त्या प्रभ्यानें असं ? "

" केलं काय ?–नको त्या चांडाळाचं माझ्यासमोर नांव काढूं. "

परंतु ह्या उत्तरानें दुर्गाताईचें थोडेंच समाधान होणार ? तिनें रात्रीं जेवणावर पुनः तीच गोष्ट काढून त्या दिवशीं घडलेला सर्व प्रकार हळुहळू समजून घेतला. प्रभाकराला करारनामा लिहून द्यावा लागला नाहीं, ह्याबद्दल देशमुखांच्या घरांत जर कोणाला आनंद झाला असेल, तर तो फक्त सगुणाबाईलाच ! भाऊसाहेबांना त्या दिवशीं रात्रीं मन अस्वस्थ असल्यामुळें बिलकूल झोंप लागली नाहीं. परंतु सगुणाबाईची त्या दिवसाची स्थिति आपल्या नवऱ्याच्या अगदीं विरुद्ध होती. रात्रीं ती बिछान्यावर पडली असतां तिला कितीतरी हलकें वाटलें. आज बऱ्याच दिवसांनीं तिच्या मनाची अशी प्रसन्न स्थिति झाली. तिनें झोंपण्यापूर्वी अंतःकरणपूर्वक हात जोडले आणि ती म्हणाली, " देवा ! आज ज्या गोष्टीनें माझ्या पतीला दुःख झालें, त्याच गोष्टीनें मला आनंद झाला आहे. वास्तविक पतीच्या मनाविरुद्ध झालेल्या गोष्टींत स्त्रीनें आनंद मानणें, हें पाप आहे. पण मी तरी काय करूं ? मला आनंद का होत आहे, हें तूं पूर्णपणें जाणतच आहेस. तूं सर्वसाक्षी आहेस. तूं सर्वज्ञ आहेस, आणि सर्व न्यायी आहेस. मला क्षमा कर. "

असें ह्मणून तिनें अनन्य भावानें ईश्वराला नमस्कार केला. त्या रात्रीं तिला खरोखरीच फार शांत झोंप लागली.

---

# प्रकरण ११ वें.



## यशवंताची दिनचर्या.



आपल्या अचाट बुद्धीसामर्थ्यानें मानवांनीं प्रत्यक्ष पंचमहाभूतांना आपल्या हातांतील बाहुली करून ठेविली आहेत, असें ह्मणतात, तथापि ईश्वरानें आपल्या अस्तित्वाची जाणीव रहावी ह्मणूनच कीं काय, अशा कित्येक क्षुल्लक दिसणाऱ्या गोष्टी मानवांच्या अचाट बुद्धीला अगम्य करून ठेविल्या आहेत. ह्या गोष्टींत फेरबदल करण्याचें किंवा त्यांच्या गतीस अवरोध करण्याचें सामर्थ्य मानवांत नाहीं, हीच मोठी समाधानाची गोष्ट आहे. ईश्वराच्या अस्तित्वाची प्रत्यक्ष ओळख पटवून देणारा काळ आहे. त्याची गती अबाधित चालू आहे.

गेल्या प्रकरणांत घडलेल्या गोष्टीला तीन वर्षें लोटलीं. हा काळ हां हां ह्मणतां निघून गेला. ह्या तीन वर्षांत आमच्या कथानकांतील पात्रांनीं जें बरें वाईट आयुष्यक्रमण केलें, त्याचें आ ण ह्या प्रकरणांत सिंहावलोकन करूं, ह्मणजे संविधानक पुढें चालविण्यास ठीक पडेल. भाऊसाहेबांचा स्वभाव गेल्या तीन वर्षांत विशेष चिडखोर बनला होता. ते सहसा आपल्या मुलांवर रागवत नसत. त्यांचा सर्व राग यशवंतवर असे. कारण आतां तो सोळावर्षांचा झाला होता. परंतु सर्व मुलांत त्याची प्रकृति अशक्त होती. त्यामुळें त्याची नेहमींची कांहींतरीं कुरकुर असे. शिवाय त्याचा स्वभाव लहरी आणि करारी असल्यामुळें त्याच्या मनालाहि क्वचितच स्वस्थता असे. त्याच्या इंग्रजी चार इयत्ता झाल्यावर त्याला शाळा सोडावीं लागली होती. कारण गतवर्षीं तो दोन महिने तापानें फार आजारी होता. पण त्या कठीण आजारीपणांत केवळ सगुणाबाई मुळेंच तो जगला. नाहींतर त्याची अवस्था फार कठीण होती. देशमुखाच्या इस्टेटीमध्यें तोच आडवा असल्यामुळें आजारीपणांत भाऊसाहेबांनीं त्याला कसें वागविलें असेल याची कल्पना सहज होण्यासारखी आहे. त्यांनीं यशवंताला वेळेवर औषधोचार देखील

केला नाहीं. दुर्गाताईचें वर्तनहि भावासारखेंच होतें. क्वचित् प्रसंगीं अगदीं असह्य झाल्यावर सगुणाबाई बोलली ह्मणजे "होतय् काय त्याला ?–आलाहे जरासा ताप–होईल उद्यां बरा :" असें तिनें उत्तर द्यावें. बाबुराव तर केवळ बापाची प्रतिमा ! त्यानेंहि सातवी इयत्ता होतांच यशवंता बरोबरच शाळा सोडून चार सहा महिने झाले, आपल्या मालकीच्या खाणीवर जाण्यास सुरवात केली होती. अलीकडे बाबुराव ह्मणजे प्रती देशमुखच बनला होता, वत्सला आतां चौदा वर्षांची उपवर झाली होती. त्याचप्रमाणें तिची धाकटी बहिण इंदिरा ऊर्फ इंदुबाळ, ही आतां सहा वर्षांची झाली होती. दोघींहि बहिणी रुंद हाडाच्या आणि लाडालाडानें वाढलेल्या असल्यामुळें, होत्या त्यापेक्षां चारदोन वर्षांनीं मोठ्याच दिसत होत्या. आतां राहतां राहिली कृष्णी. ही आणि वत्सला, दोघींहि वयानें सारख्याच. परंतु त्यांच्यांत जमिन अस्मानाचें अंतर होतें. मी बारीक सडपातळ जरी होती, तरी वयपरत्वें तारुण्यावस्थेंत तिचा नुकतांच प्रवेश झालेला असल्यामुळें खरोखरीच एखाद्या कादंबरींतील नायिकेप्रमाणें ती वर्णन करण्यास योग्य झाली होती. वास्तविक पाहतां एका वर्षापूर्वीच वत्सलेचें लग्न व्हावयास पाहिजे होतें. परंतु भाऊसाहेबांनीं ते मुद्दामच लांबणीवर टाकलें होतें. कारण तिचें लग्न केलें. ह्मणजे कृष्णींचेंहि लग्न करणें कर्तव्य होतें. आणि तसें करणें भाऊसाहेबांस पसंत नव्हतें. आपल्या वत्सलेचें लग्न देशमुखांच्या इतमानाला शोभेल असें कडाक्यानें करावयाचें आणि कृष्णीचें लग्न जेमतेम उरकून घ्यावयाचें असा त्यांचा विचार होता. सगुणाबाईंची प्रकृति होती तशीच अशक्त होती. दुर्गाताई तर आतां सर्व घराची मुखत्यारीणच झाली होती, असें ह्मणण्यांत अतिशयोक्ति होईल असें आह्मास वाटत नाहीं.

आतां ह्या प्रकरणांत यशवंत आणि कृष्णी ह्या बहिणभांवडांची भाऊसाहेबांच्या घरांतील दिनचर्या कशी होती, याचें सिंहावलोकन केल्यास बऱ्याच गोष्टी वाचकांस कळतील. वत्सलेला शिकण्यासाठीं जसें आस्थेनें भाऊसाहेबांनीं शाळेंत घातले होते आणि वरीं एक वृद्ध तात्यापंतोजी ठेवला होता, तशी सोय कृष्णीला नव्हती. ती मास्तरजवळ बसलेली किंवा वत्सला मास्तरजवळ बसलेली असतां कृष्णा तिच्याजवळ गेली तर तें सुद्धां भाऊसाहेबांस किंवा दुर्गाताईस खपत नसे. तिचें घरांतील मुख्य काम म्हटलें म्हणजे इंदुबाळाला सदोदित कडेवर–खांद्यावर घेऊन खेळविणें. सगुणाबाईला मात्र तें पाहवत नसे.

आपलीं मुलें, पति आणि नणंद ही सर्वजण यशवंत आणि कृष्णा यांचा फार छळ करतात, हें पाहून ती मनांत फार झुरत असे. जवळपास कोणी नसल्यावर ती कृष्णाला म्हणत असे, 'कृष्णा, बाळ ठेव त्या कार्टीला खालीं. आतां ती काय लहान आहे !—इंदे, उतर खालीं. लाज नाहीं वाटत तुला कडेवर बसून मिरवायला ! खेळायला काय होतो तुला रोग ! सदान्‌कदा त्या कृष्णेच्या कडेवर मिरवीत असतेस, तर तुझे कशानें पाय मोडले आहेत ?' अशा तऱ्हेनें ती आपल्या पोरांना मोडून काढीत असे. पण पोरें कसली खाष्ट ! आईचा एकहि गुण त्या तीन मुलांपैकीं एकाच्याहि अंगीं उतरला नव्हता. अशा रीतीनें कृष्णाचा सर्व दिवस मुलीला सांभाळण्यांत आणि दुर्गाताईच्या हुकूमाखालीं घरांतील कामें करण्यांत जात असे. तरी तिनें कानावर पडतील तीच दोन अक्षरें ध्यानांत ठेऊन व सगुणाबाईनें सर्व निजानिज झाल्यावर ज्या दोन गोष्टी शिकविल्या त्याच्या सहाय्यानें आपलें लिहिणें वाचणें अगदीं गुप्तपणें चालविलें होतें. तिला शिकण्याची फार हौस होती. अलीकडे त्या पोरीला जरी घरांतील एखाद्या मोलकरणीप्रमाणें सर्व दिवस घरांत राबावें लागत होते, तरी सगुणाआत्याचा सर्व दिवसांतून एखाद दुसरा कानीं पडणारा प्रेमळ शब्द उत्साही बनवीत असे. तिला आतां चांगलें कळूं लागलें होतें. तिच्या कोमल अंतःकरणाला फक्त दोनच गोष्टींच्या वेदना होत होत्या. एक—सगुणा आत्याच्या दुखाईत स्थितीबद्दल आणि दुसरी—यशवंताबद्दल !

येथें यशवंताविषयीं वाचकांना माहिती करून देणें म्हणजे खरोखरीच फार बिकट काम आहे. त्याच्या स्वभावाबद्दल, शिक्षणाबद्दल आणि प्रकृतिबद्दल थोडासा उल्लेख वर येऊन गेलाच आहे. आतां त्याची दिनचर्या कशी आहे, तें आपण पाहूं. त्याच्या इंग्रजी चार यत्ता झाल्यावर केवळ प्रकृतीच्या अस्वस्थतेमुळें त्याला शाळा सोडावी लागली. परंतु तो घरीं बसलेला भाऊसाहेबांना खपेना. त्याच्यावर भाऊसाहेबांचा इतका दांत का होता, त्याचें कारण वाचकांना अवगत आहेच. आपल्या मार्गांतून त्याचा काटा दूर करण्याकरितां तो आजारीपणांतून उठल्यावर भाऊसाहेबांनीं त्याला छळण्याची शक्य तितकी शिकस्त करून पाहिली. परंतु कशांतच त्यांना यश आलें नाहीं. प्रथम त्यांनीं आपल्या एक वकील मित्राकडे त्याला कारकून म्हणून ठेविलें, तेथून गावांतील एका ओळखीच्या दुकानदाराकडे हिशोब लिहिण्याकरितां ठेविले, नंतर एका चिताऱ्याच्या हाता

खालीं पाटया रंगविण्याकरितां ठेविले, अशा रीतीनें जेथें जेथें भाऊसाहेबांनीं त्याला पाठविलें, तेथें तो आठदहा दिवसा पेक्षां जास्त राहिलाच नाहीं. प्रत्येकानें त्याची नाजुक आणि अगदीं अशक्त प्रकृति पाहून घरीं राहण्यास सांगितलें. तो घरीं आला ह्मणजे भाऊसाहेब त्याच्यावर कातावत असत. तो परत येण्याचें खरें कारण जरी त्यांना पूर्णपणें माहित असे, तरी " तुला काम करायला नको. तुला फार चरबी चढली आहे. तुझी मस्ती मी अशी जिरवीन कीं याद राखून ठेव ! " अशाप्रकारें रागास येऊन ते त्याचा मुद्दाम उपासमार करीत असत. त्याची ही स्थिति पाहून बिचाऱ्या सगुणाबाईचा जीव तीळ तीळ तुटत असे. आपल्या भावाच्या ह्या दोन मुलांचा, आपल्या पतीकडून होत असलेला हा राक्षसी छळ पाहून त्या साध्वीच्या रक्ताचें पाणी पाणी होत असे.

शेवटीं भाऊसाहेबांनीं एक नवीन विचार अमलांत आणण्याचा विचार केला. एके दिवशी यशवंताला सकाळीं उठण्यास जरा जास्त उशीर झाला. तेंच कारण घेऊन त्यांनीं त्याला आपणासमोर बोलाविले. आणि रागानें शब्द प्रहार करण्यास सुरुवात केली. ते ह्मणाले, "येशा, तूं आतां दिवसे दिवस जास्त आळशी बनत चाललास ! तुझी मी जितकी गय करतो, तितका तूं माझ्या डोक्यावर चढूं लागला आहेस. आतां तसें करून उपयोगी नाहीं, उद्यांपासून तूं आपल्या खाणीवर जात जा. अलीकडे तेथें कामहि फार वाढत चाललें आहे. आणि मला अधिक एक दोन मनुष्यांचीं जरूरी आहे. तो बंडु जातो तसा तूं जात जा. तुला तेथें जाऊन काय करायचें तें मी सर्व आज हरिभाऊला सांगून ठेवतो. जा."

भाऊसाहेबांचा एकदां हुकूम सुटला ह्मणजे तें ब्रह्मवाक्य ! तेव्हां त्यांच्या हुकूमाप्रमाणें वागल्याशिवाय यशवंताला दुसरा मार्गच नव्हता. प्रकृतिविषयीं त्याची मुख्य तक्रार झटली ह्मणजे, जरा थोडे जास्त श्रम पडले ह्मणजे त्याच्या छातींत दुखत असे. आणि तो आजार बाहेरून दिसण्यांत येत नसल्यामुळें सगुणाबाई शिवाय इतर सर्वजण तें ढोंग आहे, असें ह्मणत.

यशवंताला खाणीवर जाण्यास सांगितलें आहे, असें सगुणाबाईस कळतांच तिचें मन अगदीं अस्वस्थ झालें. रोज त्याला पांच मैल जावें यावें लागणार हा एकच विचार तिला चैन पडूं देईना ! खरोखरीच त्या वेळीं यशवंताची स्थिति फार केविलवाणी होती. त्याचा स्वभाव मानी असल्यामुळें स्वतःला होणारे दुःख तो कोणाजवळहि बोलत नसे. प्रथम प्रथम त्यानें सगुणाबाईजवळ आपल्या प्रकृतीची रडकथा सांगावी. पण ती आप-

णाकरितां दुःखी होते, असें त्याच्या लक्षांत आल्यापासून तो तिच्याजवळहि बोलेनासा झाला. तथापि सगुणाबाईला कळत नव्हतें असें नाही परंतु कळून तरी उपयोग काय ?

आज यशवंताला उठण्याकरितां वेळ झाला, त्याला कांहींतरी कारण होतें. तो आपणाकडून होईल तितका प्रयत्न करून भाऊसाहेब न बोलतील अशा प्रकारें वागण्याचा प्रयत्न करीत असे. परंतु त्या पोराचा दैवयोगच असा विलक्षण होता कीं, बहुतेक करून प्रत्येक दिवशीं कांहीं ना कांहीं कारण उपस्थित होऊन भाऊसाहेब त्याच्यावर राग काढीत असत. आधल्या दिवशीं रात्रीं झोंपतांनाच त्यानें दुसऱ्या दिवसाचें भविष्य वर्तवून ठेविलें होतें. बिछान्यावर आंग टाकतांच रात्रीं एकाएकीं त्याच्या छातींत कळ आली. आणि त्या वेदनांनीं बहुतेक सर्व रात्र तो तळमळत होता. पुढें पहाटेच्या सुमारास त्याला झोंप लागली. आणि शेवटीं त्याला वाटलें होतें, त्यापेक्षां जास्त प्रकार सकाळीं घडला. फक्त भाऊसाहेब रागावून गप्प रहातें तर त्याबद्दल त्याला इतकें वाईट वाटतें ना ! कारण भाऊसाहेबांकडून अशा प्रकाराचा खुराक त्याला रोज मिळत असे. परंतु आज भाऊसाहेबांनीं जी एक खाणीवर जाण्याची नवीन कामगिरी त्याच्या शिरावर लादली, ती ऐकून मात्र त्याचें हात पाय गळले. त्यावेळीं जर एखाद्या डॉक्टरानें त्याची प्रकृति तपासून पाहिली असती, तर खात्रीनें असें मत दिलें असतें कीं, ' ह्या मुलाला अंतःकरणाचा आजार झाला असून ह्याची शक्ति फार क्षीण झाली आहे. ह्याला बिछान्यावरून किंचित् सुद्धां हलूं देतां उपयोगी नाहीं. ' परंतु ह्या सर्व गोष्टींचा विचार कोणी करावयाचा ? जसा बिनवारशी माल वाटेल त्यानें वाटेल तसा वापरावा, तशी स्थिति यशवंत आणि कृष्णा ह्या बहिणभावंडांची झाली होती.

हळुहळू संध्याकाळचा सुमार झाला. कृष्णा आपल्या रोजच्या क्रमाप्रमाणें इंदूला—इंद्रिरेला अद्यापि सर्व जण इंदूबाळच ह्मणत असत,—घेऊन शेतांत फिरावयास जाण्याकरिता तयार झाली. येथें निराळ्या शब्दांत सांगावयाचें ह्मणजे कृष्णा ही इंदूला संभाळणारी दाईच बनली होती.

" कृष्णा, बाळ यशवंत कुठें आहे ? " इंदूचे कपडे नेण्याकरितां कृष्णा खोलींत आली तेव्हां सगुणाबाईनें तिला विचारलें, " दुपारपासून तो माझ्या दृष्टीसच पडला नाहीं ! "

" आत्या, तो वरच वळकटीवर पडला आहे. दुपारीं तो तुमच्याकडे येणार होता पण येथें ताई बसल्या होत्या. मी कितीदां तरी त्याला विचारलं पण काय होतं तें तो सांगतच

नाहीं. " असें ह्मणून सगुणाबाईच्या अगदीं बिछान्याजवळ जाऊन कृष्णा पुढें ह्मणाली, " आत्या, आज सकाळीं भाऊसाहेब ह्मणाले, ते खरं कां? उद्यांपासून यशवंताला खाणीवर जावेंच लागेल काय ? "

सगुणाबाईनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. आणि ती उत्तर तरी काय देणार ? क्षणभरानें कृष्णा पुढें ह्मणाली, " आत्या, आतां ताई स्वयपाक घरांत आहे. येथें आतां कोणी नाहीं. मी यशवंताला तुमच्या जवळ पाठवूं का? तुमच्याजवळ तो काय होतं तें सांगेल."

सगुणाबाईला " होय " ह्मणण्याशिवाय गत्यंतरच नव्हतें. तिनें फक्त मानेनें खूण करून आपली संमति दर्शविली. सकाळपासून ती ह्याच विचारांत होती. आपल्या पतीनें यशवंताला खाणीवर जावयास सांगितलें आहे, आणि आपणास त्याला नको जाऊं ह्मणून सांगण्याचें सामर्थ्य नाहीं. तेव्हां त्याला बोलावून आपण सांगणार तरी काय, आणि बोलणार तरी काय, हा तिला प्रश्न पडला होता. फार झालें, तर आपण त्याच्याबरोबर शेवटीं दोन अश्रू गाळूं ह्या पलीकडे आपणाकडून कांहीं व्हावयाचें नाहीं, हेंहि ती जाणून होती.

कृष्णा धांवतच वर गेली. तिनें ह्मटल्याप्रमाणें यशवंत वरच्या दिवाणखान्याच्या कोपऱ्यांत, गुंडाळून ठेविलेल्या बिछान्याच्या वळकटीला टेकून डोळे मिटून स्वस्थ पडला होता. कृष्णा हळूंच त्याच्याजवळ बसली आणि त्याच्या पाठीवर हात ठेऊन प्रेमानें ह्मणाली, " यशवंत, उठ, कितीवेळ झाला तूं असा पडून आहेस. तुला काय होतं तें मला नाहींना तूं सांगत ? "

" कृष्णा, मला कांहीं होतं ह्मणून तुला कोणी सांगितलं ? मी आज मुद्दाम शक्य तितकी विश्रांति घेत आहे. तुला माहित आहेना, मला उद्यांपासून खाणीवर जाण्याचा हुकूम झाला तो ? "

" मग तूं ' आ—ई—ई—आई—ई ' असा कुंथतोस का ? "

" केव्हां ?—मुळींच नाहीं. तुला तसं वाटलं असेल. "

" बरं तर मग खालीं चल. तुला आत्या बोलावीत आहेत. आतां आत्याजवळ कोणी नाहीं. चल—"

आपल्या बहिणीला खरें कारण कळूं नये ह्मणून यशवंतानें बरीच संपादणी केली. परंतु ' अंदरकी बात ' त्याच्या जिवालाच ठाऊक ! तो हळुहळूं उठला आणि कृष्णाबरोबर खालीं आला.

---

# प्रकरण १२ वें.



## खाणीवर जातांना.





गेल्या प्रकरणांत यशवंताच्या दीनचर्येबरोबर देशमुखवाडींतील प्रत्येक व्यक्तीच्या गेल्या तीन वर्षांच्या दिनचर्येचें सिंहावलोकन केलें आहे. आतां राहिली दाजीबांची मंडळी! दहाव्या प्रकरणांत उल्लेख केल्याप्रमाणें प्रभाकरानें भाऊसाहेबांचा व्यूह फोडून बाहेर पडतांच आपल्या कैलासवासी पूज्य पित्याच्या इच्छेप्रमाणें शेताची सर्व व्यवस्था आपल्यां देखरेखी खालीं घेतली. शेतकी हा त्याचा आवडता विषय असल्याकारणानें जीवापाड मेहनत करून, गेल्या तीन वर्षांत पाऊस जरी समाधानकारक पडला नव्हता तरी त्यानें भाऊसाहेबांचें व्याज वक्तशीर देऊनहि मुदलापैकीं एक त्रितीआंश रक्कम फेडून टाकिली. त्यानें आपलें तन आणि मन शेताच्या आणि बागेच्या सुधारणेकडे लावलें होतें. इतकें करूनहि त्यानें संस्कृतचा अभ्यास नेटानें चाललाच होता.

पितृआज्ञा हेंच आपलें जगांतील मुख्य कर्तव्य असें समजून कोणतीहि गोष्ट करतांना प्रभाकर प्रथम आपल्या सावत्र आईला—सावित्रीबाईला विचारीत असें. तो अष्टौप्रहर शेतांत खपत असे. त्यानें आपल्या कृतीनें आणि प्रेमळ स्वभावानें सर्वांचा लोभ संपादन केला होता. देशमुखांच्या घरांतील नोकर चाकर आणि कुळें सुद्धां भाऊसाहेबापेक्षां त्याला जास्त चाहूं लागली, इतकें त्याचें वर्तन मनाला मोह पाडणारें होतें; मग त्याची स्वतःचीं कुळें त्याला जीव कीं प्राण करतलि यांत नवल तें काय! त्यानें गेल्या तीन वर्षांच्या अवधींत कोणालाहि रावजींची आठवण सुद्धां होऊं दिली नाहीं. असें जरी त्याचें वर्तन गोड होतें, तरी सावित्रीबाईचा ओढा त्याच्यापेक्षां मधुकराकडे जास्तच होता. आणि तेंहि साहजिकच आहे. कारण किती झालें तरी प्रभाकर तिचा सावत्र मुलगा!

मधुकराला पुण्यांत बोर्डिंगमध्यें ठेविलें होते. त्याला तेथें पाठवावें अशी प्रभाकराची बिलकूल इच्छा नव्हती. तो अद्यापि लहान आहे. तेव्हां आपण स्वतः त्याला घरींच शिकवूं असें प्रभाकराचें मत होतें, परंतु सावित्रीबाईला तें पसंत पडलें नाहीं. तिनें आपल्या मुलाला पुण्यास पाठविण्यासाठीं एक मुख्य सबब पुढें केली ती ही कीं, तो तेथें राहिल्यानें भाऊसाहेबांच्या उनाड बंडुनानाच्या संगतीला लागून बिघडेल. परंतु ह्या सबबींत कांहींच अर्थ नव्हता. आपल्या मुलाला पुण्यांत पाठविण्याचा तिचा मुख्य उद्देश निराळाच होता. पुण्यांत पाठविल्यानें मुलें चांगली शिकून विद्वान होतात असा तिचा समज झाला होता. त्याप्रमाणें आपला मुलगा चांगला विद्वान होऊन आला, ह्मणजे प्रभाकर जरी वडील असला तरी त्याच्यापुढें प्रभाकराचें कांहीं चालणार नाहीं, असें तिला वाटत होतें आणि ह्या पुढल्या आशेवर भिस्त ठेवून तिनें मनाचा मोठा हिय्या करून मधुकराला इतक्या लहान वयांत पुण्यास पाठविलें होतें.

परंतु मानवी इच्छेप्रमाणें सर्वच गोष्टी घडून येतात, असें थोडेंच शास्त्र आहे ! आणि तसें शास्त्र पूर्वजांनीं करून ठेविलें नाहीं, ह्मणूनच सर्व सुरळीत चाललें आहे. मधुकराला पुण्यास जाऊन दिड वर्ष झालें होतें. तेथें त्याला लागणारा दरमहाचा ठराविक खर्च प्रभाकर वेळेवर पाठवित होता. परंतु अलीकडे चार महिने झाले, कांहीं ना कांहीं सबबी लिहून मधुकर जास्त पैसे मागवूं लागला होता. पहिले दोन महिने त्याकडे दुर्लक्ष करून प्रभाकरानें जास्त पैसे रवाना केले. परंतु तिसऱ्या महिन्याला मधुकरानें पहिल्या दोन महिन्यापेक्षां जेव्हां जास्त पैशाची मागणी केली, तेव्हां तो आईजवळ बोलला. अर्थात त्याच्या चौकशीला सुरवात झाली. प्रथम प्रभाकरानें केशव शास्त्र्यांकडून त्यांच्या एका पुण्यांतील मित्राला पत्र लिहून त्यांत मधुकराविषयीं खासगी चौकशी करण्यास सांगितलें. त्या पत्राचें उत्तर काळजी उत्पन्न करणारें आलें. तेव्हां आतां पुढें काय करावें, असा सावित्रीबाईला मोठा प्रश्न पडला.

" प्रभाकर, आतां पुढें काय करायचं ? मला वाटतं, त्याला आतां पुण्याहून घरींच बोलवावा. मी ज्या पापाला इकडे भीत होतें तेंच तेथें माझ्या पुढें उभें राहिलें. "

" आई, असेंच नाहीं केवळ ह्मणतां येणार ! तूं मधुकराला तेथें पाठविलास तेव्हां असं होईल, असं तुला स्वप्न तरी पडलं होतं काय ? "

" ह्मणूनच ह्मणते ना कीं, हें माझें पाप आतां उभें राहिलें ह्मणून ! "

" मग आतां मला असें वाटतें, मधुकरानें मागविलेले पैसे त्याला पोष्टानें न पाठवितां एक दोन दिवसांत येथली सर्व आंवरा आंवर करून मी पुण्यास जातो. आणि स्वतः खरा प्रकार काय आहे, तो पाहून मग काय ते ठरवितो. "

" होय, तूं म्हणतोस हा विचार ठीक आहे. "

सावित्रीबाईला हा विचार पसंत पडला. दुसऱ्या दिवशीं प्रभाकरानें केशवशास्त्र्यांकडून त्यांच्या पुण्याच्या मित्राला पुनः एक पत्र पाठविलें आणि आपल्या कामाची व्यवस्था लावून तो तिसऱ्या दिवशीं पुण्यास जाण्याकरितां निघाला.

सकाळचा प्रहर झाला होता. प्रभाकरानें आपलें जेवण आटोपून बंदरावर जाण्याकरितां टांगा केला. काळकाईचा खोरा हें बंदर त्यांच्या घरापासून जवळ जवळ आठ मैल होतें; हें वाचकांच्या स्मरणांत असेलच! बंदरांत एक वाजतां बोट येत असे. तेथून मुंबईस जाऊन रात्रीच्या गाडीनें पुण्यास जावें, असा प्रभाकरानें विचार ठरविला होता. त्याप्रमाणें घरून निघाल्यावर त्याचा टांगा दोन मैल गेल्यावर रस्त्याच्या कडेनें हळुहळू जात असलेला यशवंत त्याच्या दृष्टीस पडला. त्याबरोबर प्रभाकरानें टांगा उभा केला.

" यशवंत, आज सकाळींच अशा उन्हाचा निघालास कुठें? "

" जातो आहे खाणीवर. " दुःख स्वरांत यशवंतानें उत्तर दिलें, " आजपासून आमची नेमणूक खाणीवर झाली आहे. "

" म्हणजे? "

" म्हणजे माझें दुर्दैव ! "

" पण तूं चालत इतक्या लांब जाणार कीं काय? " क्षणभरानें प्रभाकरानें विचारलें.

" नाहीं तर काय? कोण देतो आहे मला बसायला गाडी ! "

" ये—" आपल्या बाजूला टांग्यांत जागा करून प्रभाकर ह्मणाला, " मी आतां बंदरावर जात आहे, वाटेंत तुला उतरवीन. "

"तें ठीक आहे. आज तूं मला टांग्यांत नेशील, पण पुढें?—पण प्रभाकर तूं आज बंदरावर का जात आहेत? " मुद्दाम विषय बदलून यशवंत ह्मणाला. प्रभाकरानें आपण कुठें जाण्याकरितां निघालों आहोंत, त्याविषयीं संक्षिप्त हकीकत सांगितल्यावर

यशवंत एक दीर्घ श्वास सोडून म्हणाला, " अरेरे! मधुकर किती मूर्ख आहे ! तो असा वागतोय असें कळतांच सावित्रीबाई इतक्या आस्थेनें तुला पुण्यास पाठवीत आहेत. प्रभाकर अशी माझी काळजी घेण्यास माझी आई असती तर–" यशवंताला एकदम हुंदका आला आणि त्याबरोबर त्याच्या छातींत कळ आली. त्यानें एक हात छातीवर ठेऊन दुसरा हात आधाराकरितां टांग्याच्या चाकावर ठेविला, तोंच त्याचा तोल जाऊन तो धाडकन् रस्त्यांत पडला. प्रभाकरानें चटकन् टांग्यांतून खालीं उडी टाकिली. आणि त्याला हळूंच वर उचललें.

" यशवंत, कळ आलीका तुझ्या छातींत ? केव्हांपासून अशी कळ येतें ? "

" काय सांगूं तुला प्रभाकर ! " त्याच्या खांद्यावर मान टेंकून यशवंत ह्मणाला. त्याच्या डोळ्यांतून अश्रूधारा सुरू होत्या. थोड्यावेळानें तो पूर्ण निराशेनें ह्मणाला, " प्रभाकर, मला मरण येईल तर फार बरें होईल ! "

हें यशवंतानें पूर्ण निराशेनें उच्चारलेलें वाक्य ऐकून प्रभाकराच्या अंतःकरणाला पीळ पडला. त्यानें त्याच्या पाठीवरून मोठ्या प्रेमानें हात फिरवीत ह्मटलें, " यशवंत, असं काय भलतंच बोलतोस ? तुझ्या छातींत दुखतं तर भाऊसाहेबांना कां नाहीं सांगत ? ते कांहीं उपचार सुरू करतील—"

" कोण भाऊसाहेब ! अरे, ते तर माझा छळ करकरून मला मारणार आहेत ! " त्वेषाच्या त्यांत यशवंत किंचित् त्वेषानें ह्मणाला, " ह्मणून ह्मणतो, असं झिजून झिजून मरण्यापेक्षां मला एकदमच मरण आलं तर फार बरं ! "

" असं नको बोलूंस वेड्यासारखं ! भाऊसाहेबांचा स्वभावच तसा आहे, त्याला कोण काय करणार ! पण तूं सगुणाबाईंना का नाहीं सांगत ? "

" काय सांगूं ? आत्या बिचारी स्वतःच्या दुःखांत बिछान्याला खिळलेली ! तिला माझी रडकथा सांगून तिचं दुःख आणखी कशाला मी दणावूं ? काल तिनें मजकरितां भाऊसाहेबांजवळ कितीतरी रदबदली केली. माझ्या छातींत दुखतं, मला इतक्या लांब जाववणार नाहीं, असं पुष्कळ सांगितलं. तेव्हां भाऊसाहेब ह्मणाले, ' कांहीं त्याच्या छातींत दुखत नाहीं आणि खुपत नाहीं. काम करायला नको ह्मणून हें त्याचं सर्व ढोंग आहे. तो आतां फार मस्तावला आहे. त्याला असंच वागवून चांगला वळणीवर आणलं पाहिजे. ' तेव्हां आत्यानें तरी पुढें काय ह्मणायचं ? शेवटीं इतकंहि करून तिच्यानें राहवेना, तेव्हां

रात्रीं जेवणें झाल्यावर भाऊसाहेब खालच्या दिवाणखाण्यांत बसले असतां आत्यानें पुनः विचारले, कीं ' त्याला खाणीवर पाठवायचा असेल तर पाठवा; पण त्याला जाण्यायेण्या-करितां तें नवं तट्टू तरी रामजीला देण्यास सांगा. ' तेव्हां भाऊसाहेब खेंकटून बोललें, ' तुला यांत कांहीं कळत नाहीं, आणि उगाच कशाला भलत्याच गोष्टींची उठाठेव कर-तेस ? त्याला तट्टू देऊन बाबुराव खाणीवर कसा जाईल ? तें कांहीं नाहीं, त्यानें सकाळ संध्याकाळ रखडतच गेलं आलं पाहिजे ! ' "

प्रभाकराला भाऊसाहेबांच्या स्वभावाची फारच चांगल्या प्रकारें ओळख होती. एखा-द्यावर त्यांची इतराजी आली ह्मणजे ते त्याच्या कसें हात धुवून पाठीस लागतात, याचा अनुभव त्यानें चांगला घेतला होता. यशवंताची हकीकत ऐकून त्याला फार वाईट वाटलें. थोड्या वेळानें तो ह्मणाला, "यशवंत, तुझी ही हकीकत ऐकून मला फार वाईट वाटतें ! माझ्या हातून जर कांहीं होण्यासारखं असेल तर मला सांग, मी मोठ्या आनंदानें—"

" तूं काय करणार ? मुळांतच मी दुर्दैवी !—पण प्रभाकर, तुझ्यासारखा जर मला भाऊ असतां—"

"मग मला तूं कोण समजतोस ! मी तुझा भाऊ नाहीं का ?" प्रभाकराचें हें वाक्य ऐकतांच यशवंताला गहिंवर आला. त्यानें एखाद्या लहान मुलासारखें हुंदके देत प्रभाक-राच्या बाहूंत आपलें डोकें खुपसलें. तें पाहून प्रभाकरालाहि गहिंवर आला. त्यानें खऱ्या बंधुप्रेमानें त्याला आपल्या हृदयाशीं धरलें आणि त्याचे अश्रू पुशीत तो ह्मणाला, "यशवंत चल, आपण आतां शास्त्रीबुवांच्या घरीं जाऊं. ते तुला नीट तपासून खात्रीपूर्वक औषधो-पचार करतील. मी आज पुण्यास गेलों नाहीं तरी चालेल. चल—"

"नको ,नको. प्रभाकर,तूं उगाच माझ्याकरितां दुःखी होऊं नकोस. शिवाय खाणी-वर जाण्याचा आजचा हा माझा पहिलाच दिवस आहे. निदान आज तरी मला खाणीवर गेलेंच पाहिजे. नाहींतर आगींत तेल ओतल्यासारखें होईल. आहे माझ्या नशिबीं तितकें मला भोगलंच पाहिजे."

" यशवंत, असाच विश्वास ठेव. दुःखामागून सुख हें ठेवलेलेंच आहे. ईश्वर न्यायी आहे, त्याला सर्वांची काळजी आहे. " असें ह्मणुन प्रभाकरानें त्याला गाडींत बसाविलें खाणीवर जाईपर्यंत त्यानें यशवंताला बऱ्याच उत्तेजनपर गोष्टी सांगितल्या. शेवटीं तो ह्मणाला, "यशवंत, आतां मी पुण्याहून आल्यावर आपण शास्त्रीबुवाकडे जाऊं. भाऊसाहेबा-कडे तूं आतां लक्षच देऊं नकोस. त्याचा स्वभावच तसा आहे. त्यांनीं जरी तुजकडे

दुर्लक्ष केलें तरी तूं निराश होऊं नकोस. सगुणाबाईची जर सत्ता चालत असती तर तुह्मां दोघांना—तुला आणि कृष्णाला असे हाल सोसावेच लागतेना. पण ती बिचारी स्वतःच पंगु बनली आहे, त्याला काय इलाज ! तरी आतां तुह्मी बिलकूल काळजी करूं नका. माझ्या जिवांत जीव आहे; तोंपर्यंत मी तुह्माला सुखी करण्याचा प्रयत्न करीन. मात्र तुह्मी दोघांनीं ह्यापुढें मजबरोबर दुजाभाव ठेऊं नये. ”

ह्या जगांत खऱ्या प्रेमाच्या सहानुभूतीचा प्रभाव किती विलक्षण आहे बरें ? प्रभाकराचें भाषण ऐकून आपणास एक पाठीराखा मिळाला, असेंच यशवंताला वाटलें. त्यानें त्या प्रेमभरांत प्रभाकराच्या गळ्याला मिठी मारिली.

“ प्रभाकर, आज मला तूं नवें जीवन देत आहेस !–मला स्वतः बद्दल कांहीं वाटत नाहीं. मी किती झालं तरी पुरुष आहे. माझा वाटेल तितका छळ झाला तरी तो मी सहन करीन. पण त्या कृष्णाचे हाल मला नाहीं पहावत ! ती राक्षशीण ताई तिला क्षणोक्षणीं छळते. एखाद्या मोलकरणीप्रमाणें ती तिला वागविते. अरेरे ! काय ही आमची दशा ! प्रभाकर, अरे, आह्मीं खऱ्या देशमुखांचीं मुलं ना ? आणि आमची ही अशी अवस्था ! देवा, हाच कायरे तुझा न्याय ? आह्मीं दोघांनीं असा काय तुझा अपराध केला ह्मणून तूं आह्माला ह्या राक्षसांकडून असा छळवितोस ? अरेरे, काय करूं रे ! प्रभाकर, मला केव्हां केव्हां हें दुःख असह्य झालं ह्मणजे असं वाटतं की, एकदम जाऊन त्यांच्या पायावर डोकं आपटून प्राण द्यावा !–आमचें एवढें असून त्यांनीं आह्माला पुरेसें जेवूं देखील घालूं नये कायरे ? आह्मी इतके कष्ट करून घांसभर अन्नाला देखील महाग झालों कायरे ? ”

“ यशवंत, शांत हो ! असा एकदम संतापूं नकोस ! त्यापासून निष्पन्न असें कांही सुद्धां न होता, उलट तुला त्रास होत आहे. तुझा माझ्यावर विश्वास आहेना ? मला तूं आपला भाऊ समजतोस ना ?–मग माझें ऐक. आजपासून तूं हे विचार मनांत देखील आणूं नकोस. पडेल तें काम स्वस्थ चित्तानें करावयाचें. नाहीं झालें, आणि त्याबद्दल कोणी बोललें तर त्याकडे लक्षच द्यावयाचें नाहीं. मी आतां पुण्याहून आल्यानंतर आपण पुढें काय करावयाचें तें एकदां स्वस्थपणें बसून ठरवूं. तोंपर्यंत तरी तूं असा रागानें बेफाम होत जाऊं नकोस. ”

थोड्यावेळानें त्याचा टांगा खाणीजवळ आला. तेव्हां प्रभाकरानें पुनः एकदां प्रेमानें निरोप देऊन व आश्वासन देऊन यशवंताला टांग्यांतून खालीं उतरविलें आणि बंदरावर जाण्याकरितां तो पुढें निघाला.

# प्रकरण १३ वें.



## पुण्याहून आल्यावर.



सायंकाळचा सुमार झाला होता. रोज ह्या वेळीं देशमुखांच्या शेतांत किंवा कुरणांत मुलें एकत्र जमून खेळत असत. अलीकडे वर्ष दोन वर्षें मुलांपेक्षां मुलींचाच भरणा जास्त असे. देशमुखांचा बाबुराव लहान होता, तेव्हां त्याच्याबरोबर खेळण्याकरितां शेतकऱ्यांचीं मुलें जमत असत. परंतु आतां बाबुराव मोठा झाला, तेव्हां त्याची जागा इंदुबाळानें घेतली. रोज संध्याकाळ झाला ह्मणजे इंदुबाळाला निटनेटका पोषाख घालून कृष्णा फिरावयास घेऊन येत असे. तिचा एखादा दिवस जर चुकला, तर दुर्गाआत्या कृष्णाला सळो कीं पळो करून सोडीत असे. बरें—कुरणांत किंवा शेतांत आल्यावर इंदुबाळ दोन घटका स्वस्थ चित्तानें खेळून कृष्णाला विश्रांति देईल तर तेंहि नाहीं! उलट खेळावयास आलेल्या शेतकऱ्यांच्या लहान मुली आणि मुलें यांना त्रास देऊन, मारून आणि रडवून ती उपद्यापी पोर कृष्णाला नकोनकोसें करीत असे. आजचा दिवसहि त्यापैकीं एक होता.

“ इंदु, तुला ऐकायचं नाहीं ना ?–फिर मागें !–पहा मी दुर्गाआत्यांना सांगेन–” इंदुबाळ रस्त्यावरून धांवत जात असतां कृष्णा ह्मणाली.

“ जा—जा सांग आत्याला ! आत्या माझं काय करील ! ” असें ह्मणून ती द्वाड पोर रस्त्यानें धांवत गेली.

त्यावेळीं रस्त्यानें एक टांगा येत होता. सहसा गांवांतील टांगा देशमुखवाडींत यावयाचा म्हणजे कोणी तरी परका मनुष्य बंदरावरून किंवा शहरांतून मुद्दाम येईल तेव्हांच यावयाच ! नाहीं तर गावांतील टांगा देशमुखवाडींत येण्याचें दोन दोन चार चार महिने कारणच पडत नसे. वस्तुस्थिति अशी असल्यामुळें देशमुखवाडींत एखादा टांगा

आला ह्मणजे सर्व मुलें मोठया उत्सुकतेनें कोण आलें आहे, हें पाहण्याकरितां साहजिक रस्त्यावर एकत्र जमत असत. इंदुबाळ धांवत गेली, त्याचें कारणहि हेंच होय. ती पुढें धांवूं लागतांच इतर सर्व मुलें तिच्यामागून धावूं लागलीं. त्यांना अडविण्याचा कृष्णानें शक्य तितका प्रयत्न केला परंतु कुरणांत मोकळी सुटलेली वासरेंच तीं !

" कोण बरें आज टांग्यांत आलं ? " टांग्याकडे लक्ष जातांच कृष्णा स्वगत ह्मणाली. तोंच कुंपणाच्या वळणावर टांगा उभा राहिला आणि त्यांतून एक व्यक्ति खालीं उतरली. त्याबरोबर तिच्या चर्येत फरक पडला. तिनें आपला अस्ताव्यस्त झालेला पदर नीट सांवरून घेतला. आणि ती रस्त्याच्या बाजूला कुंपणाच्या कडेला एका झाडाच्या आड उभी राहिली. इकडे तो टांगा उभा राहतांच सर्व मुलें त्या टांग्याच्या भोंवतीं गोळा झालीं. इंदुबाळ सर्वांच्या पुढें होती. तिनें टांग्यांतून उतरणाऱ्या व्यक्तीला पहिला प्रश्न केला. " काय प्रभाकर, कुणीकडे गेली होती स्वारी ? "

" आमची स्वारी गेली होती पुण्यास ! पण तुह्मी थोरामोठ्यांच्या मुलीं, अशा रस्त्यावर काय धांवपळ करतां ? "

" आह्मी खेळायला आलों आहोंत. "

" असं काय ? " असें ह्मणून प्रभाकरानें टांगेवाल्याचें भाडें चुकतें केलें आणि इंदूचा हात धरून तो कुंपणाकडे यावयास निघाला. तोंच झाडाजवळ उभी असलेली कृष्णा त्याच्या दृष्टीस पडली.

" काय कृष्णा काय खबर आहे ? यशवंत कसा आहे ? "

" त्याला काय झालं आहे ? रात्रीं दहा वाजेपर्यंत भटकतो—मौज करतो ! "

" इंदे, काय हें ! केव्हां ग यशवंत भटकला ? " तिचा गालगुच्चा घेऊन कृष्णा ह्मणाली " अलीकडे किनई तूं फारच शेफारली आहेस ! थांब आतां घरीं गेल्यावर सगुणाआत्याला सांगते. "

" जा जा सांग. तूं आहेसच चहाडखोर !" असें ह्मणून इंदुबाळ पलीकडे खेळत असलेल्या मुलीकडे तोऱ्यानें निघून गेली.

" पोर मोठी वात्रट झाली आहे ! " तिच्याकडे पहात प्रभाकर ह्मणला.

" वात्रट ह्मणजे किती ? आणि दुर्गाआत्या त्यांत भर घालते. " खालच्या मानेनें कृष्णानें उत्तर दिलें. " पण तुह्मी गेलां होतां कुठं ? "

पांचव्या प्रकरणांत आपण कृष्णाचें एक अल्लडपणाचें स्वभावसिद्ध चित्र पाहिलें होतें. 'प्रभाकर, आतां तुझं कसंरे होईल?' हा तिनें प्रभाकराला विचारलेला प्रश्न वाचकांना आठवत असेलच! त्यानंतर आज तीन चार वर्षांत तिच्या वर्तनांत इतका फरक पडला, हें कशाचें बरें द्योतक असेल? पूर्वीचा तिचा अल्लडपणा आतां कुठें गेला? प्रभाकर आतां मोठा झाला ह्मणून एकेरी नांवानें संबोधण्यास तिला अवघड वाटत असेल काय? किंवा त्यांच्या केविलवाण्या स्थितीबद्दल प्रभाकर आतां सहानुभूति दाखवितो, ह्मणून कृतज्ञतेनें ती इतकी विनयशील बनली असेल काय! छेः—इतक्यांतच कांहीं सांगतां येत नाहीं. कारण गेल्या तीन वर्षांत परस्परांच्या भेटींत त्यांच्या प्रेमाचा परिपोष असा काय झाला आहे, त्याच्या विषयीं आपणांस कांहींच माहिती नाहीं. करितां इतक्या लवकर आपलें मत बनविण्यापेक्षां कांहीं काळ थांबून त्यांच्या भेटींचें सूक्ष्म अवलोकन करावें हेंच चांगलें! असो. कृष्णानें विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर देऊन प्रभाकर ह्मणाला, "शेवटीं मी भाकित केल्याप्रमाणें आमच्या मधुकराची स्थिति माझ्या दृष्टीस पडली. त्याला पुण्यांत कांहीं नाटकी मंडळीची संगत लागली. असून तो अगदीं बिघडला आहे. मी तीन दिवस पुण्यांत होतो, पण त्या तीन दिवसांत तो मला एकदांच आणि तोहि पांचच मिनिटें भेटला. पण तें जाऊंदे! मला प्रथम यशवंतची हकीगत सांग? ती वात्रट पोर मघाशीं 'यशवंत भटकतो' असें काय ह्मणाली?"

"यशवंत कोठून भटकणार? त्याची प्रकृति कशी आहे, तें आपण जाणतच अहांत. अलीकडे तर त्याला अगदीं क्षुल्लक श्रमहि सहन होत नाहींत. संध्याकाळी सहा वाजतां खाणीवरून सुटल्यावर इतक्या लांब येईपर्यंत त्याला सहज रात्र होते. पांच सहा मैल जमिन चाललं तर पाहिजे ना! काल कुठें खाणीवरून सुटण्यास त्याला वेळ झाला. त्यामुळें घरीं येईपर्यंत रात्री साडेनऊ वाजले. तेव्हां भाऊसाहेब त्याच्यावर अतिशय चिडलें आणि ह्मणालें, "तुला खाणीवरून सरळ घरीं यावयास काय होतं? तुझं भटकणं अद्यापि जात नाहीं. अझूनहि तूं शुद्धीवर येत नाहीस." असा त्याला दम देऊन भाऊसाहेबांनी सर्व घरांत असा सक्त हुकूम सोडला आहे कीं, रात्री नऊ वाजतांच वाड्याचा मोठा दरवाजा आणि आंतला दरवाजा बंद करावयाचा आणि आपल्या हुकूमाशिवाय दुसऱ्या दिवशी सकाळीं सहा वाजेपर्यंत ते दोन्ही दरवाजे उघडावयाचें

नाहींत. तसेंच दरवाजे बंद झाल्यावर जर यशवंत आला, तर त्याला कोणत्याहि सबबीवर दरवाजा उघडावयाचा नाहीं ! ''

" पण यशवंत खरोखरीच भटकतो कीं, त्याला खाणीवरून यावयास वेळ होतो, याचा भाऊसाहेबांनीं विचार केला नाहीं वाटतं ! ''

" इतका त्यांना विचार असता तर मग काय ? ''

" पण यशवंताची काय खबर आहे, ती नाहीं सांगितलीस ? तो आला का खाणीवरून ? ''

" हे, इतक्या लवकर कोठून येईल ! आज तरी नवाच्या आंत तो आला ह्मणजे मिळविलं ! नाहीं तर कालच हुकूम सुटला आहे, तेव्हां आज त्याची अवश्य अमलबजावणी होईल. आणि तसं जर कांहीं झालं, तर–तर–सर्व रात्र त्याला बाहेरच थंडींत कुडकुडतच रहावं लागेल. मग–मग–त्याची काय अवस्था होईल ! '' कृष्णाच्या डोळ्यांतून पाणी आलें. तिनें आपला पदर डोळ्यांवर धरला.

" कृष्णा, अशी तूं रडूं नकोस ! मी आतां आलों आहे–'' तिला धीर देत प्रभाकर ह्मणाला, " परवां येथून बंदरावर जातांना सकाळीं मला यशवंत भेटला होता. त्याच्या बरोबर आतां पुढें काय करावयाचें तें मी ठरविलं आहे. मी आतां घरीं जाऊन नंतर केशवशास्त्र्यांना भेटतों आणि यशवंताच्या औषधपाण्याची व्यवस्था करतों. तूं आतां बिलकूल काळजी करूं नकोस. मी पुनः उद्यां सकाळीं यशवंताला भेटेन आणि संध्याकाळीं तुलाहि भेटेन. पण कृष्णा, सगुणाबाई कशा आहेत ? ''

" आत्या आहे तशीच आहे. ती विचारी यशवंतकरितां किती किती तरी हळहळते. पण तिची कांहीं सत्ता चालेल तेव्हांना ? ''

इतक्यांत देशमुखवाडीच्या फाटकांतून वत्सला बाहेर पडलेली त्यांच्या दृष्टीस पडली. तेव्हां प्रभाकर ह्मणाला, " कृष्णा, मी आतां जातो. ती पहा वत्सला आली. मला तुझ्याजवळ गोष्टी बोलतांना पाहून तिला सहन होणार नाहीं. जातो मी. ''

प्रभाकर झपझप् जाऊं लागला, असें पाहून वत्सलेनें आपली दिशा बदलली आणि तो ज्या मार्गानें जात होता, त्या मार्गाकडे वळून ती पुढें जाऊं लागली. तिचा हेतु प्रभाकराच्या लक्षांत आला. परंतु तिला भेटावें, अशी त्याची इच्छा नसल्यामुळें त्यानेंहि,

जणुं काय आपण पाहिलेंच नाहीं, असें दाखवून आपली दिशा बदलली. तें पाहून वत्सला मोठ्यानें ओरडून ह्मणाली, " अहो प्रभाकर, जरा थांबा. मला कांहीं काम आहे ! "

नाइलाजास्तव प्रभाकराला उभें रहावें लागलें. त्यानें एकदांच वत्सलेकडे पाहिलें. तों त्याच्या मनांत एकाच वेळीं अनेक विचार येऊन गेले. वत्सलेचा तो उंच बांधा, एखाद्या अचपल पोराप्रमाणें तिचें धांवत येणें आणि एकाच खांद्यावरून मागें लोंबत असलेला तिचा पदर पाहून क्षणापूर्वीं आपल्यापुढें विनयानें बोलत असलेल्या कृष्णेची मूर्ति त्याच्या नेत्रांपुढें येऊन साहाजिकच त्याचें मन त्या दोन व्यक्तींची परस्परा बरोबर तुलना करूं लागलें. परंतु ती तुलना फार वेळ टिकली नाहीं. वत्सला जवळ येण्यापूर्वींच त्या तुलनेनें त्याच्या मनांत कृष्णेविषयीं प्रेम आणि आदर उत्पन्न करून वत्सलेचा तिरस्कार उत्पन्न केला. वत्सलेला नटण्यामुरडण्याची फार हौस होती. प्रभाकराच्या सुंदर मूर्तीकडे अलीकडे तिचें मन वेधलें होतें. त्यामुळें वरचेवर निरनिराळ्या पोशाखांत ती त्याच्या पुढें पुढें करण्याचा, त्याच्याशीं बोलण्याचा आणि त्याच्याजवळ आपलें मनोगत उघड करण्याचा प्रयत्न करीत होती.

" कुणीकडे जाणं झालं होतं ? दोन दिवस स्वारी गेली होतीं तरी कुठें ? " जवळ जातांच मानेला वाकवीत, हास्य मुद्रा करून वत्सलेनें विचारलें.

" मी पुण्यास गेलों होतो. " इतकेंच उत्तर देऊन प्रभाकर गप्प राहिला.

'माझं कांहीं काम आहे !' असें सांगून वत्सला पुढें आली होती, तेव्हां तिचें काय काम आहे, तें कळावें ह्या उद्देशानें तो तसाच उभा राहिला. बराच वेळ झाला, ती कांहीं बोलत नाहीं, असें पाहून प्रभाकर पुढें ह्मणाला, " वत्सलाबाई, तुमचं काय काम आहे ? मला लवकर घरीं गेलं पाहिजे. मला प्रवासाचा फार त्रास झाला आहे. "

" मग चला तर आमच्या घरीं ! थोडा वेळ विश्रांति घेऊन मग पुढें चला–"

" नको–आतां जातोंच मी घरीं ! " असें ह्मणून प्रभाकर जाण्याकरितां वळला, तेव्हां त्याच्याकडे तिरक्या दृष्टीनें पहात वत्सला ह्मणाली, " अगदींच का माझ्याजवळ उभं राहवसं वाटत नाहीं ! मघांपासून तर त्या कृष्णीजवळ बोलत होता आणि इतक्यांतच कशी इतकी घाई झाली ? "

" घाई तर खरीच ! पण कृष्णाबरोबर बोलत होतो याचें कारण ती तेथें उभी होती,

तेव्हां सहज तिला तुमच्या घरची खुशाली विचारली—पण वत्सलाबाई, तुह्माला एक गोष्ट विचारूं का ? राग नाहींना येणार ? ”

तीं काय ह्मणते, तें ऐकण्याकरितां प्रभाकर क्षणभर तिच्या मुखाकडे पहात राहिला. परंतु तिनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. उलट तिचें चर्येत फरक पडून तिच्या कपाळावर घामाचे बिंदु चमकूं लागले. आपल्या मनांत जी गोष्ट रात्रंदिवस घोळत आहे, तीच गोष्ट आतां प्रभाकर आपणास विचारील, असें तिला वाटलें. तिची छाती धडधडूं लागली. ती कांहीं बोलत नाहीं, असें पाहून प्रभाकर पुढें ह्मणाला, “ वत्सलाबाई, तुह्मी आणि बाबूराव कृष्णाबरोबर आणि यशवंतबरोबर असें का वागतां ? त्यांना आतां तुमच्या शिवाय दुसऱ्या कोणाचा आधार आहे बरं ? ”

“अहो, तीं दोघंहि आहेतच तशी ! तो येशा तर येशाच ! आणि ही कृष्णी तर काय विचारूंच नका ! पण मी ह्मणते, तुह्माला त्यांची एवढी कीव का येते ? आणि मी--मी--सदां तुमचं इतकं ध्यान करते--पण--पण--”

“ काय करतां तुह्मी माझं वत्सलाबाई ? ” आश्चर्यानें प्रभाकरानें विचारलें.

“ काय सांगू तुह्माला ! एवढं कसं तें मेलं तुमच्या लक्षांत येत नाहीं ? ” आपल्या पायांच्या आंगठ्याकडे पहात वत्सला ह्मणाली.

“ वत्सलाबाई, तुह्मी काय ह्मणतां तें माझ्या लक्षांत आलं नाहीं, आणि येतहि नाहीं. तुह्माला काय बोलायचं असेल तें स्पष्ट बोला ? ”

“ काय बोलूं ? आणि कसं बोलूं ? ” खालच्या मानेनें वत्सलेनें उत्तर दिलें. तो प्रसंग मोठा आणीबाणीचा होता. त्यावेळीं काय बोलावें, हेंच तिला सुचेना. तिनें आज मोठ्या कौशल्यानें सर्व भाषणाचा ओघ बदलून आपल्या इच्छित विषयाकडे वळविला होता. तिचें प्रभाकरावर निस्सिम प्रेम होतें किंवा नाहीं, हें सांगणें जरी कठीण आहे, तथापि कादंबऱ्यांत वांचल्याप्रमाणें आपणास संध्याकाळीं शेतांत किंवा कुंपणांत गुप्तपणानें भेटण्यास, आपणाबरोबर गुप्त पत्रव्यवहार करण्यास, इत्यादि प्रेमलीलेंतील गुप्तसंदेश करण्यास कोणी तरी असावे, तितक्यांच करितां तिनें आपल्या ह्या इच्छित कार्यासाठीं प्रभाकराची निवड केली होती. कारण वयपरत्वें तिचें भडकलेलें मन अशा गोष्टी करण्यास फार उत्सुक झालें होतें. प्रभाकर स्वरूपानें देखणा, बांध्यानें

मजबूत, स्वभावानें शांत आणि प्रेमळ, त्याचप्रमाणें व्यवस्थेशीर टापटिपेनें वागणारा असल्यामुळें तोच तिच्या मनांत चटकन् भरला. तिनें चार महिने झाले, हळुहळूं त्याच्यावर आपला प्रेमपाश टाकण्यास सुरवात केली होती. वत्सलेचें जरी कादंबरींतील प्रेम होतें तथापि प्रभाकरावर कोणीहि प्रेम करावें अशी त्याला स्वरूपाची आणि स्वभावाची ईश्वरी देणगीच होती, हें आतां पर्यंतच्या विवेचनावरून वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल! आज आपणाबरोबर बोलतांना वत्सलेच्या मनाची झालेली चलबिचल प्रभाकराच्या लक्षांत येण्यास फारसा उशीर लागला नाहीं. परंतु आपणांस कांहींच कळलें नाहीं, असा बहाणा करून एखाद्या वेड्यासारखा तो तिच्याकडे पहात राहिला; तें पाहून वत्सला ह्मणाली, " माझ्याशीं बोलतांना आपणास एवढा संकोच का वाटतो! अगदींच कसं आपल्या लक्षांत येत नाहीं. मला वाटतं, आपणास समजून आपण हें वेड्याचें सोंग पांघरलं आहे! असंच ना? मी ह्मणतें तें खरंना? काय बाई तरी हें? तीच जर येथें कृष्णी असती, तर तुह्मी कितीतरी मोकळ्या मनानें तिच्याबरोबर बोलला असतां! "

"आणि आपणाबरोबर मी मोकळ्या मनानें बोलत नाहीं, असं का आपणास वाटतं? बरं पण वत्सलाबाई, इतका वेळ झाला. आपणास कांहीं बोलावयाचें आहे, तें आपण अद्यापि बोलत नाहीं; तेव्हां आतां मी जातो. मग पुनः केव्हां तरी येईन मग बसूं आपण बोलत."

" पण—खरंच का आपण समजला नाहीं ? "

" खरोखरीच आपल्या ह्मणण्याचा अर्थ मला कळला नाहीं. आणि वत्सलाबाई असं पहा, आपल्या ह्मणण्याचा अर्थ माझ्या लक्षांत आला असतां तर मी आपणास त्याचवेळीं सरळ उत्तर नसतं का दिलं! "

" होय. पण मघांपासून तुह्मी मजबरोबर बोलतांना ' अहो वत्सलाबाई ' असं मला ' याहो जाहो ' ह्मणतां हें काय? मला नाहीं गडे हें पसंत! "

" होय. तुह्माला पसंत नसलं तरी मला कांहीं विचार केला पाहिजेना? आतां तुह्मी मोठ्या झाला आहांत! तेव्हां मला नको का कांहीं विचार करायला! "

" यांत विचार कसला? तुह्मी मला आपली वत्सला असंच ह्मणा! "

" छे छे! असं कसं होईल? "

" का होणार नाहीं ? मग कृष्णीला कसं कृष्णा म्हणून म्हणतां ? तीहि माझ्याच इतकी मोठी झाली आहे. "

" होय. पण तिच्यांत आणि तुमच्यांत अंतर किती आहे हेहि मला पाहिलं पाहिजे."

" पाह्यचं काय त्यांत ? "

" कां बरं ? तिची गोष्ट कुठें आणि तुमची गोष्ट कुठें ! किती झालं तरी तुह्मी देश-मुखांच्या मुलीं ! तुह्माला ' याहो जाहो ' च म्हटलं पाहिजे. बरं पण आतां हा वाद कशाला ? आतां मला झाला आहे वेळ. तेव्हां मी आतां जातो. मग येईन केव्हां तरी. मग बसूं वाद करीत. " असें म्हणून प्रभाकर वळला आणि मुकाट्यानें आपल्या मार्गाला लागला.

वत्सला तेथेंच उभी होती. ती एकाग्र चित्तानें प्रभाकराकडे पहात राहिली. प्रभाकर कुंपणाच्या पलीकडे दिसेनासा झाल्यावर तिची शरीरचळवळ सुरू झाली. आज आपण विषय इतक्या रंगांत आणून शेवटीं थोडक्याकरितां घालविलें, असें आतां तिला वाटूं लागलें. ह्या गोष्टीचा तिच्या मनाला आतां चटका लागला. ' पण प्रभाकरानें माझें मन ओळखलं नसेल काय ?—होय. खात्रीनें ओळखलंच असेल ! आतां असं वाटतं—मागून जाऊन एकदम त्याचा हात धरावा ! खरंच किती पण मोहकरूप आहे !—आतां पुढल्या खेपेस असं करून नाहीं उपयोगी ! एकदम सगळं मन त्याच्यापुढें उघडं करून ठेवतें. मग काय होईल तें होवो !' असें तिचें स्वगत भाषण चाललें असतां तिची बहुगुणी बहिण इंदुबाळ मागाहून आली आणि तिनें वत्सलेच्या पाठींत जोरानें थप्पड लगाविली.

" ~~कारल~~ हें कार्टे इंदे ! अवदसा—कार्टी मेली ! किती जोरानं माझ्या पाठींत मारलन् चांडाळणीनं ! "

परंतु आपला उद्धार ऐकतांच इंदुबाल तेथें उभी राहते कशाला ? ती तशीच मागल्यापायीं हांसत पळत जाऊन मुलींच्या समूहांत जाऊन मिसळली. थोड्या वेळानें वत्सलाहि कुंपणा-जवळ आली. तेथें मुली खेळत होत्या आणि पलीकडे एका झाडाच्या बुंधावर एकटीच बसून कृष्णा विचार करीत होती. थोड्या वेळापूर्वी प्रभाकरानें तिला सहानुभूतीपूर्वक दि-लेला धीर आणि त्यानें आपल्या प्रिय बंधूच्या औषध पाण्याची केलेली व्यवस्था ह्या सुखकर गोष्टीचा ती विचार करीत असतां वत्सला तिच्यापुढें येऊन उभी राहिली आणि म्हणाला, " कायग कृष्णे, प्रभाकर येथून गेले ते तुझ्याबरोबर बराच वेळ बोलत होते ना ? "

" होय."

" काय इतक्या हितगुजाच्या गोष्टी चालल्या होत्या ? "

" हितगुजाच्या कसल्या ! त्यांनीं सर्व मंडळीची खबरबात विचारली— "

" तर–तर तूं मोठी आजीबाईच पडलीस किनई ! त्यांच्याबरोबर तूं जी इतकावेळ बोलत होतीस, ती तुला लाज कशी नाहीं वाटली ? मी समजले तुझी सर्व कारवाई ! आतां पुनः कधीं अशी कुंपण्याच्या फटोजवळ तुला त्यांच्या बरोबर हितगुज करतांना पाहिलें, तर मग सांगेन काय आहे तें ! " असें ह्मणून ती रागानें तेथून निघाली. परंतु जातां जातां ' ही आमच्या दोघांत बिब्बा घालील. मेलींचं काळं होईल एकदाचं तर बरं ! ' असे उद्गार तिच्या मुखांतून बाहेर पडले !

इकडे बिचारी कृष्णा आपणावर व्यर्थ गजब झालेला पाहून तेथेंच अश्रु पुशीत बसली. तिला वत्सलेच्या भाषणाचा अर्थ कळला नाहीं ! ' तुझी कारवाई ' ह्मणजे काय ? हेंच त्या सरळस्वभावी बालिकेला समजेना ! आपण प्रभाकराबरोबर बोलत होतो, हा आपला अपराध होऊं शकेल काय ? याचा ती विचार करूं लागली. ' होय–कदाचित् असंच असेल ! प्रभाकर आमची–यशवंताची विचारपूस करतो, ह्मणूनच तिला हें सहन झालें नाहीं. ' अशी तिनें आपल्या मनाची समजूत केली आणि ती आपल्या जागेवरून उठली.

त्यावेळीं बराच काळोख पडला होता. इंदुबाळ अद्यापि मातींतच खेळत होती. तिच्याबरोबर थोडावेळ डोकेंफोड केल्यावर तिनें आपला खेळ आटोपला आणि त्या घराकडे वळल्या.



# प्रकरण १४ वें.

## बंद दरवाजा.



प्रभाकर घरीं आला, त्यावेळीं दिवे लागण्याचा सुमार झाला होता. वाटेंत येत असतां त्याचे सर्व विचार वत्सलेच्या भाषणावर होते. तिनें उच्चारलेल्या प्रत्येक वाक्याची आठवण होऊन त्याला तिच्या भाषणाचें आतां कौतुक वाटत होतें. परंतु बराच वेळ तेच तेच विचार त्याच्या मनांत आल्यावर त्याला वत्सलेचा स्वाभाविक तिरस्कार उत्पन्न झाला. आतां होतां होईल तों आपण वत्सलेला असें एका बाजूला एकांतांत भेटण्याचा प्रसंग आणूं देऊं नये, असा त्यानें त्याच वेळीं विचार ठरविला. तो आंबराईतून आंत येत असतां दरवाजाजवळ त्याला मल्हारी भेटला. त्याच्याजवळ, आपण नसतांना मागें चार दिवसांत काय काय गोष्टी झाल्या, त्या विचारून आणि शेताची व कुळांची चौकशी करून तो घरांत शिरला; तों दरवाजांतच जेवून हात धुण्याकरितां बाहेर आलेली कमला त्याच्या दृष्टीस पडली.

" दादा आलास ? मधुकर कुठें आहे ? तो नाहीं का आला ? "

" नाहीं." इतकेंच ह्मणून तो तेथें उभा राहिला. थोड्या वेळानें मल्हारीनें त्याला पाय धुण्याकरितां एक लोटा भरून आणला.

प्रभाकराबरोबर मधुकर आला नाहीं, ही गोष्ट घरांत सावित्रीबाईला आणि राधाआकाला कमलेकडून कळली. परंतु दोघींतून एकीनेंहि त्याबद्दल जास्त चौकशी केली नाहीं. थोड्या वेळानें प्रभाकराचा धूपदीप दाखवून झाल्यावर त्यांचें जेवण झालें आणि सर्व मंडळी वरल्या माडीवर एकत्र जमली. राधाआकानें आपला पानाचा बटवा सोडून मधुकराविषयीं चौकशी करण्यांस सुरुवात केली. तेव्हां प्रभाकर ह्मणला, " शास्त्रीबुवांनीं मला पत्र दिल्याप्रमाणें मी त्यांच्या मित्राकडे जाऊन उतरलों. आणि तेथें जेवण वगैरे आटोपून मधुकराच्या तपासाकरितां त्याच्या बोर्डिंगांत गेलों. तेथें

बोर्डिंगाच्या मुख्य व्यवस्थापकाची भेट घेतल्यावर मला बऱ्याच चमत्कारिक गोष्टी कळल्या. व्यवस्थापकांनीं मला सांगितलें कीं, अलीकडे चार महिने झाले, मधुकर बोर्डिंगांत रहात नाहीं. ' आपली घरची मंडळी आतां पुण्यांत रहावयास आली आहेत, तेव्हां आपण घरींच राहून फक्त शाळेंत येत जाऊं' असें त्यानें तेथें खोटेंच सांगितलें आहे."

" मग तो आतां चार महिने राहतो तरी कुठें ? " सावित्रीबाईनें मध्येंच विचारलें.

" मलाहि प्रथम तोच प्रश्न उद्भवला. नंतर फार बारकाईनें तपास सुरू केल्यावर त्याच्या बरोबरीच्या एक दोन मुलांनीं मला त्याचा पत्ता सांगितला. पुण्यांत कांहीं उडाण-टप्पू मंडळींनीं एक नाटकाचा क्लब काढला आहे. त्यांत कांहीजण छापखान्यांत खिळे जुळविण्याच्या कामावर आहेत, कांहीं कापडाच्या दुकानावर नोकर आहेत आणि कांहीं अशींच दुसरीं हलकी सलकीं कामें करणारे आहेत. त्या मंडळींनीं एका भिकार जागेंत चार खण जागा घेतली आहे. तेथें मधुकर असतो, असें मला कळतांच मी शोध करीत येथें गेलों. परंतु मधुकर मला भेटला नाहीं. ह्मणून मी कांहीं वेळ त्या ठिकाणीं बसून राहिलों. त्या थोडया वेळांत मी तेथें जो प्रकार पाहिला, तो खरोखरीच अंगावर शहारे आणणारा होता. माझ्याजवळ मधुकराची इतर मित्रमंडळी बसली होती. त्यांच्या भाषणांत जे शब्दप्रयोग होत होते, ते ऐकून माझें मन तात्काळ विटलें. शिवाय कित्येक जण विड्याचा फन्ना उडवीत होते. बोलतां बोलतां एकानें माझी चौकशी केली. तेव्हां मी कोण व कशाकरितां आलों आहे, तें त्यांना कळूं न देतां उलट मीच मधुकराविषयीं चौकशी करूं लागलों. तेव्हां तो ह्मणाला, " मधुकरराव तर आमचे म्यानेजर—म्यानेजरच का, आमचे मालकच म्हणाना ! ते तर आमच्या मंडळींतील मुख्य स्त्री पार्टी ! आतां लवकरच पूना ड्रम्याटिक क्लब'चा सौभद्र खेळ किर्लोस्कर थिएटरांत लागणार आहे. आम्हांला सध्यां थोडी पैशाची मदत पाहिजे आहे. मधुकररावांनीं घरून पैसे मागविले आहेत. ते एकदां आले कीं, मग पहा आह्मी हें पुणें कसें हालवून सोडतों तें ! " अशा रीतीनें तो स्वतःबरोबर मला मधुकराच्या दीनचर्येची माहिती करून देत असतां मधुकर तेथें आला. मला तेथें बसलेला पाहून तो अत्यंत खजील झाला. मी ताबडतोब उठलों आणि बाहेर आलों. तोहि माझ्या मागून आला. मी त्याला तसाच शास्त्रीबुवांच्या स्नेहाच्या घरीं घेऊन आलों आणि पुष्कळ प्रकारें उपदेश केला. पुढें तास दीड तास झाल्यावर तो जाण्याकरितां उठला. मी त्याला 'मजबरोबर घरीं चल. आतां तूं येथें राहणें चांगलें नाहीं.

तुला ह्या क्लबाच्या मंडळींनीं मोहिनी घातली आहे. तूं आतां येथें राहूं नये हेंच चांगलें!' असें पुष्कळ सांगितल्यावर 'मी आतां एका तासानें येतों.' असें मला अश्वासन देऊन तो गेला, तों तीन दिवसांत त्यांची माझी भेट नाहीं. मी पुनः पुष्कळ शोध केला. त्या क्लबवर पुनः पुनः गेलों, बोर्डिंगांत गेलों, त्याच्या खाणावळींत गेलों परंतु त्याची भेटच होईना. तीन दिवस सारखा फिरलों. शेवटीं कंटाळलों आणि परत घरीं येण्याचा विचार केला, तों काल हें पत्र माझ्या नांवानें पोष्टांतून आलें." असें ह्मणून प्रभाकरानें पत्र पुढें केलें.

ही सर्व हकीकत सावित्रीबाई लक्ष देवून ऐकत होती. ती कांहीं एक बोलली नाहीं. प्रभाकरानें पत्र पुढें करतांच 'वाच' इतकाच शब्द तिनें उच्चारला. प्रभाकरानें पत्र उघडलें आणि पत्रांत लिहिलेला खालील मजकूर वाचून दाखविला.

"झाल्या गोष्टीचा मला फार पश्चात्ताप झाला आहे. माझ्याकडून होऊं नये ती गोष्ट झाली. पण आतां आपण मला क्षमा केली पाहिजे. आपणास सर्व गोष्टी माहित झाल्यस आहेत; तेव्हां आतां त्या लपवून ठेवण्यांत कांहीं अर्थ नाहीं. येथें आपण पाहिलेली एकहि गोष्ट घरीं आईच्या कानावर घालूं नये. आणि घातल्या मी माझें काळें तोंड तिला दाखविण्याकारितां कधींहि येणार नाहीं. पण आपण असें करणार नाही अशी माझी खात्री आहे. मी घरी यावें अशी जर आपली मनःपूर्वक इच्छा असेल तर माझी शंभर रुपयांची गरज भागवावी. मला येथें फार कर्ज झालें आहें. मी आतां घरीं येऊन आपणाजवळच पुढचा अभ्यास करीन. पण प्रथम मला क्लबच्या पत्त्यावर पैसे पाठवावें. येथील व्यवस्था लागल्याशिवाय मला परत घरीं येतां येत नाहीं. आज येथें सवड नसल्यास आपण आतां घरीं जावें व तेथून मनिआर्डर करून रुपये पाठवावें. पण ही गोष्ट आईला कळूं देऊं नये. मी आपणास घरीं भेटेन. आपण आतां येथें जास्त दिवस राहूं नये. ही विनंति.

आपला,

**मधुकर."**

पत्र वाचून झाल्यावर प्रभाकर गप्प राहिला. आतां आपली आई आपणाला कांहीं तरी मार्ग सुचवील असें त्याला वाटलें. परंतु सावित्रीबाई कांहींच बोलेना. राधाआका

सावित्रीबाईच्या बोलण्याची वाट पहात होती. तिच्या मनांतून पुष्कळ बोलावयाचें होतें आणि प्रत्येक वेळीं तिच्या ओंठापर्यंत शब्द येतहि होते. परंतु ती मुद्दाम गप्प राहिली होती. सावित्रीबाईचें मधुकरावर अतिशयच प्रेम आहे, हें तिला माहित होतें. तेव्हां अशा योग्य प्रसंगीं जरी आपण कांही बोललों, तरी तें तिला कितपत रुचेल, अशी एक शंकाच होती. म्हणून तीहि बोलली नाहीं. शेवटीं प्रभाकर म्हणाला, "मग आई, आतां पुढें काय करायचें तें सांगा म्हणजे मीं त्याप्रमाणें करतो."

"काय करायचं पुढें ?" सावित्रीबाई रागानें म्हणाली, "आतां कांहीं करायला नको नी सवरायला नको ! त्या कार्ट्याची आतां बिलकूल गय करतां उपयोगी नाहीं."

"पण—"

"आतां पण नको आणि बीण नको ! तूं आतां माझ्यापुढें त्याचें नांवच काढूं नकोस प्रभाकर !"

ह्या वेळीं जास्त बोलण्यांत कांहींच अर्थ नाहीं, असें जाणून प्रभाकरहि गप्पच राहिला. आईचा राग कमी झाल्यावर आपण तिला हळुहळू वळवूं, अशी त्याची खात्री होती. तो आतां विषय बदलण्याच्या विचारांत होता, इतक्यांत 'प्रभाकर' अशी कोणी हांक मारलेली त्याला ऐकूं आली.

"प्रभाकर, कोण हाक मारतोय् खालीं पहा—" असें राधाआकानें म्हणतांच प्रभाकर उठला आणि खालीं आला. त्यावेळीं नऊ वाजण्याचा सुमार झाला होता. इतक्या रात्रीं आपणाकडे कोण आलें आहे, याची त्याला कल्पना होईना. त्यानें दिवाणखान्यांतील दिवा मोठा केला आणि दरवाजा उघडला. तोंच यशवंत त्याच्या दृष्टीस पडला.

"कायरे यशवंत, इतक्या रात्रीं कुणीकडे ? जेवलास का ?"

"हो. आज तर मी सर्वांच्या आधीं नंतर मारला." आनंदानें यशवंत म्हणाला. "पण प्रभाकर, आज मी खाणीवरून लवकर कसा आलों, तें सांगूं का ? आज रोजच्या प्रमाणें मी खाणीवरून सुटल्यावर घरीं यावयास निघालों. मला दुःख जर कांहीं होत असेल तर हें खाणीवरून येण्याजाण्याचेंच ! मी काम करायला मरत नाहींरे ! पण रोज सकाळ संध्याकाळ पांच पांच मैल जाण्यायेण्यानें माझ्या कंठीं प्राण येतो. त्यांतून हें माझें छातीचें दुखणें ! आज माझी छाती जरा जास्त दुखत होती, म्हणून येतांना मी

बंडूला विचारलें कीं, ' आजचा दिवस मला तुझा घोडा दे. ' पण तो मला घोडा देणार ?—नांव कशाला ! शेवटीं तसाच मनाचा हिय्या करून मी निघालों. थोडा पुढें आलों, तोंच तुला येथें पोहोंचवून परतलेला टांगा मला भेटला. तो टांगेवाला त्या दिवसाचाच होता. त्यानें मला पाहतांच टांगा उभा केला. आणि मला ह्मणाला, ' यशवंतराव, बसा माझ्या टांग्यांत. मी तुह्माला दाजीबाच्या आंबराई-पर्यंत नेऊन सोडतो. ' मीहि मनांत ' देव पावला ! ' असें ह्मणून मुकाट्यानें टांग्यांत बसलों. आणि दहा मिनिटांत वाडीजवळ येऊन उतरलों. मजजवळ भाडें द्यावयास नव्हतें. तेव्हां तो ह्मणाला, " यशवंतराव, तुह्मी आमचें खरे धनी आणि मायबाप आहांत. तुमचें भाडें आह्माला केव्हांहि मिळेल, " असें ह्मणून तो मुकाट्यानें माझें भाडें न घेतां परत गेला. मोठा सज्जन मनुष्य ! "

" आहे खरा तो सज्जन ! त्या दिवशीं बंदरावर जातांना तुला खाणीजवळ सोडल्या नंतर मी त्याला तुझी सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून त्या अडाणी माणसालाहि वाईट वाटलें, बरं असो—मग पुढें ? "

" मग मी घरीं आल्यावर प्रथम सर्वांच्या आधी जेवलों. आणि भाऊसाहेब अद्यापि आले नाहींत असें पाहून सगुणाआत्याला विचारले आणि हा मी तुझ्याकडे आलों. पण मधुकराचें काय झालें ? तो आला का तुझ्याबरोबर ? "

" छे !–" असें ह्मणून प्रभाकरानें पुण्याची सर्व हकीकत त्याला सांगितली. नंतर त्यांच्या बराच वेळ गोष्टी झाल्यावर यशवंताची प्रकृति दाखविण्याकरितां केशवशास्त्र्यांकडे केव्हां जावयाचें तें त्यांनीं ठरविलें.

" बरं तर प्रभाकर, मी आतां जातो. रात्र बरीच झाली ! "

" मग मल्हारीला देऊं कां तुझ्या बरोबर? "

" नको. मी जाईन एकटा. "

यशवंत घरीं जाण्याकरितां निघाला, त्यावेळीं दहा वाजून गेलें होते.

परंतु वाचकहो ! यशवंत मोठ्या आनंदानें प्रभाकराच्या घरीं बसून गोष्टी बोलत होता, त्यावेळीं देशमुखवाडींत काय प्रकार घडला, तो आपणास समजला पाहिजे. यशवंत घरून निघाल्यानंतर थोड्या वेळानें भाऊसाहेब घरीं आले. थोड्या वेळानें सर्व मंडळी

जेवणाकरितां बसली. परंतु पंक्तीला यशवंत नाहीं, असें पाहून त्यांनीं चोकशी केली. तेव्हां तो जेवून प्रभाकराच्या घरीं गेला आहे, असें त्यांना कळलें. त्यानंतर त्यांनीं जास्त विचारपूस केली नाहीं. नंतर जेवण आटोपल्यावर भाऊसाहेब बाहेरच्या दिवाणखान्यांत आले आणि भिंतीला लावलेल्या घड्याळाकडे पहात नोकराला हांक मारून मोठ्यानें ह्मणाले, " राघोजी, काल मी सक्त ताकीद दिली होती, ती तूं विसरलास काय ?---काय मी काल सांगितलं होतं ?---नाहीं आठवण ?- -तुमचीं डोकीं अगदीं बथ्थड झालीं आहेत. तुह्माला दंड केल्याशिवाय तुह्मी ताळ्यावर येणार नाहीं ?---जा, बघतोस काय माझ्याकडे ! नऊ वाजतां दरवाजे बंद करण्याचा मी हुकूम दिला होताना ?--मग अद्यापि दहा वाजायला आले तरी हा दरवाजा उघडा कसा ? "

राघोजी मुकाट्यानें जाऊन दरवाजा बंद करीत असतां सगुणाबाई हळुहळू आपल्या खोलींतून बाहेर आली आणि पतीकडे पहात विनयानें ह्मणाली, " थोडावेळ दरवाजा उघडा ठेवा ह्मणते ! "

" काय ?--दरवाजा उघडा ठेवूं ?--नाहीं ! माझ्या हुकमाप्रमाणें रोज नऊ वाजतां दरवाजा बंद झालाच पाहिजे ! "

" पण यशवंत यावयाचा आहे, तो मला विचारून गेला आहे—"

" बरं मग ? तुला विचारून गेला ह्मणून त्याला नवाच्या आंत येतां येत नव्हतं की काय ? आणि तो इतक्या रात्रीं घरांतून काय ह्मणून बाहेर गेला ?--बस्स् ! तें कांहीं नाहीं, तो ठरलेल्या वेळांत आला नाहीं, तेव्हां आतां त्याला दरवाजा उघडायचा नाहीं, हें लक्षांत ठेवा. आणि ह्या माझ्या हुकुमाविरुद्ध कोणी वागेल तर तें मला खपायचं नाहीं, हें मी पुनः बजावून ठेवतो. " असें रागानें ह्मणून भाऊसाहेब जाऊं लागले. इतक्यांत त्यांना आणखी एका गोष्टीची आठवण होऊन ते मागें फिरले. आणि पुनः म्हणाले, " आणि हें पहा, यशवंत आल्यावर त्यानें दरवाजा उघडण्याकरितां हांक मारिली असतां त्याला कोणी ' ओ ' देखील देतां उपयोगी नाहीं. "

आपल्या पतीचें हे निष्ठुर वचन ऐकून बिचाऱ्या सगुणाबाईला काय बरें वाटलें असेल ! तिला आतां रहावेना ! शेवटीं मनाचा हिय्या करून ती ह्मणाली, " ही एकच वेळ त्याला क्षमा करणं होईल तर बरं—"

" नाहीं–क्षमा होणें नाहीं ! "

" बाहेर कोण कडाक्याची थंडी पडली आहे. अशा थंडींत—"

" त्याचा विचार त्यानें प्रथमच करावयास पाहिजे होता. आतां काय त्याचं ! "

जास्त प्रश्नोत्तराच्या भानगडींत न पडतां भाऊसाहेब माडीवर चालते झाले. त्यांना वर जाऊन थोडावेळ झाला नाहीं तोंच बाहेरचा दरवाजा वाजला !

यशवंतानें बाहेरून दरवाजा लोटला. परंतु काय ?—दरवाजा बंद !

अरेरे ! त्या आवाजाबरोबर तेथें असलेल्या दोन व्यक्तींच्या अंतःकरणावर वज्राघाताचा जणूं प्रतिध्वनीच उमटला ! आणि त्या व्यक्ती ह्मणजे सगुणाबाई आणि कृष्णा ! आज हुकूम इतक्या कडक रीतीनें अमलांत आणण्याचा खरा हेतु काय ? हें सगुणाबाईच्या लक्षांत आलें. हा सर्व प्रकार यशवंताला छळण्याकरितांच झाला आहे, हें त्या साध्वीला कळत नव्हतें काय ? पण त्या गोष्टीचा प्रतिकार कसा करणार ? तिला काय अधिकार होता ? प्रयत्न करावयाचा त्या दिशेनें तिनें केला होता. पण भाऊसाहेब तिचें ऐकतील तेव्हां ना ?

थोड्या वेळानें ' कृष्णा ' अशी बाहेरून हांक मारलेली स्पष्ट ऐकूं आली. सर्वांनीं ती हांक ऐकली. परंतु कोणीच ' ओ ' देईना. पुनः हांक ऐकूं आली. नंतर मोठ्या मोठ्यानें हांका मारलेल्या ऐकूं येऊं लागल्या. शेवटीं, ' इतक्यांत कसें सर्वजण झोंपलें !–काय बुवा चमत्कार !–अहो आत्या– ' हे शब्द ऐकूं आले !

" आत्या, मी उघडूं का दरवाजा ?" शेवटीं राहवेना, तेव्हां रडक्या स्वरानें कृष्णानें हळूंच विचारलें. परंतु आत्या तिला काय उत्तर देणार ?

" उघडूं का दरवाजा ! " तिला वेडावीत बंडूनाना ह्मणाला. त्याबरोबर वत्सला आणि इंदु बाळ हंसूं लागली. कृष्णाला तर मेल्याहून मेल्यासारखें झालें. ह्मणतात ना ?—' मुलांचा खेळ होतो, पण बेडकांचा जीव जातो. '



# प्रकरण १५ वें.



## जेवण नाहीं.





यशवंत अगदीं कंटाळला. त्यानें बाहेरून पुष्कळ हांका मारिल्या. परंतु आंतून कोणीच ' ओ ' देईना ! शेवटीं त्यानें घराला वळसा देऊन आत्येच्या खोलीच्या खालीं जाऊन हांका मारण्याचा विचार केला. त्यावेळीं सर्व वाड्यांत काळोख होता. यशवंत चांचपडत मागें गेला आणि सगुणाबाईच्या खोली खालीं उभा राहून तो आपल्या आत्येला हांका मारूं लागला. दोन चार लहान मोठ्या हांका मारिल्या. परंतु छे ! जणूं काय मध्यरात्र झाली आहे, अशा प्रकारची सर्व घरांत सर्वत्र शांतता होती. यशवंत तेथेंच उभा राहून आतां पुढें काय करावें, याचा विचार करीत राहिला. आपणास आत्येनें देखील 'ओ' देऊं नये. याचें त्याला आश्चर्य वाटलें. क्षणभर त्याच्या मनांत आत्येविषयीं शंका येते न येते तों वर खिडकी वाजल्याचा आवाज झाला. तेव्हां त्यानें वर पाहिलें. थोड्या वेळानें दिवा लागला. आणि आत्या दिव्याच्या मागें उभी राहून हातवारें करीत आपणास कांहीं खुणा करीत आहे, असें त्याला दिसलें. त्यानें हळूंच पण तिला ऐकूं जाईल अशा आवाजांत " आत्या, दार उघड. मी यशवंत आहे. " असें म्हटलें. तेव्हां तिनें आपल्या कपाळाला हात लावून ' आपणास दार उघडतां येत नाहीं, ' असें खुणेनें दर्शविलें. ती आणखी कांहीं खुणा करणार होती, इतक्यांत माडीवर भाऊसाहेबांच्या खोलीचा दरवाजा उघडल्याचा आवाज झाला. त्याबरोबर सगुणाबाईनें चटकन् आपल्या खोलींतील दिवा मालविला.

बराच वेळ यशवंत तेथें उभा होता. आधल्या दिवशीं दरवाजा बंद करण्याची भाऊसाहेबांनीं आपणास दहशत घातली होती, ती आज त्यांनीं खरी करून दाखविली, अशी आतां त्याची खात्री झाली. नाहींतर आत्येनें आपणास दरवाजा उघडला असतां अशी त्याची खात्री होती. आतां आपण येथें उभे राहून कितीहि डोकेफोड केली

तरी आपणांस कोणीहि दरवाजा उघडणार नाहीं, असें शेवटीं वाटून तो मोठ्या विचारांत पडला. प्रभाकराकडे जावें असें एकदां त्याला वाटलें, परंतु ती मंडळी आतां झोंपली असतील, शिवाय प्रभाकराला प्रवासाचा शीण आला असेल तेव्हां आतां परत जाऊन त्याला त्रास देणें चागलें नाहीं, असा विचार त्याच्या डोक्यांत आला. मग इतक्या रात्रीं जावें कुठें ? उघड्या हवेंत गवतावर तर झोंपतां येत नाहींना ? अशा विचारांत तो गोंधळला असतां देवडीवर झाताऱ्या रायबाचा खोकण्याचा आवाज त्याला ऐकूं आला. तेव्हां मात्र त्याला धीर आला. तो हळुहळूं देवडीवर आला आणि रायबाला हांका मारूं लागला. थोडया वेळानें ' कोण आहे ? ' ' कोण आहे ? ' असें विचारीत काशीनें दरवाजा उघडला.

"कोण यशवंतराव ? काय पाहिजे तुम्हाला?" त्याला पाहून काशीनें आश्चर्यानें विचारलें.

" काशी, रायबा झोपला कां ?--तूं माझं एक काम करशील का ? "

" हो--सांगा, काय आहे तुमचं काम ? बाबा नाहीं अझून झोंपला--"

" काशे, कोण आहेग बाहेर ? " आंतून रायबानें खोकत खोकत घोगऱ्या आवाजांत विचारले. परंतु काशीनें उत्तर देण्यापूर्वींच यशवंत आंत गेला. त्याला पाहतांच रायबा घोंगडीवरून उठून बसला. आणि कोपऱ्यांतील चिलीम त्यानें हातांत घेतली.

" काय यशवंतराव, झोंपायला नाहीं गेला अझून ? "

" जायचं कुठें ? झोंपायला तर आलों येथें ? "

" का बरं ? "

" आज मला भाऊसाहेबांनीं घरांत घेतलं नाहीं. मी जर नवाच्या आंत घरीं आलों नाहीं तर मला कोणीहि दरवाजा उघडूं नये, असा त्यांनीं काल हुकूम सोडला होता. त्याप्रमाणें आज मला घरीं येण्यास नऊ वाजून गेले आतां दरवाजे बंद झाले. मी पुष्कळ हांका मारिल्या परंतु आंतून कोणी दरवाजा उघडीत नाहीं, तेव्हां मी येथें देवडीवर झोंपायला आलों. "

बराच वेळ रायबानें उत्तर दिलें नाहीं. भाऊसाहेबांचें हें वर्तन पाहून त्याच्या अंगाचा रागानें भडका झाला. परंतु तो गप्प राहिला. अशा रात्रीच्या वेळीं आपण भाऊसाहेबाविरुद्ध बोललों, आणि यशवंताचा राग प्रदिप्त केला, तर तो एककल्ली पोर आपल्या चुलत्या

सारखी डोक्यांत राख घालून चालता व्हावयाचा, ही त्याला भीति होती ह्मणून आपला सर्व राग गिळून यशवंताची समजूत करीत तो ह्मणाला, "एकून यशवंतराव, आज तुह्मी माझ्या गरीबाच्या झोंपडींत झोंपणार तर !– ठीक आहे. भाऊसाहेबांनीं आज तुह्माला घराबाहेर ठेवलं त्यामुळें तरी माझी गरीबाची झोपडी पुनीत झाली." अशा रीतीनें विषयाला सौम्य स्वरूप देऊन हळुहळूं त्यानें त्याची झोपण्याची व्यवस्था केली. आंतल्या पडवींत एका बाजूला काशीनें जागा झाडून तेथें दोन घोंगड्या आंथरून दिल्या. त्यावर यशवंत जाऊन निजला. त्याच्या मनांत आतां भाऊसाहेबांनीं आपणास घरांत न घेतल्या बद्दल विचार न येतां, आपल्या येण्यामुळें रायबाला किती तरी आनंद झाला, हाच विचार घोळूं लागला. बोलून चालून पोरच तो ! ज्या बाजूला त्याच्या विचाराचा ओघ वळवि-ला त्याच बाजूला तो वळणार !

घोंगडीवर झोंपल्यामुळें त्याचा सुकुमार देह दुखूं लागला होता. दुसऱ्या दिवशीं सकाळ-च्या प्रहरीं यशवंत बराच पहाटेस जागा झाला. परंतु त्याला उठून बसवेना ! कारण उघ-ड्यावर नुसत्या घोंगडीवर निजल्यामुळें त्याच्या छातींत दुखूं लागलें. बराच वेळ तो घोंगडीवर पडून होता. आपण आतां उठूच नये असें त्याला वाटूं लागलें. एकदोनदां रायबानें डोकावून त्याच्याकडे पाहिलें, परंतु यशवंतरावानें डोक्यावरून पांघरून घेतलें असल्यामुळें तो झोंपला आहे, असाच त्याचा समज झाला, ह्मणून त्यानें हांक मारिली नाहीं. शेवटीं आठ वाजले. आतां यशवंताला उठविलेंच पाहिजे, नाहीं तर भाऊसाहेबांच्या रागाला तेवढेंच कारण पुरेसें होईल, असें वाटून त्यानें यशवंताला हळूंच हांक मारिली.

" रायबा, मला बिलकूल हालवत नाहीं. माझ्या छातींत पुनः दुखूं लागलें." अंत-स्वरांत उच्चारलेलें हें वाक्य ऐकून रायबाच्या पोटांत कालवा कालव झाली. त्यानें पुढें होऊन हळूंच त्याच्या छातीवरून हात फिरविला. आणि आपल्या मुलीला हांक मारिली. काशी वाड्यांत जाण्याच्या गडबडींत होती. परंतु तिला थांबवून त्यानें एक विटेचा तुकडा तापवून आणावयास सांगितलें.

दहा पंधरा मिनिटें चांगल्या प्रकारें शेकल्यावर यशवंताला बरें वाटूं लागलें. त्याच्या छातींतील कळा बंद झाल्या, तेव्हां तो उठला आणि म्हणाला, " रायबा, आतां मला पुष्कळ बरें वाटूं लागलें. आणखी थोडावेळ जास्त शेकलं तर माझी छाती साफ बरी

होईल. पण आतां नको. आतां फार वेळ झाला. अद्यापि स्नानसंध्या, जेवण होऊन खाणीवर जावयाचं आहे."

यशवंत वाड्यांत आला त्यावेळीं बाहेरच्या बाजूला कोणी नव्हतें. तो आंत गेला तेथें वत्सला वेणीफणी करीत बसली होती आणि जवळच इंदूची वेणी घालीत कृष्णा बसली होती. यशवंताला पाहतांच वत्सला मोठ्यानें म्हणाली, "या-तुम्ही यशवंतराव ! कुठें होती आपली स्वारी रात्रभर ?"

परंतु तिला उत्तर न देतां यशवंत मागल्या परसांत गेला. त्यानें आपलें शौच्यमुख-मार्जन इत्यादि विधि आटोपलें आणि स्नानाला पाणी काढून घेतलें. तो स्नान करीत असतां दुर्गाताई दोन वेळां तेथून गेली परंतु तिनें एका शब्दानेंही त्याला विचारलें नाहीं. यशवंत स्नान आटोपल्यावर वर गेला. इतक्यांत भाऊसाहेब बाहेरून आले. त्यांनीं आंत येतांच आपल्या बहिणीला बाहेर हांक मारिली आणि 'आपणास कामाकरितां शहरांत जाणें आहे, करितां लवकरच जेवणाची तयारी करावी,' असा हुकूम सोडला. वास्तविक त्यांच्या घरीं जेवण फार लवकर तयार होत असे. कारण बाबुराव आणि यशवंत सकाळीं जेऊनच खाणीवर जात असत. भाऊसाहेब मात्र क्वचित्‌च इतक्या लवकर जेवित असत.

लवकर पानें वाढून झालीं. भाऊसाहेब आंत येऊन पाटावर बसले. त्यांनीं आपल्या बाजूला दुसरीं दोन पानें वाढलेलीं पाहतांच पुनः आपल्या बहिणीला हांक मारिली आणि तीं दोन पानें कोणाची म्हणून त्यांनीं विचारलें. दुर्गाताईनें दरवाजांतून उत्तर दिलें कीं, " एक पान बंडूचें आणि दुसरें यशवंताचें ! "

दुर्गाताईनें हें उत्तर द्यावयाला आणि यशवंत आंत यावयाला एकच गांठ पडली. परंतु त्याकडे लक्ष न देतां यशवंत आपल्या पाटावर जाऊन बसूं लागला, तोंच भाऊसाहेब दरडावून म्हणाले, " कायरे येशा, तूं कशाला आलास येथें ? "

" जेवायला." यशवंतानें साधें उत्तर दिलें.

" रात्रीं कुठें होतात ? "

" येथेंच."

"येथेंच ! येथेंच म्हणजे कुठें ?–घरांत कीं घराच्या बाहेर ! "

" घराच्या बाहेर. मला कुणी दरवाजाच उघडला नाहीं."

" मग रात्रीं भटकायला कशाला गेला होतास ? तुला मी परवां काय सांगितलं होतं ? गध्धा, आतां तुला लांब कान फुटूं लागले काय ? ठीक आहे. जा—आज तुला येथें जेवण मिळणार नाहीं !"

यशवंतानें क्षणभरच भाऊसाहेबांच्या रागीट दृष्टीला आपली दृष्टि भिडविली. तो कांहीं बोलणार होता. परंतु तितक्यांत त्याचा विचार बदलला. आणि त्याबरोबरच त्याच्या चर्येवर रागाची झांक दिसूं लागली. तें पाहून भाऊसाहेब पुढें ह्मणाले, "गाढवा, डोळे वटारून बघतोस काय माझ्याकडे ? आणखी जरी डोळे फाडफाडून पाहिलंस तरीहि मी तुझ्या डोळ्यांत मावणार नाहीं समजलास ! जा—चालता हो. अद्यापि शहाणा हो आणि रात्री भटकणं सोडून दे. "

एक चकारशब्द न उच्चारतां यशवंत बाहेर पडला. तोंच सगुणाबाई समोरून येतांना त्याच्या दृष्टीस पडली. तिनें यशवंताला पाहतांच आपणाकडे येण्याची त्याला खूण केली. यशवंतहि मुकाट्यानें तिच्या खोलींत गेला. तो आंत येतांच सगुणाबाईनें हळूंच दरवाजा लोटून त्याच्याकडे पहात ती करुणस्वरांत ह्मणाली, " यशवंत, बाळ, रात्रीं तूं होतास कुठें ? सर्व रात्र माझ्या डोळ्याला डोळा लागला नाहीं. तूं कुठें झोंपला असशील, थंडीवाऱ्यांत तूं कुठें गेला असशील, ह्या विचारांनीं मला सर्व रात्र अगदीं भणाणून सोडलं होतं. बाळ, तुला तिकडचा स्वभाव माहिती आहे, मग तूं असं कां केलंस ! कां बरं काल लवकर आला नाहींस ? तुला दरवाजा उघडून आंत घ्यावं म्हणून मला किती तळमळ लागली होती. पण बाळ, मी तरी काय करूं ! देवा—ह्या माझ्या लाडक्याचीं दुःखंच पहात कां रे माझा अंत होणार ? " असें म्हणून आपल्या दुःखाच्या हुंदक्याबरोबरच तिनें यशवंताला जवळ ओढून आपल्या हृदयाजवळ घट्ट आंवळून धरिलें. तिला हुंदक्यावर हुंदके येऊं लागले.

" आत्या, तूं का उगाच स्वतःला वाईट वाटून घेतेस ! माझं नशीबच तसें खडतर आहे. "

"पण बाळा, तूं झोंपला होतास कुठें ? "

" मी रायबाच्या घरीं गेलों. तेथेंच रात्र काढली. सकाळीं पुनः माझ्या छातींत

दुखूं लागलें. पण रायबानें माझी छाती गरम विटेनें शेकली. आतां मला पुष्कळ बरं वाटतं. "

" ईश्वर त्याचें कल्याण करो !—पण यशवंत, तुला आतां खाणीवर जावयाचं असेल ना ? जेवलास का तूं ? "

" नाहीं. आज मला जेवण मिळायचं नाहीं म्हणून मघां भाऊसाहेब म्हणाले. आत्या, आज मला भाऊसाहेबांनीं पाटावरून उठविलें. " हें दुसरें वाक्य उच्चारित असतां त्याच्या आवाजांत फरक पडला. तो पुढें म्हणाला " आत्या, मला जर कांहीं दुसरी सोई असती तर आत्या, मी येथें एक क्षणभरहि राहिलों नसतों. "

सगुणाबाई त्याच्याकडे अश्रुयुक्त नेत्रांनीं क्षणभर पहात राहिली. नंतर तिनें त्याला पुनः आपल्या जवळ ओढून घेतलें आणि केविलवाण्या स्वरानें ती म्हणाली, " असं नकोरे म्हणूं ! बाळ, तुला माझी दया नाहीं कारे येत ! माझ्या जर कांहीं हातांत असतें तर—तर—माझ्या ह्या लाडक्यांना——"

" आत्या, आतां तें जाऊं दे. " मध्येंच यशवंत ह्मणाला, " खाणीवर वेळ झाला तर पुनः दुसरंच कांहीं उपस्थित होईल. "

" थांब—यशवंत—माझी—एकच गोष्ट ऐक—"

यशवंत मागें फिरला. त्यावेळीं सगुणाबाईच्या वाणींत इतका करुणस्वर भरला होता कीं, यशवंतालाहि भडभडून आलें !

" यशवंत, तूं आज संध्याकाळीं लवकर येशील ना ?—सांग ? "

" होय. आत्या, आज मी खरंच लवकर येईन. "

" पण बाळ, आज तूं सर्व दिवस उपाशींच का राहणार ? अरेरे ! नारायणा ! माझ्याजवळ पण द्यायला कांहीं नाहीं ! "

" आत्या, तूं नको त्याची काळजी करूं ! मी करीन कांहीं तरी तजवीज—"

असें ह्मणून यशवंत तेथून निसटला. सगुणाबाई तेथेंच एखाद्या स्फटिक पुतळ्याप्रमाणें त्याच्याकडे पहातच राहिली. तिच्या मनाला रात्रीपासून भयंकर हेलकावे बसत होते. एका बाजूला आड आणि दुसऱ्या बाजूला विहीर अशा दुहेरी संकटांत ती पूर्णपणें

सांपडली होती. रात्रीपासून विचारांनीं तिची सारखी पाठ पुरविली होती. आपण, आपलीं मुलें आणि आपला पति ज्या ऐश्वर्याचा उपभोग घेत आहोंत, त्याचा खरा मालक यशवंत असतांना आज त्याला त्याच्याच घरांत घांसभर अन्न मिळूं नये काय ? हा एकच विचार आतां तिच्या मनांत आला, त्याबरोबर त्याच्या पुढल्या विचारांची मालिका सुरू झाली. आपला पति, आपलीं मुलें आज गाडीघोड्यांतून फिरतात. आणि खरा मालक रोज आठ दहा मैल पायीं रखडतो, हा दुसरा विचार तिच्या मनांत येतांच तिला कांहींच सुचेनासें झालें. तिचें डोकें जड झालें, तेव्हां आतां क्षणभर पडावें अशा उद्देशानें ती उठली आणि आपल्या पलंगाकडे जाऊं लागली. इतक्यांत हळूंच दरवाजा उघडून एखाद्या मांजरासारखी कृष्णा आंत आली.

" आत्या, आज–आज यशवंत–" कृष्णेच्या मुखांतून नीट शब्दोच्चारहि होईना !



# प्रकरण १६ वें.

## प्रश्नउत्तरें.



संध्याकाळ झाला होता. प्रभाकर आणि केशवशास्त्री परत घरीं येत होते. त्यांच्या येण्याच्या दिशेवरून दोघेहि बहुत करून खाणीवर गेले असावेत असें दिसतें. परंतु असें संशयात्मक कशाला? आणि त्याचें भाषणच ऐकूं या ह्मणजे आपणांस तात्काल उलगडा होईल.

" खरोखर भाऊसाहेब ह्मणजे ह्या गांवांतलं एक पाप आहे ! " शास्त्रीबुवा बोलत होते. " मी त्याला केव्हांपासून ओळखून आहें. तुझ्या बापाचं–दाजीबाचं मृत्युपत्र वाचल्यावर तुला त्यानें कसा चमत्कारिक शह देण्याचा विचार केला होता ? "

" होय. पण त्यावेळीं मुकुंदशेट होते ह्मणूनच बाजू निभावली ! " प्रभाकरानें उत्तर दिलें. " नाहीं तर मुकुंदशेटच्या ऐवजीं जर तेथें दुसरा कोणी असता तर मात्र आज मी त्या करारानें बांधलेला असतों. "

" पण प्रभाकर हें मात्र तूं पक्कें लक्षांत ठेव कीं, सत्य हें सदां सत्यच राहणार आहे. आतां ह्या पोरांना–यशवंत आणि त्याची बहिण कृष्णा यांना जरी हा छळतो आहे, तरी पुढें असा एक दिवस उगवणार आहे कीं, ह्याच भाऊसाहेबाला यशवंताच्या पाया पडतां पडतां पुरे वाट होईल. "

" असा दिवस उगवण्यापर्यंत ईश्वरानें त्याला आयुष्य मात्र द्यावें ! पण आजच्या दिवसावरून पाहतां यशवंताविषयीं मला तर खरोखरीच भीति वाटते. त्यांतून जर त्याला असें उपास पडूं लागले, आणि अशी रोज दहा दहा मैलाची रखड पडूं लागली मग तर काय विचारूंच नका ! केव्हां तो पोर जातां येतां ह्या रस्त्यांतच मरून पडेल तें देखील कळणार नाहीं ! "

" असं तर खरंच ! पण आपण ह्याला कांहीं तरी तोड काढिली पाहिजे." असें ह्मणून शास्त्रीबुवा विचार करूं लागले. चाळीस पन्नास पावलें चालून गेल्यावर ते प्रभाकराकडे वळून गंभीर स्वरांत पुढें ह्मणाले, " हें पहा, मला एकच मार्ग दिसतो— तुला मात्र थोडा त्रास सोसावा लागेल."

" हं--त्यांत काय आहे ! मला कितीहि त्रास पडला तरी त्याचं मला कांही वाटणार नाहीं !"

" इतकी जर तुझी तयारी असेल तर ऐक, तूं त्या खाणीजवळच्या तुमच्या शेतांत रोज एकदां केव्हां तरी चक्कर मारून येतोसच ! तर उद्यांपासून असं कर. त्या शेतांत जाण्याचा वेळ सकाळचा ठरवून टाक. आणि जातांना चालत न जातां तुमची घरची गाडी आहेच ! तींतून जात जा. पण तो वेळ असा जमवून आण कीं, त्यावेळीं यशवंत खाणीवर जात असेल. ह्मणजे अनायासें त्याला तुझ्या गाडींतून जातां येईल. आणि यदाकदाचित् भाऊसाहेबांच्या लक्षांत तें आलं, तरी तुलाहि त्यांना असं खोंचून सांगतां येईल कीं, त्या बिचाऱ्याला त्याची हक्काची गाडी घोडा असतांना तुह्मी त्याला रखडत इतक्या लांब पाठवितां त्यापेक्षां अनायासें माझी गाडी बसायला त्याला मिळते, तर त्यांत तुमचं काय कमी होतें ? आणि तुमच्या कां उगीच पोटांत दुखतं ?"

" वाः शास्त्रीबुवा, मी जर भाऊसाहेबांच्या तोंडावर असं बोललों, तर ते मला जिवंत चावून खातील !"

" अरे, तुझं काय आतां त्यांच्याकडून वाकडं होणार आहे ? तुह्माला त्यांचं कर्ज देणें आहे ह्मणून का तूं भितोस ? बोलून चालून त्यांनीं तुमचा विश्वासघात केलेला ! शिवाय कर्ज कर्ज असं आतां किती राहिलं आहे ? दोन चार हप्ते दिले कीं फिटलं !"

प्रभाकरानें कांहीं वेळ उत्तर दिलें नाहीं. त्याला ही शास्त्रीबुवांनीं सांगितलेली गोष्ट पटली परंतु ती आपणाकडून किती प्रमाणांत अमलांत येईल, याचीच त्याला शंका होती. तो कांहीं बोलत नाहीं असें पाहून शास्त्रीबुवा ह्मणाले, " बरं तर प्रभाकर, मी आतां ह्या रस्त्यानें जातों. तेथें एका रोग्याला पाहून मग मी घरीं जाईन. तूं आतां जा. पण मी गाडीचं सांगितलं तें लक्षांत असूं दे. मी उद्यां सकाळीं यशवंतकरितां तुझ्याकडे औषध पाठवून देईन. जा—"

शास्त्रीबुवा निघून गेल्यावर प्रभाकर एकटाच निघाला. त्यानें यशवंताबरोबर आधल्या दिवशीं रात्रीं ठरविल्याप्रमाणें आज दुपारीं शास्त्रीबुवांना बरोबर घेऊन खाणीवर नेले होते. तेथें त्यांनीं यशवंताची प्रकृति नीट तपासून पाहिली. त्यावेळीं यशवंताच्या सांगण्यावरून तो आज उपाशी आहे, असें त्यांना कळलें. तेव्हां प्रभाकरानें खाणीच्या बाजूच्या गांवावर जाऊन चौकशी करून थोडे पोहे आणि दूध खरेदी करून आणलें आणि तें यशवंताला दिलें. हा सर्व प्रकार बाबुरावानें पाहिला परंतु तो कांहींच बोलला नाहीं. कारण तो प्रभाकराला चांगलाच वचकून होता. पहिल्या प्रकरणांत त्या विषयीं थोडासा उल्लेख येऊन गेलाच आहे. त्या प्रसंगापासून तो बहुतेक करून प्रभाकराला टाळत असे. आज प्रभाकरानें आपणाबरोबर शास्त्रीबुवांना आणले, यशवंताची प्रकृति तपासली, त्याला दूध पोहे खावयास दिले, हें सर्व पाहून त्यानें आपला राग तोंडानें जरी व्यक्त करून दाखविला नाहीं, तरी कपाळावर आठ्यांचें जाळें पसरून तो तशा रीतीनें क्षणोक्षणीं व्यक्त केलाच ! परंतु प्रभाकरानें किंवा शास्त्रीबुवांनीं त्याकडे लक्षच दिलें नाहीं. कारण बाबुरावाचें पाणी ते केव्हांच ओळखून चुकले होते !

असो. प्रभाकर एकटाच येत असतां पलीकडील शेतांतून भाऊसाहेब आपल्या घोड्यावरून जातांना त्याच्या दृष्टीस पडले. ते त्यावेळीं खाणीवर जात होते. त्यांनीं प्रभाकराला जातांना पाहून आपला घोडा वळविला. ते आपणाकडे येत आहेत असें जरी प्रभाकराच्या लक्षांत आलें, तरी तो न थांबतां पुढेंच चालला होता. थोड्या वेळानें भाऊसाहेबांचा घोडा त्याच्या अगदीं जवळ आला.

" काय हो प्रभाकरपंत, इतकी टाळाटाळ करूनसे चाललां ? " त्याच्या बाजूला आपला घोडा उभा करून भाऊसाहेब रागानें आणि हिणावण्याच्या उद्देशानें ह्मणाले, " मी ह्या बाजूला घोडा वळविला, त्यावरून मी तुझ्याकडेच येत आहें आणि तुझ्याबरोबर मुद्दाम बोलूं इच्छित आहें, हें तुझ्या लक्षांत येऊनहि तूं पुढें जात होतास काय ? "

" नाहीं. तुह्माला टाळण्याची मला जरूरी काय ? तुह्मी घोडा ह्या बाजूला वळविला ह्मणजे तुह्मी मजबरोबर बोलण्या करितांच येतां, असें मी कशावरून समजावें ? कारण ह्या पूर्वी कैकवेळां तुह्मी घोडा उडवीत माझ्याबरोबर एक चकार शब्दहि न बोलतां किंवा मी केलेला नमस्कारहि न घेतां माझ्या अंगावरून गेलां अहांत. "

" पण त्यावेळीं तुझ्याबरोबर मला बोलावयाचें नव्हतें—"

" मग आजच तुह्माला माझ्याबरोबर बोलायचें आहे, हें तरी मी कसं समजावं ? मी कांहीं तुमच्या मनांतलं भविष्य जाणणारा जोतिषी नाहीं. "

" बरं बरं ! तूं ज्योतिषी नाहींस हें मलादेखील माहित आहे. पण आतां मला जें काय सांगायचं आहे तें ऐक. तुझ्याकडे अलीकडे यशवंत येत असतो, तें मला बिलकूल पसंत नाहीं. तूं त्याला आपल्या घरीं येऊं देतां उपयोगी नाहीं. "

" ह्मणजे !—भाऊसाहेब, तुह्मी काय बोलतां तें मला नीट समजलं नाहीं ? "

" न समजायला काय झालं ? मी कांहीं मोर्डीत बोलत नाहीं. " रागानें पण वेडावांकडा शब्द काढीत भाऊसाहेब ह्मणाले, " आतां तुला सांगतों तें नीट लक्षांत ठेव आणि उगाच मला चिडविण्याचा प्रयत्न करूं नकोस. तुझ्याकडे यशवंत येतो, त्याला तूं आपल्या घरीं येऊं देऊं नकोस—"

" हें पहा भाऊसाहेब—" मध्येंच प्रभाकर शांतपणानें ह्मणाला, " हें आपलं सांगणं अगदीं माणुसकी सोडून आहे. यशवंत जर मजकडे आला तर मी त्याला स्वतः होऊन केव्हांच ' नको येऊं ' ह्मणून ह्मणणार नाहीं. असं असभ्यपणाचं वर्तन माझ्याकडून केव्हांहि होणार नाहीं. एखादा मनुष्य आपणाकडे आला असतां त्याचं योग्य स्वागत करणं हें मी माझं कर्तव्य समजतों. "

" पण माझी इच्छा तशी आहे. "

" ठीक आहे. तुमची इच्छा तशी असेल. पण त्याप्रमाणें माझीहि इच्छा असावी असं थोडंच शास्त्र आहे ? "

" सांभाळ—प्रभाकर सांभाळ ! तूं माझ्या प्रत्येक इच्छेच्या आड येत असतोस, पण ह्याचा परिणाम चांगला होणार नाहीं, हें मी तुला पुनः पुनः बजावून ठेवतों."

" आपण मला पुनः पुनः बजावण्याची तसदी घेऊं नये, इतकीच माझी आपणास विनंति आहे. कारण माझं हिताहित मला आतां फारच चांगल्याप्रकारें कळूं लागलें आहे. "

" असं काय ? तुझं हित तुला चागलं कळतं काय ? पण तुझी शेंडी माझ्या हातांत आहे, हें तूं विसरलास वाटतं ? "

" हें पहा भाऊसाहेब, आतां तुह्मी मला जास्त बोलायला लावूं नये हें चांगलं ! "

" कां—कां ? तूं कोण एवढा मोठा ढुढाचार्य आहेस, तर तुझ्या बोलण्याची मला इतकी भीति ? "

"भाऊसाहेब, उगाच शब्दानें शब्द वाढतो, तेव्हां आतां कोणी तरी पड खाऊन रहावं हेंच चांगलं ! तुह्माला जर कांहीं आतां जास्त सांगायचं नसेल तर मी आपली रजा घेतों. मला व्यर्थ शब्दानें वाद वाढविण्याची इच्छा नाहीं आणि वेळहि नाहीं. मला अद्यापि पुष्कळ कामें आहेत. "

" माहित आहेत तुला पुष्कळ कामें आहेत तीं ! मोठा कामाचाच पडलास की नाहीं ! मी जो तुला मुद्दाम थांबवून विचारीत आहें, तें मला कांहींच काम नसेल वाटतं ! " असें ह्मणून भाऊसाहेब जरा थांबले आणि थोड्या वेळानें पुढें ह्मणाले, " तूं अलीकडे फार उद्धट होत चाललास प्रभाकर ! मी ह्मणजे अगदीं तुझ्या गणतींतच नाहीं ! तुला वाटतं, आतां आपण मोठे झालों, भाऊसाहेब ह्मणजे आपल्यापुढें काय पदार्थ आहे, असंच ना ? "

प्रभाकर उत्तर न देतां मुकाट्यानें उभा होता. भाऊसाहेबांना एक सणसणींत उत्तर द्यावें असें प्रथम त्याच्या मनांत आलें. परंतु पुनः त्यानें दुरवर विचार करून मौन्य धारण केलें. आज होतांहोईल तोंपर्यंत आपण शांतवृत्ति सोडायची नाहीं, असा त्यानें निश्चय केलेला दिसत होता. तो कांहीं बोलत नाहीं असें पाहून भाऊसाहेब ह्मणाले, " कायरे प्रभाकर, बोलत कां नाहींस ?—यशवंत काल तुझ्याकडे आला होता ना ? "

" होय. आला होता. "

" किती वाजतां आला होता ? "

" रात्रीं नऊ वाजतां. "

" किती वेळ होता तुझ्याकडे ? "

" होता अर्धाएक तास. "

" काय सांगत होता तो तुला ? "

" आपल्या सुख–दुःखाच्या गोष्टी. "

" असं काय ? सुख–दु:खाच्या गोष्टी सांगत होता काय ? काय काय त्यानें सांगितलं ? आणि तूं त्याला काय काय उपदेश केलास ?–कारे ! आतां तुझं तोंड शिवलं ? सांग–तूं काय त्याला शिकवून ठेवलं आहेस ? "

" मी कोण त्याला शिकविणार ! तुह्मी समर्थ असतांना मला तुमच्या घरच्या भंडळींत पडण्याचं काय कारण ? "

" कारण काय ह्मणजे ! कारण तर फार मोठें आहे. आमचे दीड शहाणे यशवंतराव तुमच्याकडे येतात ते उगाच का येतात ? कारण तुह्मी त्यांचे हितचिंतक–खऱ्या कळकळीचे हितचिंतक बनलां अहांत ना ? "

" ठीक आहे. तुह्माला जर तसं वाटत असेल, तर तसंच समजा. "

" समजा काय ? अशानें नाहीं माझं समाधान होणार ! मला तुमचे सर्व बेत कळलेच पाहिजेत–काल तुह्मी सर्व रात्रभर बसून काय काय बेत केलेत ते सर्व मला कळलेच पाहिजेत ! "

" आह्मी रात्रभर बसून बेत केले ?–भाऊसाहेब, आपणाला हें कोणी सांगितलें ? "

" कोण सांगायला पाहिजे ? तुह्मां पोरांना वाटत असेल ह्या भाऊसाहेबांच्या कांहीं लक्षांत येत नाहीं ह्मणून ! पण तुमच्यापेक्षां दोन पावसाळे मी जास्त काढले आहेत. "

" भाऊसाहेब हा आपला अगदीं गैरसमज झालेला आहे. कारण आह्मी काल रात्रभर बसलोंच नव्हतो. "

" खोटं बोलूं नकोस प्रभाकर ! काल सर्व रात्र येशा तुझ्याकडेच होता. "

" मी खरं सांगत असतांनाहि तें तुह्माला खरं वाटत नाहीं मग माझा नाइलाज आहे. " असें ह्मणून प्रभाकरानें आपलें तोंड फिरविलें.

" चाललास कुठें ? मी विचारतों त्या प्रश्नाचें उत्तर दे—"

" माझी उत्तर देण्याची इच्छा नाहीं. आणि मला आतां वेळहि नाहीं. "

असें ह्मणून प्रभाकर जाऊं लागला. परंतु त्याचा तो शांतपणा पाहून भाऊसाहेबांचा राग जास्तच भडकला. थोड्यावेळापूर्वी शास्त्रीबुवाजवळ प्रभाकरानें भविष्य केल्याप्रमाणें खरोखरीच त्यावेळीं भाऊसाहेबांचा राग इतका वाढला होता कीं, प्रभाकराला जिवंत फाडून खावूं किं काय असेंच त्यांना झालें होतें !

" ए प्रभाकर—" पुनः आपला घोडा प्रभाकराच्या पुढें करून तो जात असतां त्याला आडवीत भाऊसाहेब रागानें ह्मणाले, " माझ्या पुढल्या हप्त्याचें काय केलेंस ? "

" त्याची आतां चौकशी करण्याचें कारण काय ? " पुनः शांतवृत्ति धरून प्रभाकरानें विचारलें, " आपल्या मुदतीची वेळ टळली तर आपण मला ह्याविषयीं विचारा ह्मणजे मी आपणास जें द्यावयाचें तें योग्य उत्तर देईन. "

" असें काय ? अद्यापि तूं मला ओळखलें नाहींस पोरा ! "

" वाः–इतक्या दिवसांचा नव्हे वर्षांचा परिचय होऊन जर मी आपणास ओळखलं नाहीं तर मी गाढवच ह्मणायचा ! "

" गाढव नव्हेस पण सात गाढव आहेस, समजलास ? "

" समजलों ! मी सात गाढव असलों तरी चालेल पण आपणासारखा दुसऱ्याचा विश्वासघात करून त्याचें सर्वस्व हरण करणारा–"

" प्रभ्या सांभाळ–" असें ह्मणून रागातिशयानें बेफाम होऊन भाऊसाहेबांनीं आपल्या हातांतील घोड्याचा चाबूक जोरानें प्रभाकराच्या अंगावर मारला. प्रभाकर ह्या सर्व गोष्टीला पूर्वींपासून तयारच होता. चाबूक आपल्या अंगावर येतांच त्यानें तो चटकन् पकडला आणि जोरानें ओढला. त्याबरोबर तो भाऊसाहेबांच्या हातून सुटला. चाबूक हातांत येतांच काय विचारतां ? तो त्यानें तसाच उलट भाऊसाहेबांच्या अंगावर उडविला. त्याबरोबर भाऊसाहेबांचा घोडा बिचकला. प्रभाकरानें मारलेला फटका भाऊसाहेबांना चांगलाच लागून घोड्याच्या तोंडालाहि तो चाटून गेला, तेव्हां तें जनावर उधळलें यांत कांहीं नवल नाहीं. भाऊसाहेब तर त्या धक्याबरोबर पडतां पडता वाचले. त्यांनीं आपला घोडा आंवरण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. परंतु छे ! घोडा उधळलाच ! हां हां ह्मणतां घोड्यानें भाऊसाहेबांना प्रभाकराच्या दृष्टीआड नेलें !

इतका प्रकार झाला, परंतु त्याचा प्रभाकरावर किंचितहि परिणाम झाला नाहीं. त्यानें आपली शांतवृत्ति जरादेखील ढळूं दिली नाहीं. फार वेळ एखादी माशी आपल्या शरीराच्या विवक्षित भागावर बसून आपणास त्रास देऊं लागली ह्मणजे आपण तिला शेवटीं हातानें उडवितों आणि पुनः आपल्या उद्योगांत आपण रमतों, त्याचप्रमाणें प्रभाकरानें हा प्रकार केला !

भाऊसाहेबांचा घोडा दृष्टीआड झाल्यावर प्रभाकर आपल्या मार्गानें जाऊं लागला. जातां जातां तो स्वगत ह्मणाला, " झाला हा प्रकार कांहीं ठीक झाला नाहीं ! पण मा-

झा यांत काय अन्याय आहे ? इतक्या थराला गोष्ट येऊं नये ह्मणून मी प्रथमपासून फार सावध होतो. हा सर्व दोष भाऊसाहेबांचाच आहे. तरीदेखील मी शेवटीं थोडासा अति प्रसंगच केला ! वास्तविक मी चाबूक उगारावयाचा नव्हता ! तरी मी तरी सहन किती करायचं ?—हा मांगहृदयी मनुष्य आतां कांहीं तरी कारण शोधून काढून मला छळणार यांत कांहीं संशय नाहीं. आतां मला पूर्वींपेक्षां जास्त सावध राहिलें पाहिजे हेंच खरं ?— जाऊं द्या आतां तो विचार ! होऊं नये ती गोष्ट झाली, आतां व्यर्थ त्याच गोष्टीचा काथ्याकूट करण्यांत काय अर्थ ?" अशा रीतीनें स्वतःच्या मनाचें समाधान करीत प्रभाकर हातांतील चाबूक फिरवीत चालला होता.

प्रभाकर कुंपणाजवळ आला त्यावेळीं पलीकडील मळ्यांत मुलें खेळत होतीं. त्या सर्व मुलांत इंदूबाळाचा हास्य ध्वनि मोठ्यानें ऐकूं येत होता. प्रभाकर क्षणभर तेथें उभा राहिला. हातांतील चाबूक स्वतः नेऊन परत देण्यापेक्षां एकाद्या मुलाला हांक मारून त्याच्याकडून तो देशमुखवाडींत परत पाठवावा असा विचार करून त्यानें एका मुलाला हांक मारिली. आणि चाबूक भाऊसाहेबांच्या रामजी घोडेवाल्यास नेऊन देण्यास सांगितलें मुलानें चाबूक घेऊन परत घेऊन जाण्याकरितां फाटक उघडलें, तों पलीकडे एका मोठ्या झाडाच्या बुंधाशीं तळहातावर गाल टेकून सचिंत बसलेली कृष्णा प्रभाकराच्या दृष्टीस पडली. त्यानें मुलाला हांक मारिली, मुलानें जोरानें कुंपणाचें फाटक उघडलें, तो तिच्या अगदी जवळून गेला परंतु त्यापैकीं एकहि गोष्ट कृष्णाच्या लक्षांत आली नाहीं, इतकी ती विचारांत भानरहीत झाली होती. प्रभाकर तिच्या अगदीं जवळ गेला, तरीदेखील तें कळलें नाहीं.

" कृष्णा ! "

छे ! कृष्णेला इतक्या जवळून मारलेली हांकदेखील ऐकूं आली नाहीं !

" कृष्णा ! "

ही दुसरी हांक प्रभाकरानें मोठ्यानें मारतांच एखाद्या भ्यालेल्या पाडसाप्रमाणें कृष्णा ताडकन् उठून मागें वळली.

" कृष्णा, कसला इतका गहन विचार चालला होता ? "

कृष्णानें पदर सांवरतां सांवरतां तोच पदर आपल्या डोळ्यावर धरला आणि हुंदके देत रडत रडत ती ह्मणाली, " आतां आमचं कसं होईल ? यशवंत—यशवंताला आज—"

तिला जास्त जास्त हुंदके येऊं लागले. ती तिची स्थिति पाहून प्रभाकराला स्वस्थ उभें राहवेना. त्यानें चटकन् आपल्या खिशांतील रुमाल काढून तिच्या खांद्यावर एक हात ठेविला आणि तोंडानें ' ऐक कृष्णे, तूं रडूं नको ! ' असें म्हणत तिचे डोळे पुसण्यास सुरवात केली. हा सर्व प्रकार कृष्णेची ती केविलवाणी स्थिति पाहून प्रभाकराकडून अगदीं स्वाभाविक झाला. परंतु त्याचा परिणाम किती तरी चमत्कारिक झाला. प्रभाकराचा हस्तस्पर्श होतांच कृष्णा एकदम चमकली ! तिच्या सर्वांगावर रोमांच उभे राहिले. ती गप्प राहिली. क्षणभरच तिनें प्रभाकराच्या मुखाकडे पाहिलें. आणि आपली मान त्यांच्या खांद्यावर टेकली. क्षणभरच ती त्या स्थितींत होती. परंतु तितक्या अल्पावधींत तिच्या बावरलेल्या चिंताक्रांत अशा दुःखी मनाला शांति प्राप्त झाली. तिला किती तरी धीर आला. हळु हळू प्रभाकरानें तिच्या हनुवटीला धरून तिचें मुख वर केलें आणि तिला पुनः विचारलें, " कृष्णा, तूं वेडी का ? तूं अशी रडतेस कां ? यशवंताविषयीं तूं आतां बिलकुल काळजी करूं नकोस म्हणून मी तुला काल सांगितलें ना ? "

"पण आम्हाला भाऊसाहेब असें कां छळतात ? आम्ही त्यांचं असं काय केलं आहे ?"

" तुम्ही कांहीं केलं नाहीं, म्हणूनच तर ते तुम्हांला छळतात. आणि हा तर असा जगाचा उलटा न्यायच आहे. "

" आज यशवंताला जेवण नाहीं, त्याची छाती दुखते त्याला औषध नाहीं, त्याला खाणीवर जाण्याला गाडी नाहीं, त्याला रात्रीं घरांत घेत नाहींत—"

" कृष्णा, तूं माझी एक गोष्ट ऐकतेस का ? " मध्येंच प्रभाकर म्हणाला.

हा त्याचा एकदम विचारलेला प्रश्न ऐकून कृष्णेनें क्षणभर त्याच्याकडे पाहिलें आणि उत्तर दिलें, " होय. तुम्ही सांगाल ती गोष्ट मी ऐकतें. "

" माझ्यावर तुझा विश्वास आहेना ? "

" होय—आहे. "

" मग तूं ह्या गोष्टी माझ्याकडे सोंपवून स्वस्थ ऐस. "

" पण— "

" पण काय ? तूं माझी ना ? "

हा प्रश्न ऐकतांच कृष्णेनें चटकन् प्रभाकराच्या मुखाकडे पाहिलें. दोघांची दृष्टि एक झाली !

# प्रकरण १७ वें.



## योजलेल्या चार गोष्टी.





कृष्णाला ‘ आपली ’ ह्मणून स्वतःवर आपण केवढी मोठी जबाबदारी घेतली, याची आतां प्रभाकराला खरी कल्पना होऊं लागली. तो नित्य नियमाप्रमाणें आपल्या बिछान्यावर पडला, परंतु मध्यरात्र उलटून गेली तरी त्याला झोंप येईना. त्याचे विचार एकसारखे चालू होते. ह्यापूर्वी यशवंत आणि कृष्णा ह्या दुर्दैवी बहिणभावंडांविषयीं त्याच्या मनांत विचार येत नव्हते, असें नाहीं. परंतु ते तेवढ्या वेळा पुरतेच असत. आज मात्र तसा प्रकार नव्हता. कृष्णेला ‘ आपली ’ ह्मणतांच त्याच्या मनांत एकप्रकारची नैसर्गिक कळकळ उत्पन्न झाली. आणि तीच कळकळ आतां त्याला झोंप येऊं देईना. यशवंत आणि कृष्णा यांना भाऊसाहेबांच्या कचाट्यांतून सोडविण्याकरितां आपण काय करावें, हा एक विचार इतका वेळ त्याच्या मनांत घोळत होता. शेवटीं त्याला एक मार्ग सुचला. परंतु तो अमलांत आणावा कसा, हाहि एक प्रश्नच होता.

कृष्णेबरोबर लग्न करून तिच्याबरोबर यशवंतालाहि आपल्या घरीं आणावें ह्मणजे त्यांच्या मागें भाऊसाहेबांचा लागलेला ससेमिरा टळेल, असें त्याला वाटूं लागलें. परंतु हें सर्व जुळवून आणणें, त्याच्या हातांत होतें काय? आपणास कृष्णाबरोबर विवाह कर्तव्य आहे, ही गोष्ट आपण राधाआकाच्या मार्फत आईच्या कानावर घालूं कारण तिला हा संबंध खात्रीनें आवडेल असें त्याला वाटलें परंतु भाऊसाहेबांकडून ह्या गोष्टीला संमति कशी मिळविणार ही मोठी अडचण होती. आणि ह्याच विचारांत उत्तररात्रीपर्यंत त्याला झोंप लागली नाहीं.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठल्यावर पुण्याहून आलेलें त्याला एक पत्र मिळालें. मधुकरानें तें त्याला खासगी लिहिलें असून त्यांत मोठ्या निकडीनें पैशांची मागणी केली होती.

' पत्र पावतांच जर मला दोनशें रुपये मिळाले नाहींत तर मी आपल्या जिवाचें बरें-वाईट करून घेईन ' अशीहि त्या पत्रांत धमकी दिलेली होती. प्रभाकरानें तें पत्र सावित्रीबाईला दाखविलें, तेव्हां ती ह्मणाली, " प्रभाकर, तुला खाजगी आलेलें पत्र तूं मला कां वाचून दाखवितोस ? मला त्या कार्ट्यानें पत्र लिहिलें असतें ह्मणजे मी त्याचा विचार केला असता. "

" पण तो पत्रांत असं चमत्कारिक लिहितो तेव्हां—"

" मग त्यांत काय मोठंसं आहे ? करील कांहीं जिवाचं बरं--वाईट तर सुंठीवांचून खोकला जाईल ! "

आईच्या उत्तरापुढें प्रभाकराचें बोलणेंच खुंटलें ! तो मुकाट्यानें दरवाजांत उभी असलेल्या राधाआकाकडे पहात राहिला. ती तरी कांहीं बोलेल असें त्याला वाटलें. परंतु ती कांहीं बोलली नाहीं. इतक्यांत मल्हारी पुढें येऊन म्हणाला, " झाडांचीं कलमं करावयाचीं होतीं आणि तो वाडींतील गणबा येतों म्हणून म्हणाला होता; पण दोन दिवस झाले तो आला नाहीं. मग मी आतां जाऊं कीं काय त्याला बोलवायला ? "

" अद्यापि कलमं कापून नाहीं का झालीं ? " सावित्रीबाईनें विचारलें, " मग तुह्मी आंबे उतरविणार केव्हां आणि त्याची आडी घालणार केव्हां ? तशाच पोफळीहि पाडायच्या असतील ? "

"होय. इतक्यांत हीं कामं होऊन जायचीं ! पण मला पुण्यांत जावें लागलें, त्यामुळें हा गोंधळ झाला." प्रभाकर म्हणाला. "बरं तर आज हीं कामं आटोपलींच पाहिजेत. मल्हारी, तुझं घरांतलं काम झालं, कीं जा आणि गणबाला घेऊन ये." असें म्हणून प्रभाकर स्नानाला जाण्याकरितां निघाला, तों केशवशास्त्री आंत आले.

" प्रभाकर, हें घे औषध."

" प्रभाकराला औषध ?-कांरे ? काय होतंय् तुला प्रभाकर ? मला नाहीं कांहीं बोललास तो ? " आश्चर्यानें परंतु भीतियुक्त स्वरानें सावित्रीबाईनें विचारलें.

" माझ्याकरितां नाहीं तें औषध ! तें औषध देशमुखांच्या यशवंताकरितां ! " इतकें बोलून प्रभाकर क्षणभर आपल्या सापत्न मातेकडे पहात राहिला. तिनें विचारलेल्या प्रश्नांत तिचें पुत्रवात्सल्य दिसून आलें. नंतर शास्त्रीबुवा आणि तो बाहेरच्या ओटीवर

गेले. तेथें बैठकीवर बसल्यानंतर प्रभाकरानें आधल्या दिवशीं संध्याकाळीं घडलेला सर्व प्रकार शास्त्रीबुवांस सांगितला. ती सर्व हकीकत ऐकून शास्त्रीबुवा हांसत म्हणाले, "एकंदरीनें शेवटीं तूं भाऊसाहेबांना चाबकाचा एक तडाखा दिलास म्हणायचा ! पण लक्षांत ठेव, कीं तो नरपशु आतां तुला त्रास देईल."

" हें भविष्य मी त्याचवेळीं केलं आहे."

असो. पुढें थोड्या वेळानें औषध कसें ध्यावयाचें त्याचें अनुपान सांगून शास्त्रीबुवा उठून गेले. तेंव्हां प्रभाकरानें मल्हारीला हांक मारून गाडीची चौकशी केली, तेंव्हां मल्हारी म्हणाला, "आज धांवा टाकून तो गाडी आणणार आहे."

" आज म्हणजे केव्हां ? मला आतां नऊ वाजतां गाडी जोडायची आहे. तूं आतां धांवत जाऊन चौकशी करून ये. मी जातों आणि गणबाला बोलावितों. जा—" आजपासून त्यानें यशवंताकरितां गाडीचा उपयोग करण्याचें ठरविलें होतें, हें वाचकांना माहिती आहेच ! मल्हारीला गाडीखान्यांत पाठविल्यावर त्यानें स्वतः कपडे चढविले आणि गणबाला बोलाविण्याकरितां तो निघाला. गणबा हा देशमुख-वाडीच्या मागें परसांत रहात असे. पोफळीच्या झाडांवर चढण्यांत त्याचप्रमाणें झाडांचीं कलमें करण्यांत तो फार पटाईत होता. परंतु दारूच्या व्यसनामुळें त्याचे गुण मातीमोल झाले होते. तो सतरा धंदे करून आपला चरितार्थ चालवीत असे. त्याला गजरा नांवाची तेरा चौदा वर्षांची एक मुलगी होती. तिचें आणि मल्हारीचें सूत जमलें आहे, अशी लोकांत बोलवा होती. प्रभाकरानें बाहेर पडतांना बरोबर यशवंताचें औषध घेतलें होतें. तेंहि यशवंतास द्यावें आणि आपण आजपासून गाडीची केलेली व्यवस्था त्यांस सांगावी, असा त्याचा विचार होता. तो वाडीजवळ आला, त्यावेळीं परसाच्या बाजूला असलेल्या फुलांच्या ताटव्यांत वत्सला फुलें तोडीत असलेली त्याच्या दृष्टीस पडली. तिची नुकतीच वेणीफणी होऊन ती फुलांकरितां ताटव्यांत आली होती. तिला टाळण्या-करितां प्रभाकर ताटव्याच्या आड झाला आणि कडेकडेनें चालूं लागला. परंतु पलीकडून कोणी गेलें असें वाटून वत्सला उंच पाय करून पाहूं लागली. प्रभाकर दृष्टीस पडतांच तिनें हातांतील तोडलेल्या फुलांपैकीं दोनचार मोठीं गुलाबाचीं फुलें निवडून घेतलीं आणि बाकीचीं तेथेंच जमिनीवर टाकून ताटव्याच्या दरवाजाकडे धांव ठोकली. तिच्या अंगीं हुडपणा किती होता, तो वाचक जाणतच आहेत. ती येत आहे, असें पाहून

प्रभाकर मुद्दामच तिच्याकडे दुर्लक्ष करून गणबाच्या घरांत शिरला. तोंच वत्सला त्याच्यामागें येऊन उभी राहिली.

" आज सकाळींच कुणीकडे इकडे निघाली आपली स्वारी ? " हातांतील फुलें देण्याच्या उद्देशानें पुढें करीत वत्सला ह्मणाली. परंतु प्रभाकरानें तीं न घेतां उत्तर दिलें, " आलों होतों गणबाला बोलाविण्याकरितां. आज पोफळी आणि आंबे उतरावयाचे आहेत. "

" मग आंबरसाकरितां आह्माला बोलाविणार कीं नाहीं ? "

" बोलवायचं काय त्यांत ! घरच तुमचं आहे ! "

" पण हें खरं का ? " तिरक्या दृष्टीनें त्याच्याकडे पहात वत्सला ह्मणाली.

" मग मी खोटं सांगतों वाटतं ! "

" तसं नव्हे ! पण ह्मटलं, तुह्मी किनई मजकडे अगदींच दुर्लक्ष करतां. मी आपली वेडी ह्मणून पुनः पुनः तेंच तेंच विचारतें. "

ती कोठल्या अर्थानें बोलत आहे, हें लक्षांत येऊनहि आपणास कांहीं कळलें नाहीं असें दाखवीत प्रभाकर ह्मणाला, " पण पुनः पुनः विचारण्याचं कारण काय ? तुह्मीं घरीं या ह्मणजे तुह्माला आंबरस इतका पाजतों, कीं मग पुनः कधीं तुह्मी त्याचं नांव नाहीं काढणार ! "

" पण मी कांहीं आंबरसाचं नाहीं बोलत ! "

" मग ? आंबरस नको तुह्मांला !—मी समजलों तुह्माला आंबरस पाहिजे. " असें हांसत हांसत ह्मणून आंतल्या दरवाजाजवळ उभी असलेल्या गजरेला तो ह्मणाला, " कायग गजरा, गणबा कुठें आहे ? येईल का इतक्यांत ? "

" मी काय सांगूं केव्हां बाबा येईल तो ! आतांच तर तो बाहेर गेला आहे !" गजरा ह्मणाली.

" वत्सलाबाई, माझं एक काम करतां ?" पुनः तिच्याकडे वळून प्रभाकरानें विचारलें.

" हें पहा, खरं तेंच बाहेर आलं ! तुह्मी ह्मणतां परकेपणा नाहीं, मग ' काम करतां का ? ' ह्मणून काय विचारतां ? इश्श !–मला नाहीं असलं आवडत ! " मानेला हिसका देऊन वत्सला ह्मणाली, " आपलं ह्मणायचं आणि परकेपणा दाखवायचा ! "

" वत्सलाबाई, यांत काय दाखविला परकेपणा ! उलट असं विचारणं ही सभ्यतेची रीत आहे. तुह्माला जर राग आला असेल तर मी माझे शब्द परत घेतों. "

" अहाहा ! तेवढी संपादणी केली ह्मणजे झालं ! " मान वाकवीत गालांतल्या गालांत हांसत वत्सला ह्मणाली, " बरं मग आतां सांगा मी काय काम करूं तें ? पण गडे, हीं फुलं घ्या-किती सुंदर आहेत ! हीं येथें अशीं लावा-" असें ह्मणून ती पुढें झाली आणि प्रभाकराच्या कोटाला तीं लावूं लागली. प्रभाकराला हें तिचें करणें पसंत पडलें नाहीं. परंतु त्याला एकदम तिला झिडकारून टाकतां येईना.

" द्या माझ्या हातांत द्या, मी लावतों ! तुह्मीं माझं काम करतां ना ?"

" मग सांगा ना ? मी केव्हां नाहीं ह्मटलं ? "

" यशवंताला बोलावून घेऊन या. "

" कशाला ?-तो आला ह्मणजे गडे आपल्याला असं मोकळं बोलायला नाहीं मिळायचं ! "

" कां ?-त्याची काय चोरी आहे ?-आणि आपल्याला अशी काय गुप्त खलबतं करायचीं आहेत ! "

" इश्श ! खलबतं कसलीं करायचीं ! कांहीं तरी आपलं बोलणं झालं ! " असें कुऱ्यांत बोलून वत्सला जाण्याकरितां निघाली. त्यावेळच्या तिच्या चालण्यांतहि एकप्रकारचा नटवेपणा होता ! प्रभाकर तिच्याकडे क्षणभर पहात राहिला. त्याच्या मनांतून वत्सला साफ उतरली होती. तिचा हावभाव, बोलणें, चालणें इत्यादि सर्व प्रकार कशाचें द्योतक आहे हें तो समजून चुकला होता. परंतु बऱ्याच कारणांमुळें त्याला तिला एकदम तोडून टाकतां येत नव्हतें. त्यावेळीं वत्सलेच्या बाबतींत प्रभाकराची अशी चमत्कारिक स्थिति झाली होती कीं, ' जवळ केल्यास चावेल आणि टाकल्यास शापेल ! '

थोड्या वेळानें वत्सला परत आली आणि ह्मणाली, " अझून यशवंत उठला नाहीं. मी त्याला किती तरी हांका मारिल्या पण तो दरवाजाच उघडीना ! पण एवढं काय त्याच्याजवळ काम होतं ? मला तरी सांगा ! "

" कांहीं सांगण्यासारखं नाहीं विशेष ! " असें ह्मणून प्रभाकर पुनः गजरेला ह्मणाला, " कायग, अद्यापि तुझा बाप येत नाहीं तो ? हें पहा, तो आल्याबरोबर त्याला मजकडे पाठवून दे. " इतकें तो ह्मणत आहे तों मागल्या बाजूनें गणबाची स्वारी झुकत

झुकत पुढें आली. त्याच्या चालण्याच्या गतीवरून तो दारू पिऊन आला आहे, हें प्रभाकरानें जाणलें.

" काय प्रभाकरराव, आज हिकडं कुणीकडं ? "

" अरे गणबा, हें काय ? अरे सकाळच्याच प्रहरीं तूं हा काय उद्योग आरंभिला आहेस ? "

" हा अशी दारू पितो, ह्मणूनच भाऊसाहेब याच्यावर चिडतात. " वत्सला मध्येंच ह्मणाली.

" भाऊसाहेबांना विचारतो कोण ? ते तर नाहींना मला पैसे देत. मी माझी गांठ खर्चून दारू घेतली तर ह्यांचे का चव्वल खर्च होतात ? "

" अरे गणबा, जाऊं दे. असं काय भलतंच बोलतोस ! किती झालं तरी ते देशमुख आहेत. पण तें जाऊं दे—तूं आतां येतोस ना ? आज आंबे आणि पोफळी तोडायच्या आहेत. "

" आज नका ! आज नका ! प्रभाकरराव, उद्यां मी जरूर येईन. "

प्रभाकरानेंहि त्याला जास्त आग्रह केला नाहीं. तो आज दारू प्यालेला आहे. तेव्हां उगाच झाडावरून पडला तर ' फट ह्मणतां हत्त्या व्हावयाची ! ' असा विचार करून तो जावयास निघाला. वत्सला बाजूला उभीच होती परंतु गणबाच्या बोलण्याचा तिला राग येऊन तिच्या कपाळाला आठ्या पडल्या होत्या. तिच्याकडे पहात तो ह्मणाला, " वत्सलाबाई, तुह्मी त्याचं काय मनावर घेतां ? त्याचं डोंक आज ठिकाणावर थोडंच आहे ? जाऊं द्या. मग काय उद्यां याल ना तुह्मी आंबरसाकरितां ? बरं तर जातों—" असें ह्मणून तो निघालाच !

त्या दिवशीं प्रभाकरानें योजल्यापैकीं एकहि गोष्ट सरळपणें घडून आली नाहीं. पहिली गोष्ट गाडीखान्यांतून धांवा टाकून गाडी आली नाहीं, दुसरी गोष्ट, गणबा आला नाहीं, तिसरी गोष्ट, यशवंत सकाळीं न भेटल्यामुळें त्याला औषध देतां आलें नाहीं. चौथी गोष्ट, यशवंत खाणीवर जातांना भेटावा ह्मणून रस्त्याच्या नाक्यावर प्रभाकर जाऊन पुष्कळ वेळ त्याची वाट पहात उभा राहिला परंतु त्याची त्यावेळींहि भेट झाली नाहीं. शिवाय पुण्याहून त्याला मधुकराचें पत्र आलें होतें. अशा सर्वच गोष्टी निरुत्साही घडल्यामुळें दुपारपर्यंत त्याचा सर्व वेळ विचारांत गेला. शेवटीं त्यानें खाणीवर जाऊन यश-

वंताला भेटण्याचा विचार केला. तावडतोब त्यानें मल्हारीला हांक मारून घोड्यावर जीन घालण्यास सांगितलें. आज त्याचें सर्व लक्ष यशवंताकडे वेधलें होतें.

प्रभाकर खाणीजवळ आला त्यावेळीं संध्याकाळीं चार वाजण्याचा सुमार झाला होता. त्यानें एकवेळ खाणीला लांबून फेरा दिला. कारण त्यावेळीं बहुतकरून भाऊसाहेब खाणीवर असण्याचा संभव होताः आणि त्यांच्या आपण दृष्टीस पडावें अशी प्रभाकराची इच्छा नव्हती. ह्मणून त्यानें खाणीच्या रखवालदाराजवळ चौकशी केली. त्याच्याकडून ‘ गेटावर यशवंताशिवाय कोणी नाहीं ’ असें कळतांच प्रभाकरानें गेटाकडे आपला घोडा वळविला. गेट आणि खाण यांत पाव मैलाचें अंतर होतें. या ठिकाणीं एक लहानशी इमारत बांधली होती. येथें खाणीवर काम करणाऱ्या मजुरांची रोज सकाळ संध्याकाळ हजिरी होत असे. ह्या कामावर हरिभाऊ नांवाचा एक गरीब ब्राह्मण होता. त्याला सर्व मजूर हाजिरीमास्तर ह्मणत असत. बाबुराव आणि यशवंत यांचें काम ह्मटलें ह्मणजे व्यापाऱ्यांकडून मालाची मागणी आली ह्मणजे तिची नोंद करणें, दगडांची लांबी रुंदी आंखून देणें, लाद्या मोजणें, मालाची पावती करणें इत्यादि. आणि भाऊसाहेब स्वतः ह्या सर्व कामावर देखरेख ठेवीत असत. असो.

प्रभाकरानें गेटाच्या दरवाजाजवळ आपला घोडा उभा केला आणि आंत डोकावून पाहिलें तों मेजावर आडवें डोकें टेंकून बसलेला यशवंत त्याच्या दृष्टीस पडला. एखादा आजारी, अशक्त आणि निरुत्साही मनुष्य एखाद्या अडचणीच्या जागेंतहि ज्याप्रमाणें झोंपीं जातो, तद्वत यशवंत मेजावर आपले दोन्ही हात ठेऊन त्यावर आपलें डोकें टेंकून त्यावेळीं झोंपीं गेला होता.



# प्रकरण १८ वें.



## बाबुरावाची अरेरावी.





आपला घोडा बाहेर बांधून प्रभाकर हळूंच आंत आला आणि यशवंताच्या खांद्यावर हात ठेऊन त्यानें हळूंच हांक मारिली. त्याबरोबर एकदम धडपडून यशवंत जागा झाला.

" कोण प्रभाकर ! अरे बापरे, मी किती तरी भ्यालों ! " डोळे चोळीत यशवंत ह्मणाला. " मला वाटलं, कीं भाऊसाहेब आले. आणि ते जर इतक्यांत आले असते आणि मी असा दरवाजे उघडे टाकून, हीं कामाचीं पुस्तकं अशी अस्ताव्यस्त टाकून झोंपलेला त्यांच्या दृष्टीस पडतों तर त्यांनीं काय आकांत केला असता तो परमेश्वराला ठाऊक !—प्रभाकर, आज मी इतका कंटाळलों आहें कीं, मला आतां माझ्या आयुष्याचाहि कंटाळा आला आहे, आज माझ्या अंगांत बिलकूल त्राण उरला नाहीं. असं वाटतं येथेंच पडून रहावं ! "

" पण आज तूं येथें एकटाच कसा ? बंडुनाना, हरिभाऊ हे गेले कुठें ? भाऊसाहेब आले नाहींत वाटतं ? "

"भाऊसाहेब अद्यापि आले नाहींत. बंडोबा दुपारपासून गेले आहेत कुठें झुकांडी देऊन तें परमेश्वराला ठाऊक ! हरिभाऊच्या घरांत तांदुळ नाहींत ह्मणून तो बाजाराला गेला आहे. संध्याकाळची हजिरी त्यानें माझ्याच माथीं मारली आहे. "

" बरं पण यशवंत, आतां तुला कसं वाटतं तें सांग ! "

" काय सांगूं तुला प्रभाकर ! आज मी इतका गळलों आहे कीं, आतां जर मला मरण येईल तर माझी तयारी आहे. "

" छी, छी, असं नको बोलूं यशवंत ! अरे, तुझं मरण अद्यापि फार दूर आहे, " असें ह्मणून प्रभाकरानें खिशांतून औषध काढलें. आणि तें कसें घ्यावयाचें त्याविषयी

सविस्तर सूचना देऊन आपण गाडीविषयीं कशी व्यवस्था केली आहे, तें सांगितलें. [illegible]ताला गहिंवर येऊन त्याच्या डोळ्यांत कृतज्ञतेचे अश्रु आले. त्यानें प्रभा[illegible] खांद्याव[illegible]न ठेऊन कांहीं वेळ मनसोक्त अश्रु गाळले. त्याचा कंठ भरून आला होता. आणि [illegible]ळेंच त्याचा शब्दोच्चार होत नाहीं हें जाणून प्रभाकरानें तो विषयच बदलण्याच्या उद्दे[illegible] [illegible]ावल्या दिवशीं भाऊसाहेबाबरोबर घडलेली हकीकत सांगण्यास सुरवात केली. आणि शेवटीं तो ह्मणाला, " आतां यशंवत, मी हा माझा घोडा येथेंच बांधून ठेवतों. तूं येतांना पायीं न येतां त्यावरून ये. मी जातों आतां हळुहळू आणि उद्यांपासून मी गाडीची व्यवस्था करीन. मग जाऊं मी आतां ?"

" प्रभाकर, तुझे हें उपकार मी कसेरे फेडूं ? " असें ह्मणून त्या निस्तेज व अशक्त झालेल्या यशवंतानें प्रभाकराच्या गळ्याला मिठी मारिली !

प्रभाकराला जाऊन अर्धा तास झाला होता. यशवंत एकटाच स्वतःशीं विचार करीत होता. इतक्यांत बंडूनानाची स्वारी हळूंच मागच्या बाजूनें आंत आली. आणि चोरासारखें इकडे तिकडे पहात त्यानें विचारलें. " येशा, भाऊसाहेब आले होते कारे !"

" नाहीं—का ? "

" आले नाहींत ना ? मग कांहीं हरकत नाहीं. हें पहा, आतां मी सांगतों असं कर. आतां जर भाऊसाहेब आले आणि माझी चौकशी करूं लागले, तर त्यांना सांग कीं, मी सर्व काम आटोपून नुकताच गेलों—"

" पण येथलं काम कुठं आटोपलं आहे? ह्या नवीन मागणीप्रमाणें सहाशें लाद्या आतां मोजून गाड्या रवाना व्हावयाच्या आहेत, हजिरी आहे–"

" मग मला काय सांगतोस ? तुला आतां काय आहे काम ?" असें तुच्छतेनें म्हणून बाबूराव बाहेर आला, तों प्रभाकरानें बांधलेला घोडा त्याच्या दृष्टीस पडला. त्याबरोबर तो म्हणाला, " येशा, हा घोडा कोणाचा ? प्रभाकराचा वाटतं ? "

" होय. तो त्यानें मला घरीं जाण्याकरितां येथें मुद्दाम बांधून ठेविला आहे. "

" आणि प्रभाकर कुठें आहे ? "

" तो पायींच घरीं गेला. "

" असं काय ? मग फारच चांगलं ! मलाहि आज फुलशहरांत जावयाचं होतं–"

असें म्हणून बाबुरावानें झाडाला बांधलेल्या घोड्याचा लगाम सोडला. आणि तो पुढें म्हणाला. "येशा, हा घोडा मोठा डौलदार आहे नाहींरे?" असें म्हणून त्यानें रिकाबींत पाय ठेऊन घोड्यावर उडी मारिली.

"पण बंडू, तूं हें काय करतोस?"

घोड्याला टांच मारून बंडूनाना म्हणाला, "काय करतोस म्हणजे? मला शहरांत जावयाचं आहे—"

"जायचं तर जा. पण प्रथम घोड्यावरून खालीं उत्तर." मोठ्यानें ओरडून यशवंत म्हणाला, "पहा–ऐक—"

पण बंडोबा थोडेंच ऐकणार? त्यानें घोडा दामटला! बिचाऱ्या यशवंताचे शब्द घोड्याच्या टापांच्या आवाजाबरोबर हवेंत जाऊन मिळाले. यशवंत तेथेंच दरवाजांत रागानें लाल होऊन उभा होता. त्याचें डोकें इतकें भडकलें कीं, शेवटीं त्याचे हातपाय थरथर कांपूं लागले!

× × × × × ×

रात्रीं नवाचा सुमार झाला होता. बाहेरच्या ओटीवर राधाआका आणि प्रभाकर गोष्टी बोलत बसलीं होतीं. त्यावेळीं कृष्णा आणि यशवंत यांच्या विषयीं त्याच्या मनांत जे विचार घोळत होते, ते तो राधाआकाला सांगत होता. सावित्रीबाईची प्रकृति आज जरा अस्वस्थ असल्यामुळें ती आपल्या खोलींत निजली होती. कमलाहि नुकताच आपला अभ्यास आटोपून झोंपण्याच्या तयारींत होती.

"तूं ह्मणतोस तें सर्व मला पसंत आहे," राधाआका ह्मणाली, "तसं जर जुळून येईल तर फार चांगलं होईल. कृष्णा ही पोर फारच सालस आणि सद्गुणी आहे. नाकीं डोळींहि सुरेख आहे. पण हें तूं ह्मणतोस तसें जुळावं कसं? तुझ्या आईला ही गोष्ट पसंत पडेल अशी माझी खात्री आहे. पण भाऊसाहेब कबूल होतील तेव्हां ना? सर्व अडचण आहे ती तेथें आहे!"

इतक्यांत मल्हारी बाहेर आला आणि ह्मणाला, "दादा, अद्यापि घोडा ठाणावर आला नाहीं."

" काय ? अद्यापि घोडा आला नाहीं !—म्हणजे ? " प्रभाकर आश्चर्यानें म्हणाला, " यशवंताला इतका वेळ कां लागावा ?--पहा बरं-मल्हारी, तूं जाऊन जरा शोध करून ये. कदाचित् वाटेंत कांहीं अपघात तर नाहीं झाला त्याला ! "

मल्हारी हातांत फाणस घेऊन देशमुखवाडींत जाण्यास निघाला. त्यालाहि आपल्या तरुण धन्याप्रमाणेंच यशवंताला कांहीं तरी अपघात झाला असावा असें वाटूं लागलें. आणि खरोखरीच अपघात झाला असेल तर यशवंत रस्त्याच्या बाजूला कुठें तरी पडला असून घोडा उधळला असावा, हा विचार त्याच्या मनांत घोळूं लागला. थोड्यावेळानें तो देशमुखवाडीच्या मोठ्या फाटकाजवळ आला. इतक्यांत मागून घोड्याच्या टापा त्याला ऐकूं येऊं लागल्या. तेव्हां तो तेथेंच उभा राहिला. थोडया वेळानें घोडा भरधांव फेंकीत बंडोबाची स्वारी फाटकाजवळ आली.

" कोणरे मल्हारी ! तूं आहेस काय ? " घोड्यावरून खालीं उडी टाकून बाबुराव म्हणाला, " बरं झालं तूं आलास तो ! हा घेऊन जा तुमचा घोडा. माझं काम झालं ! " असें म्हणून त्यानें मल्हारीच्या अंगावर लगाम टाकिली.

" तुम्ही घोडयावरून आलांत ? मग यशवंतराव कुठें आहेत ? "

" मला काय माहित ? तो आला असेल रखडत पायीं ! " असें म्हणून बाबुराव फाटकांतून आंत शिरला. मल्हारीनें घोड्याच्या पाटीवर थोपटलें. तो अगदीं घामानें थबथबला होता. ' बराच लांब दामटलेला दिसतो ! ' असें म्हणून मल्हारीनें घोडा हळुहळु चालविला. थोड्या वेळानें तो आपल्या आंबराईंत आला. अद्यापि प्रभाकर आणि राधाआका ओटीवरच गोष्टी बोलत होतीं. मल्हारीनें घोडा आंत आणतांच प्रभाकरानें विचारलें, " कायरे, कां इतका वेळ झाला ? वाटेंत कांहीं अपघात झाला कीं काय ? "

" नाहीं. पण यशवंतराव कांहीं घोड्यावरून आले नाहींत. मी गेलों तों दरवाजांतच बाबुराव घोड्यावरून येतांना मला भेटले."

" म्हणजे ! बाबुराव कसा माझ्या घोड्यावरून येईल ! मी यशवंतरावाकरितां खाणीवर घोडा ठेवून आलों. "

" तें नाहीं मला माहिती. पण घोडयाला फार चाल पडलेली दिसते."

प्रभाकर ओटीवरून खालीं उतरला. आणि घोड्याजवळ गेला. घोड्याच्या तोंडा[illegible] फेंस येत होता. आणि तो फुर्र फुर्र असा आवाज करीत होता, शिवाय त्या[illegible] मानेवर आणि मागें काठीचे फटके मारलेले वळ अद्यापि दिसत होते. हा सर्व प्रकार पाहून प्रभाकराला राग आला. ' ह्या बंड्यानें घोडयाचं अगदीं पीठ पाडलेलें दिसतं. पण यानें काय ह्मणून माझा घोडा नेला ? मी त्याच्याकरितां कांहीं खाणीवर घोडा ठेवला नव्हता ! आतां गय करून उपयोगी नाहीं. आज दोन तीन वर्षे तो माझ्या वाटेस गेला नाहीं. पण आतां तो पुनः शेफारला आहे. आतां चांगले कानच उपटले पाहिजेत ! जा मल्हारी, घोडा बांधून तूं परत ये. आणि फाणस घेऊन चल मजबरोबर देशमुखवाडींत. आतां ताजं आहे तेव्हांच एकदां ऊरकून टाकूं. मग तेथून आल्यावर तूं घोड्याची चाकरी कर."

मल्हारी घोडा बांधून येईपर्यंत प्रभाकरानें कोट टोपी घातली आणि दोघेहि निघाले. मल्हारीच्या हातांत फाणस होता, त्याचा उजेड दूरवर पडला होता. ते दोघेजण आंब-राईतून बाहेर पडावयाला आणि समोरून एक मनुष्य यावयास एकच गांठ पडली. तो मनुष्य पाठीवरून कांहीं ओझें घेऊन येत असावा असें त्यांच्या वांकलेल्या स्थितीवरून दिसत होते. तो कोण आहे, हें पाहण्याकरितां मल्हारीनें दिवा वर केला, तोंच ' प्रभाकर' असा आर्त स्वर त्याच्या कानीं आला. यशवंताचा आवाज ऐकतांच प्रभाकराच्या छातींत एकदम धस्स झालें ! तो झटकन् पुढें झाला.

" प्रभाकर, मला थोडं पाणी देरे ! मी मरतों आतां! " तो मनुष्य खालीं बसला, आणि त्यानें एखाद्या लहान मुलाप्रमाणें पाठीवर घेतलेल्या यशवंताला प्रभाकाराच्या सहा-य्यानें खालीं बसविलें. प्रभाकर त्याच्या बाजूला बसला आणि त्यानें यशवंताची मान आपल्या छातीवर टेकून धरली, इतक्यांत मल्हारीनें धांवत जाऊन पाण्याचा लोटा भरून आणला. त्यांतील थोडेसें पाणी पाजल्यावर यशवंताला पुष्कळ हुशारी आली.

" प्रभाकर, त्या चांडाळ बंड्यानें तूं माझ्याकरितां बांधून ठेवलेला घोडा सोडून नेला ! काय करूं रे ! असं वाटतं-" दांत ओंठ चावून हाताच्या मुठी वळून तो बोलूं लागतांच त्याचा क्रोध इतका अनावर झाला कीं, त्याचें सर्व शरीर कापूं लागलें.

" ऐक यशवंत, तूं असा संतापूं नकोस. त्यानें तुझें डोकें मात्र चढेल. मी आतां त्या बेंड्याचा पक्का बंदोबस्त करतों. तूं नको त्याची काळजी करूं. "

" नको काळजी करूं तर काय करूं ? ह्या चांडाळांनीं मला—" एकदम हुंदका येऊन यशवंत रडूं लागला. संतापाचा अतिरेक झाल्यावर हा असा प्रकार व्हावयाचाच, असें जाणून प्रभाकर कांहीं बोलला नाहीं. त्यानें फक्त यशवंताच्या डोक्यावरून हात फिरविला आणि त्याला उचलून आणणाऱ्या मनुष्याकडे वळून विचारलें.

" कायरे काळ्या, इतकी रात्र झाली रे तुह्माला यावयाला ? "

" आजच्या दिसामंदीं यसवंतराव हिकडं आले, ह्योच थोर नशीब समजा. न्हायी तर आजचा वखुत--मोठा कठीण वखुत-मोठा कठीण होता बघा ! आमची हजिरी झाली, मग घराला जावून म्यां भाकर खाल्ली आणि बघा सहज गमतीखातर त्या राजबाकडं जाया निघालों. तवां तो वाटेमंदी ओडा हाय नव्ह का ? त्याच्या पल्याल बाजूला हे यशवंतराव वेसुध होऊन पडलेले ! काय मला इस्त्ररानं बुद्दि दिली म्हणून मी त्याच वाटेनं जाया निघालों. नाहीं तर वखुत किती वंगाळ होता, करा विचार तुम्हीच प्रभाकरराव ? "

काळ्यानें सांगितलेली गोष्ट अक्षरशः खरी होती. केवळ ईश्वरी प्रेरणेनेंच तो त्यावेळीं त्याच रस्त्यानें जाऊं लागला. नाहीं तर मोठा कठीण प्रसंग होता. बाबुरावानें घोडा नेल्यावर त्याच्या आंगाचा अगदीं भडका झाला, ही हकीकत वाचकांना माहितच आहे. परंतु संतप्त होऊन तो असहाय पोर करणार काय ? बराच वेळ त्यानें दांत ओंठ चावले. व शेवटीं आपल्या दुर्दैवी नशिबाला दोष देत कांहीं वेळ रडून काढला. अशा मनाच्या उद्वेगजनक स्थितींत तो आपल्या मेजावर बसला असतां गिऱ्हाईकाला पाठविण्याच्या लाद्यानें भरलेल्या गाड्या आल्या. त्या मोजून घेईपर्यंत सात वाजून गेले. नंतर मजुरांची हजिरी झाली. इतकें काम झाल्यावर त्याचें काम आटोपलें. आज त्याची फारच शोचनीय अवस्था झाली होती. आधल्या दिवशीं जेवण नव्हतें, उघड्यावर झोंपावें लागलें इत्यादि प्रकारामुळें त्याचें सर्वांग मोडून येऊन त्याला गळल्यासारखें वाटलें होतें. त्यांत आज हा असा प्रकार ! खरोखरीच त्यानें प्रभाकराजवळ सांगितल्या प्रमाणें एक पाऊल टाकण्याचीहि आज त्याच्या पायांत शक्ति नव्हती. अशा स्थितींत पांच मैल चालून जाऊन नवाच्या आंत घरीं जावयाचें म्हणजे त्याला मोठें संकटच

पडलें होतें. आणि त्यांत ग्रहदशेनें पाठ पुरविलेली ! मुद्दाम प्रभाकरानें त्याच्याकरितां घोडा ठेवला परंतु दैवाला कुठें तें रुचलें ? बाबुराव मध्येंच शनी म्हणून उभा राहिला !

हजिरी वगैरे झाल्यावर यशवंत घरीं येण्याकरितां निघाला. शेंदोनशें पावलें चालून तो ओढ्याजवळ येतांच त्याच्या पायांना पेंग येऊं लागले. त्याला पुढें पाऊल टाकवेना. तेव्हां ओढ्यावर थोडें पाणी पिऊन थोडा वेळ विश्रांति घ्यावी आणि मग मार्गाला लागावें. असा विचार करून तो हळुहळूं ओढ्याच्या पायवाटेकडे वळला. ती जागा उतरणीची असल्यामुळें त्याला आपली गलित काया सांवरतां आली नाहीं. तो तेथेंच पडला. आणि शुद्धिरहित झाला !

अर्ध्या तासानंतर खाणीवर काम करणारा काळ्या नांवाचा मजूर त्याच वाटेनें ओढा ओलांडून पलीकडे जात होता. तेव्हां तेथें कोणी तरी मनुष्य पडलेसा आहे असा त्याला संशय आला, ह्मणून तो पुढें झाला. आणि पाहतो तों तो यशवंत ! त्यानें ओढ्याचें पाणी आणून त्याला सावध केलें. यशवंत हा देशमुखवाडीचा खरा मालक आहे. ही गोष्ट खाणींतील प्रत्येक मजुराला माहित होती आणि ते त्याप्रमाणें त्याला मानहि देत होते. परंतु भाऊसाहेबांच्या करड्या धाकामुळें ती बिचारी पोटार्थी मंडळी गप्प होती. असो. यशवंत सावध झाल्यावर त्याला आपल्या घरीं नेऊं लागला. परंतु यशवंत ह्मणाला, " काळ्या, तूं मला घरीं नेऊन काय करणार ? उगाच भाऊसाहेबांना कळलं तर ते तुला उगाच त्रास देतील. मला कसंहि कर आणि नवाच्या आंत घरीं घेऊन जा. पण काळ्या मला चालवत नाहीं रे ! मला तूं उचलून नेशील कारे ! "

" हें काय बोलतां यशवंतराव ? तुह्मी तर आमचे मायबाप ! ह्या काळ्याचा पिंड दादासाहेबांच्या अन्नाचा ना ! मग असं कसं ह्मणतां धनी ?" असें ह्मणून त्यानें यशवंताला आपल्या पाटुंगळीस घेतलें. पुढली हकीकत वाचकांनीं नुकतीच वाचली आहे.

# प्रकरण १९ वें.

## खटका उडाला.



जशीजशी रात्र होऊं लागली, तशीतशी सगुणाबाईची छाती धाड् धाड् उडूं लागली. सर्वांचीं जेवणें झालीं. भाऊसाहेब जेऊन दिवाणखान्यांत पानसुपारी खात होते. त्यांचें लक्ष घड्याळाकडे होतें. अद्यापि यशवंत आला नाहीं हें त्यांना माहिती होतें. ते स्पष्टपणें नऊ वाजण्याची वाट पहात होते. वत्सला एका कोपऱ्यांत बसून कादंबरीचें पुस्तक वाचीत होती. जवळच कृष्णा बसली होती. तिला इंदुबाळ त्रास देत होती. मध्येंच ती मागून येऊन तिलाढकलून देई तर मध्येंच तिचे केस नाहीं तर पदर ओढी; अशा तिच्या बाल लीला चालल्या होत्या परंतु कृष्णाचें सर्व लक्ष दरवाजाकडेच होतें. तिचीहि स्थिति आपल्या आतिप्रमाणेंच झाली होती. यशवंताला आज खाणीवरून येण्यास इतका वेळ कां लागला याचें त्या दोघांना मोठें गूढ पडलें होतें. आतां इतक्यांत जर तो आला नाहीं तर भाऊसाहेब दरवाजा बंद करतील आणि मग परवां सारखे त्याला सर्व रात्र जेवणाशिवाय बाहेर रहावें लागेल ह्या विचारांनीं त्या दोघांचीं मनें अगदीं हताश करून सोडली होती.

नऊ वाजले. तेव्हां भाऊसाहेबांनीं 'राघू' ह्मणून नोकराला हांक मारिली आणि दरवाजा बंद करण्यास सांगितला 'अद्यापि यशवंत आणि बंडू आला नाहीं. करितां थोडा वेळ दरवाजा उघडाच ठेवा,' असें आपल्या पतीला सांगावें, ह्मणून सगुणाबाईनें कितीदां तरी प्रयत्न केला. परंतु तिला पुढें जाण्याचा धीरच होईना. ती दोनचारदा खोलींतून दिवाणखान्यांत आली. प्रत्येक वेळीं तिने पतीला बोलण्याचा निश्चय करावा. परंतु बाहेर येतांच तिचें धैर्य गळत असे. आपल्या भावाकरितां आत्या कांहीं तरी रदबदली करील ह्मणून सगुणाबाई बाहेर आली ह्मणजे कृष्णा तिच्याकडे केविलवाण्या मुद्रेनें पाही. परंतु—!

राघू दरवाजा बंद करणार इतक्यांत त्याला धक्का देऊन बंडुनानानें दरवाजा खाडकन् उघडला. त्याला पाहतांच भाऊसाहेब ह्मणाले, " कायरे, तुला कां इतका वेळ झाला ? काय करीत होतास इतका वेळ ? "

" काय ह्मणजे !—खाणीवरील काम आटोपल्यावर गेलों पैशाची वसुली करण्याकरितां शहरांत ! पण एकानें देखील पैसे दिले नाहींत. उद्यां पुनः गेलं पाहिजे ! "

" पैशाच्या वसुलीकरितां जावयाचं होतं मग सकाळींच कां नाहीं गेलास ? "

" सकाळीं जाऊन खाणीवरचं काम कोणी करायचं ? "

" कां ? यशवंत होताना तेथें ? "

" होय. होता पण त्याची झोंप पुरी होईल तेव्हांना तो काम करणार ? "

" असं काय ? ह्या पोरानें तर मला अगदीं त्रासवून सोडलं आहे. काय करावं ह्या गाढवाला ?—राघू, करून टाक तो दरवाजा बंद ! ह्याला असं वागविल्याशिवाय हा वळणीवर यावयाचा नाहीं. आतां घे ह्मणावं झोंप ! " असें ह्मणून भाऊसाहेब माडीवर निघून गेले.

ह्या भाषणावर पतीजवळ रदबदली करण्याची किंवा त्यांस दोन शब्द सांगण्याची सोयच नव्हती ! मुकाट्यानें ती आपल्या खोलींत जाऊन अश्रु गाळीत बसली.

इकडे यशवंताला जरा बरें वाटतांच तो ह्मणाला, " प्रभाकर, आतां नऊ वाजून गेले असतील. वाड्याचा दरवाजाहि बंद झाला असेल आतां मी काय करूं ? "

" तूं नको त्याची काळजी करूं ! मी येतों तुझ्याबरोबर. तुझी अशी स्थिति झालेली कळल्यावर जर त्यांनीं वाड्याचा दरवाजा उघडला नाहीं तर मग त्यांच्या पाषाण हृदयाची शर्थच ह्मणायची ! पण तुला आतां चालवेल का ? नाहीं तर काळ्या घेईल तुला उचलून. "

" हा हा—यशवंतराव, बसा माझ्या पाठुंगळीस. असा फुलाब्रानी नेतो. "

" नको नको ! आतां मी हळुहळु तुमच्या दोघांच्या खांद्यावर हात देऊन चालेन. आतां कांहीं फार नाहीं चालायचें ! "

यशवंतानें एका बाजूला काळयाच्या आणि दुसऱ्या बाजूला प्रभाकराच्या खांद्यावर हात ठेविले होते. मल्हारी फाणस घेऊन पुढें चालत होतो. ती मंडळी देशमुखवाडीजवळ आली, तेव्हां वरल्या मजल्यावर दिवे जळत असलेले दिसत होते. इतकेंच नव्हे तर एका खिडकींत स्वतः भाऊसाहेब उभे असलेले त्या मंडळीनीं पाहिलें. 'प्रभाकर, भाऊसाहेब उभे आहेत रे खिडकींत ?' असें यशवंत ह्मणतो न ह्मणतो तोंच इकडे भाऊसाहेबांनीं खिडकी लावून घेतली. त्यावरून त्यांनीं मंडळींनां ओळखलें असावें असें स्पष्ट दिसतें. प्रभाकर पुढें झाला आणि त्यानें दरवाजाची सांखळ मोठ्यानें वाजविली. परंतु आंतून उत्तर आलें नाहीं. नंतर त्यानें नोकरांचीं नांवें घेऊन हांका मारण्यास सुरवात केली. पांच मिनिटें झालीं तरी कोणीहि दरवाजा उघडण्याकरितां पुढें येईना, असें पाहून प्रभाकर मोठमोठ्यानें भाऊसाहेबांना हांका मारूं लागला. तेव्हां थोड्या वेळानें माडीवरील खिडकी उघडली आणि भाऊसाहेब बाहेर डोकें काढून रागानें ओरडून ह्मणाले, "कोण बोंब मारतोय् रे उगाच ! काय आहे एवढ्या रात्रीं तुमचं काम ?"

"मी प्रभाकर आहे भाऊसाहेब ! आह्मी यशवंताला उचलून आणलं आहे. दरवाजा उघडा."

"तूं कोण मला दरवजा उघडायला सांगणार ? चालता हो येथून !"

"भाऊसाहेब, मी आपल्या घरांत येऊं इच्छित नाहीं. आपण कृपा करून दरवाजा उघडावा आणि ह्या यशवंताला आंत घ्या. त्याला उभं राहण्याचीहि शक्ति नाहीं."

भाऊसाहेब पुनः कांहीं रागानें उत्तर देणार इतक्यांत सगुणाबाई वर गेली आणि डोळ्या-वर पदर धरून पुढें होत ती केविलवाण्या स्वरानें ह्मणाली, "उघडा हो तेवढा दरवाजा. मी तुमच्या पाया पडतें. मला आतां हें नाहीं सहन होत. त्या पोराला का उगाच छळतां !"

"काय ?-काय ह्मटलंस ! मी त्या पोराला छळतों ? फार लांब जीभ करूं नकोस. हो चालती येथून ! ह्मणे मी त्या पोराला छळतों ! काय-काय मी त्याला छळलं सांग पाहूं ? माझं करणं तुला सहन होत नाहीं पण त्या काळ्याची कारस्थानं तुला काय कळतात ! तो आणि तो प्रभ्या! कशीं चाललीं असतात त्यांचीं कारस्थानं ! मला ह्या देशमुख-वाडींतून हुसकावून लावण्याचा त्यांचा कट चालला आहे. पण ह्मणावं, सांभाळा-हा भाऊसाहेब कांहीं कच्चा नाहीं. तुमच्यासारखीं पोरं त्यानें कैक खेळविलीं आहेत !"

अशा रीतीनें माडीवर गडबड चालली आहे तों इकडे वत्सलेनें पुढें होऊन दर-वाजा उघडला. आणि ती सर्व मंडळी आंत आली. त्यावेळीं यशवंताची ती शोचनीय

स्थिति पाहून दुर्गाताईचें आपल्या भावासारखें कठीण हृदयहि विरघळलें. तिनें पुढें होऊन यशवंताचा हात धरून त्याला आंत घेतलें आणि एका खुर्चीवर बसविलें. इतक्यांत भाऊसाहेब आणि त्यांच्या मागून सगुणाबाई खालीं आले.

" कायरे येशा, तुला आज इतकी रात्र कां झाली ? " संतप्त स्वरानें भाऊसाहेब पुढें होऊन ह्मणाले, " नवांच्या आंत घरीं यावयास मी तुला पूर्वी सांगितलं होतं ना ? मग तूं आज पुनः माझा हुकूम कां मोडलास ? "

" मी आपला हुकूम मोडला नाहीं आणि मोडण्याची माझी इच्छाहि नव्हती ! "

"मग इतका वेळ काय करीत होतास ?" असें ह्मणून भाऊसाहेबांनीं कपाळाला आंठ्या घालून दरवाजांत उभा असलेल्या प्रभाकराकडे पाहिलें आणि आपलें भाषण पुढें चालविलें, " तूं ह्याच्या नादी लागून तुह्मी दोघांनीं काय काय कारस्थानं चालविलीं आहेत तीं मला सगळीं कळतात. समजलास !"

" भाऊसाहेब, हा आपण अगदीं घाणेरडा आरोप मजवर करीत आहांत ! " दरवाजांतून प्रभाकर म्हणाला.

" तुला मी विचारीत नाहीं. तुला माझ्या घरीं येण्याचं काय कारण ? अलीकडे तुझे कान लांब झाले आहेत, पण लक्षांत ठेव, हा भाऊसाहेब तुझे लांब कान उपटून तुझ्या हातांत देईल तेव्हांच स्वस्थ बसेल ! "

अशा रीतीनें ते एकेरीवर येतात तों धाडधाड जिना उतरून बंडुनानाची स्वारी खालीं आली. त्याला पाहतांच प्रभाकर मोठ्यानें ह्मणाला, " आज तूं माझ्या घोड्यावर काय ह्मणून स्वार झाला होतास ? "

" माझी खुशी ह्मणून ! "

" अस्सं काय ?—आतां घरांत आहेस ह्मणून तुला जोर आला वाटतं ? ठीक आहे, तुला त्याचा जाब द्यावा लागेल, हें मात्र विसरूं नकोस ! "

" अरे जा ! तुला वाटेल तें तूं करून घे ! तुला विचारतो कोण ? "

" मला विचारणार तर कोणीच नाहीं. पण तुला मात्र विचारणार मी आहें. आणि लवकरच विचारीन. समजलास ! "

" अरे राघू, त्याला बाहेर हांकून दे आणि दरवाजा बंद कर पाहूं ! उगाच गाढवांनीं डोकं उठविलं आहे ! "

भाऊसाहेबांचे हे शब्द ऐकण्याकरितां प्रभाकर तेथें उभाच राहिला नाहीं.

# प्रकरण २० वें.

## मासलेवाईक दोन पत्रें.



प्रभाकर घरीं आल्यावर त्यानें ओटीवर इतका वेळ त्याची वाट पहात बसलेल्या राधाआकाजवळ आईची चौकशी केली. सावित्रीबाई आंतल्या खोलींत अद्यापि जागीच होती. प्रभाकर आपली चौकशी करतो आहे, आणि घोड्याच्या भानगडीवरून तो देशमुखवाडींत गेला होता, तेथें कांहीं तरी कमजास्त प्रकार झाला असावा ह्मणूनच तो आपली चौकशी करितो, असें वाटून ती स्वतः उठून बाहेर आली. तिला पाहतांच प्रभाकर ह्मणाला, " आई, तुझ्याजवळ माझी आज एक हात जोडून नम्र विनंति आहे. बाबांच्या मागें त्यांच्या आज्ञेप्रमाणें तुझा प्रत्येक शब्द पाळणें हें माझें पवित्र कर्तव्य मी आजपर्यंत पाळलं आणि ह्यापुढेंहि तें मी पाळीन. पण आज मी असं काय चमत्कारिक बोलतों, याचं तुला आश्चर्य वाटेल पण माझी सर्व हकीकत ऐकून घे—"

प्रभाकराचा तो बदललेला आवाज, त्याच्या भाषणांतील गूढपणा आणि त्याचा निश्चयी स्वर ऐकून सावित्रीबाई आणि राधाआका यांना अत्यंत आश्चर्य वाटलें. प्रभाकर जरी तिचा सावत्र मुलगा होता, तरी त्यानें आपल्या प्रेमळ कर्तव्यानें तिला आपली खरीच जन्मजननी केली होती. प्रथमतः तिला आपल्या मुलाविषयीं—मधुकराविषयीं एकप्रकारची आस्था आणि प्रभाकराविषयीं अनास्था वाटत होती परंतु अलीकडे तिचें मन साफ बदललें, मधुकरानें पुण्यांत जाऊन गुण उधळतांच तिला आपली चूक स्पष्ट दिसून येऊन प्रभाकराच्या थोर मनाची चांगली ओळख पटून त्याच्याविषयीं तिच्या मनांत खरें प्रेम जागृत झालें. असो. प्रभाकराचें वरील भाषण ऐकून ती शंकित स्वरानें ह्मणाली, " प्रभाकर, आज तूं असं काय चमत्कारिक बोलतोस ? मला एखादी गोष्ट सांगायची त्याला विनंति कशाला करायला हवी ! तूं माझा मोठा मुलगा ना ? "

बस्स ! सावित्रीबाईच्या ह्या एकाच वाक्यानें प्रभाकराच्या डोळ्यांला पाणी आलें. दाजीबा निवर्तल्यानंतर आज चार वर्षांनीं त्याच्या अंतःकरणाला पिळ पाडणारें सावित्री-बाईच्या तोंडचें हें पहिलेंच वाक्य होतें !

" अरे वेड्या ! तूं असं डोळ्यांत पाणी काय आणतोस ? सांग तुला काय सांगायचं आहे तें ? "

प्रभाकरानें हळुहळू प्रथम आधल्या दिवशीं भाऊसाहेबांबरोबर घडलेली सर्व हकीकत सांगितली. नंतर नुकताच झालेला प्रकार सांगितला. आणि तो ह्मणाला, " आई, आतां इतका प्रकार झाल्यावर भाऊसाहेब आपल्याला सुखानें घास खावूं देतील असं तुला वाटतं का ? आणि माझी तरी यांत कांहीं चूक आहे का ? मी काल शक्य तितकं माझं मन आवरलं पण जेव्हां त्यांनीं चाबूकच उगारला तेव्हां मात्र माझं मस्तक फिरलं ! बरं आज तरी ?—यशवंताला आतां मी घेऊन गेलों तों एखाद्या पिसाळलेल्या कुत्र्यासारखे माझ्या अंगावर आले ! ह्मणून ह्मणतो तो पाषाणहृदयी मनुष्य हप्त्यासाठीं आतां आपल्याला चैन पडूं द्यावयाचा नाहीं. "

" मग आतां काय करावं अशी तुझी इच्छा आहे ? "

" माझी इच्छा अशी आहे कीं, फुल शहरांत जाऊन मुकुंदशेटजींना भेटावें. त्यानें मागें मला सांगितलें होतें कीं, केव्हांहि तुला गरज लागली तर तूं प्रथम मजकडे ये. मी वाटेल ती मदत तुला करीन. त्याप्रमाणें त्यांच्या जवळून पैसे काढावे आणि हे भाऊसाहेबांचे हप्ते देऊन टाकून त्यांच्या मगरमिठींतून आपली सुटका करून घ्यावी ! "

" पण आतां आपणास किती हप्ते भरावयाचे आहेत ? "

" तीन. ह्मणजे एकंदर साडे तीनशें रुपये. आणि माझी खात्री आहे कीं, मुकुंद-शेट फार सज्जन आहेत. ते आपणास काडी इतका देखील त्रास देणार नाहींत. "

" ठीक आहे. तुला जें योग्य दिसेल तें तूं कर. "

" आणि प्रभाकर, ती दुसरी गोष्ट नाहीं सांगितलीस तुझ्या आईला ? " मध्येंच राधाआका हांसत हांसत ह्मणाली. तेव्हां तिच्या ह्मणण्याचा भावार्थ ओळखून प्रभाकर ह्मणाला, " ती गोष्ट आका तूंच सांग. मी जातों झोंपायाला ! "

" कसली गोष्ट प्रभाकर ? ऐकूं तरी दे मला ! "

" अग, त्यानें तुला सून पाहून ठेविली आहे."
" खरं का ? कोण बुवा ही सून ? "
" देशमुखांची कृष्णा. "
" खरं कीं काय ? वाः उत्तम निवड केलीस ! "
त्या रात्रीं प्रभाकराला फारच शानदार झोंप लागली !

दुसऱ्या दिवशीं गणबा येतांच त्याला आणि मल्हारीला काय काय करावयाचें तें सांगून प्रभाकर आपल्या उद्योगाला लागला. त्यानें प्रथम पुण्यास एक पत्र लिहिलें. नंतर स्नान करून जेवण आटोपलें. आजपासून ठरल्याप्रमाणें यशवंताकरितां त्याला गाडी न्यावयाची होती. परंतु कालची त्याची स्थिति पाहून आज तो खाणीवर जाईल किंवा नाहीं, ह्याविषयीं प्रभाकराला शंकाच होती. तथापि तशा स्थितींतही भाऊसाहेब त्या गरीब पोराला खाणीवर पाठवितील असें वाटून तो गाडी घेऊन निघाला आणि आंबराईच्या कोंपऱ्यावर उभा राहिला. इतक्यांत बापाकरितां भाकर घेऊन गजरा आंबराईत येत होती, तिला बोलावून प्रभाकरानें यशवंताची चौकशी केली. तेव्हां त्याला कळलें कीं, 'यशवंत रात्रभर अस्वस्थ होता आणि आतांहि बिछान्यावर अगदीं पडून आहे. शेवटीं सगुणाबाईच्या अत्याग्रहावरून ह्मणा किंवा लोकलज्जेस्तव ह्मणा भाऊसाहेबांनीं शास्त्रीबुवास बोलाविणें पाठविलें आहे.'

' असो. आतां शास्त्रीबुवांना त्यांनींच होऊन बोलाविलें आहे, तेव्हां कांहीं काळजी करण्याचें कारण नाहीं. आतां ते यशवंताला चांगलीच विश्रांति घेऊं देतील.' असें स्वगत ह्मणत प्रभाकरानें आपली गाडी चालविली. तोंच गजरा हात पुढें करून हळूंच ह्मणाली, " दादा, हें वत्सलाबाईनें दिलं आहे."

" काय दिलं आहे ? "

" पत्र." असें म्हणून तिनें कागदाची अगदीं बारीक केलेली घडी प्रभाकराच्या हातीं दिली.

" हें मला दिलं आहे ? "

" होय–तुम्हालाच. अगदीं गुपचुप कोणाला न कळतां तुम्हालाच दे म्हणून तिनें मला बजावून सांगितलं."

प्रभाकरानें गाडी हांकतां हांकतां वत्सलेनें पाठविलेलें पत्र वाचलें. परंतु त्या पत्रापासून त्याच्या आकुंचित झालेल्या भिंवयावरून त्याला आनंद झालेला दिसत नव्हता. त्यानें पुनः त्या पत्राची घडी करून तें खिशांत टाकतांना 'मूर्ख उच्छृंखल पोर आहे !' इतकेच उद्गार काढले.

त्याची गाडी फुलशहरांत मुकुंदशेटजीच्या पेढीजवळ आली. त्यावेळीं बारा वाजून गेले होते. शेटजी आपल्या बसावयाच्या खोलींत एकटेच होते. प्रभाकराला पाहून त्यांनीं प्रथम कुशलवृत्त विचारलें. नंतर मुद्दाम भेटीला येण्याचें कारण विचारलें. तेव्हां प्रभाकरानें सरळ रीतीनें भाऊसाहेबाविषयीं सर्व गोष्टी त्यांच्या पुढें मांडून आपल्या येण्याचें कारण सांगितलें. ती सर्व हकीकत शांत चित्तानें ऐकून शेटजी म्हणाले, " पण तूं इतकीं–चार वर्षे घालविलींस का ? मी त्याच वेळीं तुला सांगत होतों. असो. आतां होऊन गेलेल्या गोष्टी पुनः कशाला ? तुला आतां किती–साडे तीनशें रुपये पाहिजेत !–बरं ते मी तुला आतां देतों आणि दुसरी एक गोष्ट तुला सांगतों. ती त्या दरडीजवळ म्हणजे तुमच्या देशमुखांच्या खाणीजवळ वाघमाऱ्याची वाडी आहे ना, ती सध्यां मजकडेच गहाण आहे. त्यावर त्यानें चारशें काढलें होतें. पण आतां त्याला पैसे देववत नाहींत म्हणून तो माझ्यामागें मीच ती विकत घ्यावी म्हणून सारखा लागला आहे. ती वाडी जर आमच्या हद्दींत जवळ असती तर कदाचित् मी घेतली असती. पण आतां तूं आला आहेस तेव्हां मला असं वाटतं, तुझ्या नांवानें मी ती खरेदी घेतों. तुला ती जवळ पण आणि उत्पन्नालाहि ती फार नामी आहे."

" पण शेटजी पैशाची मी काय व्यवस्था करूं ? "

" तुझ्याजवळ मी आतांच कुठें पैसे मागतों ! आज नाहीं दहा वर्षांनीं दे. शिवाय ह्या साडेतीनशांवर आणि त्या वाडीची खरेदी होईल त्या मुदलावर मी तुझ्याकडून एक पै देखील व्याज घेणार नाहीं." असें म्हणून शेटजींनीं प्रभाकराच्या खांद्यावर हात ठेविला आणि ते पुढें म्हणाले, " प्रभाकर, तुला मदत करावी अशी माझी फार फार इच्छा आहे. तूं बापासारखा सत्यप्रिय व कर्तव्यदक्ष आहेस हें पाहून मला फार आनंद होत आहे."

मुकुंदशेटनीं साडेतीनशें रुपये त्याच्या पदरांत घातले. आणि त्याचा कागद देखील लिहून घेतला नाहीं, इतकेंच नव्हे तर त्याच्या करितां सवलतीच्या अटीवर एक वाडीहि

विकत घेण्यास ते तयार झाले. वाचकहो ! मुकुंदशेट प्रभाकरावर इतके भाळले, याचें काय बरें कारण असेल ?—त्याचे सद्गुण !

प्रभाकर जावयास निघाला तेव्हां ' मला आठ दिवसांनीं भेट ह्मणजे वाडीसंबंधीं काय तें मी तुला नक्की सांगतों' असें सांगून मुकुंद शेटजींनीं त्याला प्रेमाचा निरोप दिला. प्रभाकर परत येत असतां त्याची मुद्रा प्रफुल्लित दिसत होती. आज आपण भाऊसाहेबांच्या मगरमिठींतून कायमचे सुटणार याचा त्याला आनंद झाला होता. त्या आनंदाच्या भरांत त्याला वत्सलेच्या पत्राची पुनः आठवण झाली. तेव्हां त्यानें तें पत्र खिशांतून पुनः बाहेर काढलें आणि वाचण्यास सुरवात केली. तें पत्र खालीं लिहिल्याप्रमाणें होतें.

" श्रीयुत प्रभाकरराव,

छे ! गडे ! अलीकडे सर्वजण ' श्रीयुत ' असं लिहितात. पण मला तें गोड लागत नाहीं. मी घरीं येणारीं मासिकें, पुस्तकें पाहतें, त्या सर्वांवर नांवाच्या मागें ' श्रीयुत ' असं लिहीलेलं असतं. ' श्रीयुत ' याचा अर्थ कदाचित् फार मोठा असेल पण मला मात्र त्याचा कांहींच अर्थ कळत नाहीं. प्रभाकरराव ! मला आपल्या नांवामागें एकच शब्द लिहावा असं वाटतं. लिहूं का !—लिहितेंच गडे ! प्रियकर प्रभाकरराव, आतां मी माझं मन कशाला चोरून ठेऊं. ह्यापूर्वीं दोनचारदां मी माझं मन उघड करण्याचा प्रयत्न केला परंतु तुह्मीं समजून-उमजून वेडयाचं सोंग पांघरलं ! खरंना ?

काल रात्रीं तुह्मी भाऊसाहेबांच्या बरोबर भांडण कां केलं ? हें गडे, तुह्मी चांगलं नाहीं केलं ! त्यांचा आणि बंडुनानाचा स्वभाव अगदीं वाईट आहे पण आतां आपणास त्यांच्याशीं वाकडं होऊन कसं चालेल ? माझी सर्व आशा आपणावर आहे. ह्मणून ह्मणतें, आपण त्यांच्याशीं मिळून वागावें. आपल्या पत्राची मी एकसारखी वाट पहात आहें. आपण सांगाल तेव्हां गजरा उत्तर देण्यास येईल. ती माझ्या विश्वासाची आहे. आपल्या पत्राची वाट पहात असलेली.—

आपलीच,

वत्सला."

' आमच्या वत्सलाबाईची अक्कल फार वाढलेली दिसते. आतां ह्या गोष्टीचा लवकरच बंदोबस्त केला पाहिजे. नाहीं तर ह्या गुप्त पत्रव्यवहाराचा परिणाम भलताच व्हावयाचा ! ' असें ह्मणून प्रभाकरानें त्या पत्राची पुनः पूर्ववत् घडी करून तें खिशांत टाकलें. आतां ह्या गोष्टीला आळा कसा घालावा, याचा विचार करीत असतां त्याची गाडी खाणीजवळ आली. तो आतां येतांना मुद्दाम खाणीवरून आला होता. कारण नुकत्याच गोष्टी निघाल्या होत्या, ती वाघमाऱ्याची वाडी एकदां लक्षपूर्वक पहावी अशी त्याची इच्छा होती.

गेटाजवळ गाडी येतांच घोड्याला थोडा वेळ विश्रांति द्यावी ह्या उद्देशानें प्रभाकरानें गाडी उभी केली. त्यावेळीं आंत बाबुराव आणि हरिभाऊ हे दोघेच होते. गाडी कोणाची ह्मणून बाबुरावानें सहज डोकावून पाहिलें तों प्रभाकर त्याच्या दृष्टीस पडला. मग काय विचारतां ? स्वारीचें धाबें दणाणलें ! त्यानें हातांतील पत्र तसेंच खिशांत कोंबून मागल्या दाराचा रस्ता धरला. काल रात्रीं आपण अरेरावी केली त्याचा सूड घेण्याकरितांच आतां प्रभाकर आला आहे अशी त्याची कल्पना होऊन तो तेथून पळाला.

वाचकहो ! प्रभाकर येथें का थांबला याचें कारण तुह्माला माहित आहेच ! तो बाबुरावाच्या कल्पनेप्रमाणें त्याचा सूड घेण्याकरितां आला नसून फक्त घोड्याला विश्रांति मिळावी ह्मणूनच तेथें थांबला होता. प्रभाकरानें हरिभाऊला हांक मारून घोड्याला पाजण्याकरितां नोकराकडून पाणी मागविण्यास सांगितलें.

" कां हरिभाऊ, आज तुह्मी एकटेच ? "

" नाहीं एकटेच कसे ? बाबुराव आहेत ना ! "

" कुठें आहे ? "

" तुह्माला पाहतांच ते मागल्या दारानें बाहेर पडले ! "

" भित्रा पाजी तर नंबर एकचा आहे ! पण काल घरांत होता तेव्हां मात्र हातभर जीभ लांब केली होती. "

प्रभाकरानें त्याला वाटेल त्या नांवानें जरी संबोधिलें तरी त्याच्याचमागें आपणास आतां गेलें पाहिजे. कारण त्यानें जें एक पत्र घाईघाईनें खिशांत लपविलें तें फार महत्त्वाचें आहे. आणि त्या पत्रांतील मजकूर वाचकांना अवश्य कळला पाहिजे; अशी आमची इच्छा आहे. तर वाचकहो! चला आपण त्याच्यामागें जाऊं.

प्रभाकराला पाहून बाबुराव निसटला तो मागच्या दारानें थेट खाणीवर आला. त्यानें एकदांसुद्धां मागें वळून पाहिलें नाहीं. त्याला प्रभाकराची पक्की दहशत बसली होती. तोंडानें तो जितका फटकळ होता तितकाच कृतींत भित्रा होता ! खाणीवर पोहोंचल्यावर त्यानें मागें पाहिलें तों प्रभाकराची गाडी जातांना त्याच्या दृष्टीस पडली. तेव्हां तो निर्भय झाला. आणि गेटावर येण्याकरितां पुनः मागें वळला. थोडें चालून गेल्यावर त्यानें आपल्या खिशांतील पत्र बाहेर काढलें आणि चालतां चालतां वाचण्यास सुरवात केली. तें पत्र कोणी लिहिलें होतें व कां लिहिलें होतें हें वाचकांना कळावें ह्मणून तें पत्र जसेंच्या तसें येथें दिलें आहे.

२९ एप्रिल १९१२.

" मित्रवर्य राजेश्री बाबुराव देशमुख यांसः—

न. वि. वि. आपणास हें पत्र मी मुद्दाम लिहित आहे. याचा आपण अवश्य विचार कराल अशी माझी व सर्व मंडळीची पूर्ण खात्री आहे. आपण आजपर्यंत जंजिऱ्याच्या बाहेर गेलां नसल्यामुळें बाहेरची मौज आपणास कल्पनेनेंहि होणें शक्य नाहीं. त्यांतून पुण्याविषयीं तर कांहीं विचारूंच नका. पुणें ह्मणजे खरोखरीच पुण्यनगरी आहे. येथें सर्व कांहीं 'और' आहे, मी त्याचें पत्रांत वर्णन करीन ह्मटलें तर तें अशीं पन्नास पत्रें लिहूनहि होणार नाहीं. येथें बोर्डिंगमध्यें आल्यांवर माझ्या कांहीं मित्रांच्या सोबतीनें मी प्रथम '**शारदा**' नाटक पाहिलें. तेव्हांपासून माझें मन अगदीं चलबिचल झालें. आपण एक नाटकमंडळी काढावी असा विचार माझ्या मनांत रात्रंदिवस घोळूं लागला. खरंच सांगतों तुला बाबुराव, ही नाटकमंडळी म्हणजे खरोखरच फार सुखी प्राणी असतात. आतां मी त्या सुखाचा पूर्ण अनुभव घेत आहें. मनसोक्त वर्तन करावयास मिळतें. वाटेल तसे पोशाख—आतां माझ्याच पोशाखाचें वर्णन केलें म्हणजे तुझी खात्री होईल. मी आतां जरीची मोठी टोपी, केव्हां केव्हां जरीचा मागें सोगा सोडून फेटा बांधतों. अंगांत पातळ सदरा त्यावर कोट आणि पातळ बंगाली धोतर नेसतों. माझ्या पायांत नेहमीं दिल्लीचे जोडे असतात. आतां मी सर्व केस वाढविले असल्यामुळें मला हा पोशाख फारच शोभतो. आम्ही काढलेल्या नाटक मंडळीचें नांव '**श्रीकांत प्रासादिक संगीत नाटक मंडळी**' असें आहे. मी मुख्य स्त्रीपार्ट करतो. आम्हीं '**सौभद्र**' नाटक बसविलें असून आतां '**शारदा**' नाटक बसवित आहोंत. आमच्या रंगीत तालमीला येथील प्रसिद्ध वर्तमानपत्रांचे संपादक आह्मी बोलविले होते. शिवाय गांवांतील बरीच मोठमोठी मंडळी आली होती. आमच्या फार मोठ्यांच्या ओळखी झाल्या आहेत. कॉलें आमच्या मंडळीनां येथील अण्णासाहेबांनीं मुद्दाम चहापार्टीला बोलाविलें होतें.

आमचा पहिला खेळ आतां लवकरच येथील '**आर्य नूतन नाटक गृहांत**' लागणार आहे म्हणून आम्हाला थोडी पैशाची जरूरी आहे. येथें मी शब्द खर्च करीन तर हजारों रुपये मिळतील पण त्यामुळें आमचा येथें बोज राहणार नाहीं. ह्मणून मी कोणाजवळहि शब्द टाकीत नाहीं. मी घरीं पत्र लिहून प्रभाकराजवळ दोनशें रुपये मागविले पण तो कसला खाष्ट ! त्यानें मला अद्यापि उत्तरच लिहिलें नाहीं. आमचे एकदां खेळ सुरू झाले ह्मणजे पैसाच पैसा ! प्रत्येक खेळाला येथें चारशें पासून पांचशें रुपये उत्पन्न होतें. आणि खर्च फार थोडा !—पांच दहा रुपयांत फुलें, वेण्या, गजरें आणि मंडळीची चहा कॉफी यांचा खर्च भागतो आणि चाळीस पन्नास रुपये थिएटरचें भाडें मिळून पन्नास साठ रुपये प्रत्येक खेळाला खर्च होऊन उत्पन्न दांडगें होतें. असे महिन्यांतून आठ

खेळ केले ह्मणजे अडीच तीन हजारांचें उत्पन्न होतें. आपल्या जंजिऱ्यास मागें एक नाटक मंडळी आली होती. त्यांचा थाट तूं पाहिलासच आहेस. तशा थाटानें आह्मांला सहज राहतां येईल. तूं जर आह्माला एवढी पैशाची मदत करशील तर आह्मी तुला कंपनीचा म्यानेजर करूं. तूं आतां खाणीवर जातोस पण तुला कधीं रुपये दोन रुपये मिळतात काय? खावें, प्यावें आणि सर्व दिवस खाणींत मरावें! हेंच ना तुझे नशिबीं! त्यापेक्षां दोन तीन हजाराची सोय करून तूं जर आमच्या मंडळींत आलास तर सर्व कंपनीचा मी तुला मालक करीन. एकदां आपली कंपनी चालू झाली ह्मणजे आपणास निरनिराळे गांव-शहरें पहावयास मिळतील. हिंदुस्थानांत सर्व ठिकाणीं प्रवास करतां येईल. चैनीनें राहतां येईल. तूं जर येथें येऊन आह्माला मिळशील तर आपण दोघेहि कंपनी अशी रंगरूपाला आणूं आणि मग आपण मालक ह्मणून मोठ्या थाटांत जंजिरास जाऊं. त्या दगडाच्या खाणींतच एखाद्या मजुरासारखें रात्रंदिवस खपण्यापेक्षां येथें येशील तर उत्तम होईल. भाऊसाहेबांनीं इतकीं वर्षें खपून जें मिळविलें तेंच आपण चैनींत आणि सुखांत राहून दोन चार वर्षांत सहज मिळवूं. पहा, माझ्या ह्या पत्राचा नीट विचार कर. आणि मी लिहिल्याप्रमाणें प्रथम आह्माला दोनशें रुपये पाठविशील किंवा नाहीं आणि पाठविणार असलास तर किती दिवसांत पाठविशील तें लिहून आमच्या कंपनीच्या बिऱ्हाडीं-' शुक्रवार पेठ, श्रीकांत प्रासादिक संगीत नाटक मंडळी, ' ह्या पत्त्यावर ताबडतोब कळवावें.

. **सूचनाः**—हें पत्र कोणाला दाखवूं नको. वाचून होतांच फाडून टाकणें. कळावें. उत्तराची वाट पहात आहे.

तुझा बालमित्र,

**मधुकर.**"

हें पत्र बाबुरावाला पोष्टानें आल्यापासून त्यानें त्याच्या आवृत्त्यावर आवृत्त्या चालविल्या होत्या. ही आतां तो वाचीत होता ही त्याची आठवी आवृत्ति होती. मधुकरानें आपल्या चार मित्रांचीं डोकीं खर्च करून लिहिलेल्या त्या पत्राचा बाबुरावावर परिणाम होऊं लागला. त्यानें तें पत्र वाचून एकदां आजुबाजूला पाहिलें आणि तो स्वगत ह्मणाला, " खरंच! काय येथें मौज आहे? सकाळीं उठावें, स्नानजेवण आटपावें, आणि ह्या तेथें येऊन काम करीत बसावें. पुनः संध्याकाळ झाली, कीं पुनः घरीं जावें, जेवावें आणि झोंपावें! फार झालें तर रजा असेल तेव्हां इकडे तिकडे फिरावें हेंच कीं नाहीं आमच्या नशिबीं!—पण हा मधुकर दोनशें रुपये प्रथम मागतो, ते कसे मिळतील?—कांहीं तरी

लटपट केलीच पाहिजे. आणि ते दोनशें रुपये त्याला स्वतःला नकोच आहेत. तो ह्मणतो त्याप्रमाणें एकदां कंपनी सुरू झाली, कीं मग काय पैसाच पैसा! आपणहि एखादा पार्ट करणार. त्या मद्याचा आवाज मोठा गोड आहे. माझा आवाज मोठा आहे. पण मला पुरुषपार्ट चांगला शोभेल. आपणहि नाटकांत पार्ट करणार—बस्स! आणि ह्मणतो दोन तीन हजार मिळाले तर तुला मालक करूं! ही तर फारच मोठी रक्कम आहे. पण एकदां मालक झालों ह्मणजे महिना अडीच तीन हजार उत्पन्न होईल. काय करावें? हा चान्स मोठा फायदाचा आहे. पाहूं तर खरं एकदां प्रयत्न करून! पण हे दोनशें रुपये तर प्रथम कसेंहि करून पाठविलेच पाहिजेत. एकदां आमची मंडळी सुरू झाली मग काय?"

अशा रीतीनें बाबुरावाचें मनोराज्य चालू असतां इकडे प्रभाकरानें पुढें काय केलें हें आपणांस आतां पाहिलें पाहिजे.



# प्रकरण २१ वें.



## परस्पर विरोधी दोन गोष्टी.



"आई, मी ह्मटलं तें कांहीं खोटं नाहीं. मुकुंदशेट खरोखरीच सज्जन माणूस आहे. मला रुपये दिले आणि माझी पावती देखील त्यांनीं लिहून घेतली नाहीं." घरीं आल्यावर प्रभाकर आपल्या आईला मुकुंदशेटच्या पेढीवर झालेला प्रकार सांगत होता. जवळच राधाआका आणि तिच्या मांडीवर कमला हातांत पुस्तक घेऊन आपल्या दादाचें भाषण ऐकत बसली होती.

"आणि आई, ती वाघमाऱ्याची वाडी आहेना, ती माझ्या नांवें खरेदी घेऊन ते मला देणार आहेत. दहा वर्षांत त्यांची फक्त मुद्दल रुपये फेडावी. व्याज नाहीं."

ही दुसरी गोष्ट ऐकून तर सावित्रीबाईला फारच आनंद झाला. ती ह्मणाली, "प्रभाकर, ह्या भाऊसाहेबांच्या कर्जांतून आपण मुक्त झालों ह्मणजे एक श्रीसत्यनारायण पूजा करण्याचें मी बोललें आहे."

"ठीक आहे. आई आपण मोठ्या समारंभानें पूजा करूं!"

"आई केव्हां करायची पूजा?" मध्येंच कमलेनें विचारलें.

"आतां करूं बाळ! पण प्रभाकर, तूं पैसे केव्हां देणार नेऊन?"

"केव्हां ह्मणजे! आतां. मला आतां पैसे देऊन भाऊसाहेबांच्या मगरमिठींतून मुक्त झाल्याशिवाय चैनच पडायचं नाहीं."

"हे अगदीं हरामाचे पैसे भाऊसाहेब आपणाजवळून घेत आहे." राधाआका ह्मणाली, "दाजीला मेल्या चांडाळानं फसवून त्याचा केसानें गळा कापला आणि मोठा देशमुख ह्मणून मिरवतोय्! कध्धीं नाहीं त्याचं चांगलं व्हायचं! ह्या पोराला—यशवंताला आतां रडवतोय्. पण कधीं तरी मेला स्वतःच रडेल!"

"जाऊं दे ग आका! करील तो भरील! उगाच कशाला आपण आपलें तोंड विटाळून घ्या."

प्रभाकर देशमुखवाडीजवळ आला त्यावेळीं साडेचारांचा सुमार झाला होता. तो दरवाजाजवळ येऊन आंत जावें कीं नाहीं याचा विचार करीत क्षणभर तेथेंच उभा राहिला. काल त्याला भाऊसाहेबांनीं फारच वाईट रीतीनें वागविलें होतें, त्याची त्याला चांगली आठवण होती. तथापि तो आज आला होता ह्मणजे केवळ त्यांचे सर्व हप्ते भरण्याकरितांच ! तो दरवाजाजवळ उभा असतां एकाएकीं वरची खिडकी उघडली आणि सगुणाबाईनें बाहेर पाहिलें तों प्रभाकर तिच्या दृष्टीस पडला.

“ अरे प्रभाकर ये ! असा दरवाजाजवळच काय उभा राहिला आहेस ? ये–घरांत कोण नाहीं. ये—”

घरांत त्या वेळीं खरोखरीच कोणीं नव्हतें. भाऊसाहेब आणि बाबुराव खाणीवर होते. दुर्गाआत्या सायंकाळची तयारी करण्यांत स्वयंपाक घरांत गुंतली होती. वत्सला मागल्या पडवींत गजराजवळ जाऊन सकाळीं पाठविलेल्या पत्राचें उत्तर आलें कीं नाहीं याची चौकशी करण्याकरितां गेली होती, ती तिकडेच बसली होती. राहतां राहिली कृष्णा आणि इंदू. त्या दोघीं खालच्या दिवाणखान्यांत होत्या. आणि सगुणाबाई माडीवर यशवंतजवळ बसल्या होत्या. भाऊसाहेब अकरा वाजतां बाहेर गेल्यावर सगुणाबाई वर जाऊन बसली होती. आज कैक महिन्यांनीं इतका वेळ ती यशवंत जवळ बसून सुखदुःखाच्या गोष्टी करीत होती. सकाळीं शास्त्रीबुवांनीं येऊन यशवंताची प्रकृति पाहिल्यावर आपलें पूर्वीचेच मत दिलें. निदान आठपंधरा दिवस नियमानें औषध देऊन त्याला चांगली विश्रांति दिली, तरच तो सुधारेल असें शास्त्रीबुवांनीं सांगितल्यावरून आज पासून त्याची खाण सुटली होती. सगुणाबाई जेवण होतांच वर जाऊन त्याच्याजवळ जाऊन बसली. तो सकाळपासून बिछान्यावर पडूनच होता.

थोड्या वेळापूर्वी त्यांच्या प्रभाकराविषयींच गोष्टी चालल्या होत्या. यशवंताविषयीं प्रभाकरानें काय काय केलें आणि पुढें काय काय करण्याचें योजिलें आहे तें सर्व ऐकून सगुणाबाई ह्मणाली, “ प्रभाकर, आपल्या बापासारखाच प्रेमळ अंतःकरणाचा आणि सद्गुणी आहे. सावित्रीबाई त्याची सावत्रआई परंतु पहा त्याचं तिच्याबरोबर वर्तन कसं आहे तें ! नाहीं तर आमचीं पोटचीं पोरं पहा कशीं नक्षत्र ! ” अशा प्रकारें तिनें उद्गार काढून खिडकी उघडण्याकरितां ती उठली. त्याचवेळीं वर वर्णन केल्याप्रमाणें दरवाजाजवळ उभा असलेला प्रभाकर तिच्या दृष्टीस पडला. तिनें हांक मारिल्यावर प्रभाकराला मागें फिर-

वेना. त्याच्या मनांत आपल्या सापत्न आईविषयीं जितका आदर वसत होता, तितका सगुणाबाईविषयीं वसत होता. तो माडीवर चढून गेला. त्याला वर जातांना कोणीहि पाहिलें नाहीं.

" कायरे प्रभाकर, बाहेरच्या बाहेरच का परत जात होतास ?" सगुणाबाई ह्मणाली, " काल रात्रीं आमच्या घरांतून तुला कडक शब्द वापरले, तरी तुझं तुझ्या बापासारखं कोवळं मन यशवंताची विचारपूस केल्याशिवाय चैन पडूं देईना ना ? पण प्रभाकर, काल घडलेल्या गोष्टीबद्दल तूं राग मानूं नकोस. तुला आमच्या घरांतला स्वभाव माहिती आहे ना ! "

" मला राग आला असता तर मी आज येथें आलोंच नसतों. पण आतां यशवंताची काय खबर आहे ! "

" आतां मला पुष्कळ बरं वाटतं. " यशवंतानेंच उत्तर दिलें, " मला अशी कांहीं दिवस विश्रांति मिळेल तर मी साफ बरा होईन आत्या ! "

" आणि विश्रांतीचीच तुला अत्यावश्यकता आहे असें शास्त्रीबुवाहि ह्मणतात. "

" यशवंत, आतां तूं काळजी करूं नकोस. तूं आतां साफ बरा झाल्याशिवाय मी तुला खाणीवर जाऊंच द्यायची नाहीं, मग काय होईल तें होवो ! "

" तुह्मी मनावर घेतल्यावर सर्व कांहीं होईल. " असें ह्मणून प्रभाकर थोडावेळ गप राहिला. त्याच्या मनांत दोन गोष्टी घोळत होत्या. त्या सगुणाबाईस सांगाव्या किंवा नाहीं, याचा तो विचार करीत होता. शेवटीं सांगाव्या असें ठरतांच तो ह्मणाला, "मला तुह्माला दोन गोष्टी सांगावयाच्या आहेत. आणि दोन्ही गोष्टी अगदीं परस्परविरोधी आहेत. त्या तुह्माला कितपत रुचतील हा एक प्रश्नच आहे–"

" सांग–सांग प्रभाकर, तूं असा संकोच धरूं नकोस ! "

प्रभाकरानें आपल्या खिशांत हात घातला आणि सकाळीं वत्सलेकडून त्याला आलेली प्रेमपत्रिका त्यानें बाहेर काढिली. " हें पत्र वाचून तुह्माला आश्चर्य वाटेल, परंतु ही गोष्ट कानाडोळा करण्यासारखी नाहीं, असेंच आपणास वाटेल. आपण हें पत्र वाचा. "

सगुणाबाईनें तें पत्र हातांत घेऊन उघडलें आणि वाचण्यास सुरवात केली. पत्र वाचून होतांच तिची चर्या गंभीर दिसूं लागली. बराच वेळ ती कांहीं बोलली नाहीं.

प्रभाकरहि कांहीं बोलला नाहीं. परंतु असें किती वेळ चालणार ? शेवटीं सगुणाबाईला बोलावेंच लागलें. ती ह्मणाली "अलीकडे ती फार शेफारली आहे. मला ह्याचा कांहीं तरी पक्का बंदोबस्त केलाच पाहिजे. मी आतां ही गोष्ट सवड साधून ताईच्या कानावर घालतें आणि मग ह्या गोष्टीचा काय तो विचार ! पण प्रभाकर, तूं ह्या पत्राला जबाब दिलास का ? "

" छे !—नाहीं. मी पत्राला जबाब दिला नाहीं. आणि आतां निश्चय केला आहे कीं, ह्यापुढें वत्सलाबाईला एकटेंच भेटण्याचा कधीं प्रसंगच येऊं द्यावयाचा नाहीं ! "

" हाहि विचार चांगला आहे. बरं आतां दुसरी गोष्ट !—ती काय—सांग ? "

" दुसरी गोष्ट !—ती—ती—" प्रभाकर अडखळूं लागला.

" सांग—असा अडखळूं नको. ती ह्यापेक्षां वाईट आहे का ? "

" वाईट ! तुह्मी मानली तर वाईट आहे. नाहींतर चांगलीच आहे. "

" मग सांग तर ? "

" तुमची कृष्णा—"

तिचें नांव घेतांच ती खोलींत आली. परंतु प्रभाकराला पाहतांच ती दरवाजांतच थबकली ! दोघांची दृष्टिभेट होतांच परस्परांच्या चर्येवर विलसलेलें स्मित सगुणाबाईच्या तेव्हांच लक्षांत येऊन खरी वस्तुस्थितिहि तिनें तात्काळ ताडली. कृष्णा आपला पदर सांवरून खालीं पहात उभी राहिली. काल रात्रीं इतका कडाका उडाला असतां आज प्रभाकर येथें आला याचें तिला क्षणभर आश्चर्य वाटलें. तोंच दुसरा विचार तिच्या मनांत आला. भाऊसाहेब इतके टाकून बोलले तरी केवळ यशवंताची प्रकृति पाहण्याकरितांच तो तेथें आला असला पाहिजे असें वाटून आपणाविषयीं प्रभाकराच्या मनांत वसत असलेल्या प्रेमाबद्दल आणि आस्थेबद्दल तिच्या मनांत आपल्या प्रियकराविषयीं जास्त आदर उत्पन्न झाला.

" कृष्णा, का आली होतीस बाळ ? " सगुणाबाईनें विचारलें.

" मी इंदुबाळाला घेऊन कुरणांत जातें ह्मणून विचारायला आलें होतें आत्या ! "

" जा—पण प्रभाकर आला आहे त्याच्याबरोबर नाहीं का तुला कांहीं बोलायचं ?"

उत्तराऐवजीं तिनें हास्यवदन करून चोरट्या नजरेनें प्रभाकराकडे पाहिलें आणि चटकन् फिरून ती दरवाजा बाहेर गेली.

" प्रभाकर—" गंभीर स्वरानें सगुणाबाई ह्मणाली, " तुझी ही दुसरी गोष्ट आतां मला कळली. आणि त्याबद्दल मला खरा खरा आनंद झाला आहे. तूं फार उत्तम निवड केलीस. वत्सलेला—माझ्या मुलीला तूं झिडकारिलेंस त्याबद्दल मला राग नाहीं. ती तुझ्या बिलकूल योग्य नाहीं. कृष्णा मात्र तुला सर्वथैव योग्य आहे. माझ्या जागीं जर दुसरी आई असती तर आपली मुलगी अशी खाष्ट असूनहि तुझ्या सारखा जांवई मिळविण्याकरितां भगीरथ प्रयत्न करती. मला माझ्या वत्सलेचें सुख पावहायाचं आहे पण तें पाहतांना मी माझ्या सदसद्विवेकाला गुंडाळून ठेविलें, तर मी ईश्वराच्या घरीं मोठी अन्यायी ठरेन. मला कृष्णा आणि वत्सला ह्या दोघीहि सारख्याच असल्या तरी वत्सलेपेक्षां ह्या दोन पोरक्या पोरांची मजवर जास्त जबाबदारी आहे. प्रभाकर, ही जबाबदारी मला पूर्णपणें कळतें पण घरांतल्या सत्तेपुढें माझा इलाज चालत नाहीं. माझा भाऊ जर आज जिवंत असता तर हीं पोरं आज अशीं परावलंबी असतीं का ? उलट आमची घरांतली स्थिति आहे त्याच्याहून अगदींच भिन्न असती. आमच्या घरांतून हा अन्याय होत आहे, हें मला कळत नाहीं का ? पण मी काय करूं ? एक तर माझ्या हातीं सत्ता नाहीं. आणि दुसरं—माझी ही शरीरप्रकृति अशी रोगी ! "

" तरी देखील तुह्मी शक्य तितकं त्यांना जपतां. " मध्येंच प्रभाकर ह्मणाला, " आज नाहीं उद्यां त्यांना चांगले दिवस येतील, अशी माझी खात्री आहे. "

" प्रभाकर, तुझ्या तोंडांत साखर पडो ! खरंच सांगतें तुला, ह्या दोघांच्या करितांच माझा जीव रोज तीळतीळ तुटतो. "

" मी एक गोष्ट योजिली होती. आणि तसं घडून येईल तर ह्या दोघांनाहि मी आमच्या घरीं नेईन. पण भाऊसाहेबांची संमत्ति मिळणें कठीण—"

" होय. तोच मोठा बिकट प्रश्न आहे. पण प्रभाकर, तूं ह्या गोष्टीची कांहीं काळजी करूं नकोस. मी ताई जवळून तें सर्व जुळवितें. एकदां हीं दोघं तुझ्या घरीं गेलीं ह्मणजे मी मोठ्या काळजींतून सुटलें. "

यशवंत पडल्या पडल्या ह्या सर्व गोष्टी ऐकत होता. त्याला ह्या गोष्टी ऐकून अत्यानंद झाला. तो मोठ्या आदरानें प्रभाकराकडे पहात असतां प्रभाकर ह्मणाला, " मग मी आतां जातों. पण भाऊसाहेब भेटले असते ह्मणजे ठीक होतें ? "

" कां ? तूं आतांच ही गोष्ट तिकडे काढणार कीं काय ? "

" नाहीं नाहीं. मी त्यांना दुसऱ्या—आमच्या हप्त्याकरितां भेटण्यासाठीं आलों होतों. मी आतां बरोबर रुपये आणले आहेत. आणि आज त्यांचे सर्व हप्ते भरून दाजीकडून त्यांनीं घेतलेलें करारपत्र रद्द करून परत घेऊन जाण्याचा माझा विचार होता. "

" खरं कीं काय ? वाः मग आनंदाची गोष्ट आहे ह्मणायचं ! पण कायरे प्रभाकर, इतक्या लवकर वसुली होऊन इतके पैसे तुझ्या हातीं आले कसे ? "

" हे वसुलीचे रुपये नाहींत. "

" मग ? "

" हे रुपये मी उसने काढले आहेत. "

" असं का ? मग एवढी मोठी रक्कम उसनवार देणारा तुला सावकार तरी कोण भेटला ? "

" मुकुंदशेटकडून मी ही रक्कम घेतली. भाऊसाहेबांच्या कचाटींतून मी सुटावं अशी त्यांची फार इच्छा होती. मी सर्व हकीकत सांगतांच त्यांनीं मोठ्या आनंदानें ही रक्कम मला बिनव्याजीं दिली. "

प्रभाकराचें भाषण ऐकून सगुणाबाई क्षणभर स्तब्ध होती. नंतर ती म्हणाली—

" प्रभाकर, आज तूं सर्व हप्ते भरणार हें ठीकच आहे—पण ह्या बाबतींतहि तुमची फसवणूक झाली आहे, ही गोष्ट मी कधींहि विसरणार नाहीं. " हें वाक्य उच्चारतांना सगुणाबाईला दुःख होत आहे, हें प्रभाकराच्या लक्षांत आलें.

" फसवणूक होवो अगर न होवो; पण आह्मी भाऊसाहेबांचे देणेकरी होतों इतकी गोष्ट मात्र खरी ! "

" होय. आतां असंच समजून मनाचं समाधान केलं पाहिजे. "

इतक्यांत धाड् धाड् जिना वाजून वत्सला वर आली!



# प्रकरण २२ वें.



## सुटलों एकदांचा !



आई—!

प्रभाकराला आईजवळ बसलेला पाहतांच वत्सला दरवाजांतच थबकली! थोड्यावेळापूर्वी कृष्णाहि अशीच दरवाजांत येऊन थबकली होती. परंतु ह्या दोन व्यक्तींच्या थबकण्यांत ज़मिनअस्मानाचें अंतर होतें. प्रभाकराला पाहून कृष्णा थबकली परंतु तें थबकणें विनयाचें असून तिच्या मुखावर स्मित झळकत होतें. आणि आतां वत्सला थबकली तें तिचें थबकणें आश्चर्यामुळें असून तिच्या मुखावर भीतीचीं चिन्हें स्पष्ट दिसत होतीं. आपल्या पत्राला उत्तर न पाठवितां प्रभाकर घरीं येऊन आईजवळ बसला आहे, तो केवळ आपलें पत्र तिला दाखविण्याकरितांच असें वाटून तिची ही अशी गडबड उडाली.

आणि तिला ह्या असाच संशय आला असेल अशी प्रभाकरानें कल्पना केली. तिला असा संशय येऊं नये ह्मणून तो आपल्या नेहमींच्या वृत्तीनें म्हणाला, " कां वत्सलाबाई, अशा दरवाजांतच कां उभ्या? इतक्या कां दचकलांत? आणि तुम्ही मघांपासून होतां तरी कुठें—आज बाहेर नाहीं गेलां? "

हे प्रभाकरानें नेहमींच्या विनोदी स्वरांत विचारलेले प्रश्न ऐकून वत्सलेच्या जिवांत जीव आला. ती हळू हळू पुढें झाली. आणि आपल्या संशयात्मक कृतीची संपादणी करण्याच्या उद्देशानें म्हणाली, " मी दचकलें, कारण काल तुह्मांला भाऊसाहेब इतके टाकून भलतं सलतं बोलले तरी तुह्मी आमच्या घरीं आलां, हें पाहून मी आश्चर्यचकित झालें! पण आई, काल भाऊंनीं असं नव्हतं करायचं! काय फडाफड बोलले! प्रभाकरराव होते ह्मणूनच त्यांनीं मुकाट्यानें ऐकून घेतलं. "

" चाललंच आहे! ते किती झाले तरी वडील आहेत. त्यांचा बोलण्याचा काय राग मानायचा!" प्रभाकर शांतपणें ह्मणाला.

" हा तुमचा मोठेपणा आहे. पण मला किनई काल फार वाईट वाटलं. तसंच ह्या यशवंताला परवां उगाच सर्व रात्रभर बाहेर ठेवलं. मी काल तुम्हाला दरवाजा उघडला, तसंच जर त्या दिवशीं मला माहित असतं तर दरवाजा उघडून यशवंताला आंत घेतलं असतं. मग भाऊंनीं मला विचारलं असतं तर मी त्यांना काय सांगायचं तें सांगितलं असतं!"

" काय सांगितलं असतंस? आतां सांग पाहूं?

वत्सलेनें मागें वळून पाहिलें तों प्रत्यक्ष भाऊसाहेब दरवाजांत उभे!

भाऊसाहेब बाहेरून आले. आणि आंत शिरतांच त्यांना दरवाजाजवळ काढून ठेविलेले जोडे दिसले. त्यावरून घरांत कोणी तरी परका मनुष्य आला आहे, असा त्यांनीं तर्क केला. आणि ते एकदम माडीवर चढले. तों वत्सलेनें उच्चारिलेलें शेवटचें वाक्य त्यांच्या कांनीं पडलें. ते दरवाजांत उभे होते. परंतु वत्सला आड उभी असल्या-मुळें सगुणाबाईजवळ बसलेला प्रभाकर त्यांच्या दृष्टीस पडला नाहीं. ते काय सांगितलं असतंस?—आतां सांग पाहूं! असें म्हणून पुढें झाले तेव्हां प्रभाकर त्यांना दिसला. त्या बरोबर त्यांच्या कपाळाला आठ्या पडल्या. प्रभाकराच्या तें लक्षांत येतांच त्यांच्या तोंडून रागाचा शब्द बाहेर पडण्यापूर्वीं तो उठून उभा राहिला. आणि म्हणाला, " भाऊ-साहेब, मी मुद्दाम आपलीच भेट घेण्याकरितां आलों होतों. मला आपल्या देण्याघेण्या-च्या व्यवहाराविषयीं आपणाजवळ बोलावयाचें आहे."

" बोलायलाच नको! मला माझे सर्व हप्ते आतां पाहिजेत. मी उद्यां तुम्हाला नोटीसच देणार आहे. मला तुमच्याबरोबर व्यवहार करण्याची आतां इच्छा नाहीं. आठ दिवसांत माझे सर्व हप्ते भरा नाहीं तर मी आंबराईचा कबजा घेईन."

" भाऊसाहेब, आपली नोटीस येऊन दाजींनी रक्ताचें पाणी करून लावलेल्या आंब-राईचा आपण.स कबजा देण्यापर्यंत मी गोष्ट येऊंच देत नाहीं. मी आतां मुद्दाम आलों होतों, तो इतक्याच करितां कीं आपण हे आपले सर्व हप्ते घेऊन आम्हाला ऋणमुक्त

करा आणि करारपत्र रद्द करून आतां माझ्या स्वाधीन करा. ” असें ह्मणून प्रभाकरानें शांतपणानें खिशांत हात घालून नोटांचें पुडकेंच बाहेर काढलें.

भाऊसाहेब अगदीं स्तंभित झाले ! आजपर्यंत प्रभाकराच्या बाबतींत ते कसे तोंडघशी पडत गेले, तें वाचकांना अवगत आहेच ! आतां अलीकडे घडलेल्या तीन दिवसांच्या प्रकारावरून त्यांचा प्रभाकरावर इतका भयंकर कोप झाला होता, कीं त्याला अगदीं शक्य तितका छळण्याचा त्यांनीं निश्चय केला होता. आणि त्याप्रमाणें हप्त्यांचें कारण पुढें करून प्रथम आंबराई घशांत उतरविण्याचा त्यांनीं विचार केला होता. पण--!

प्रभाकरानें शांतपणानें उत्तर देऊन नोटा पुढें केलेल्या पाहून भाऊसाहेब पाण्यांत ढेंकूळ टाकावें तसे विरघळले. आता पुढें काय बोलावें हेंच त्यांना सुचेना ! परंतु झाल्या गोष्टीची कांहीं तरी संपादणी करणें अवश्य आहे. असें पाहून ते कांहीं वेळानें म्हणाले, “ ठीक आहे. तूं हप्त्याचे सर्व रुपये आणले आहेस काय ? चल, आतांच करून टाकूं हिशोब ! आतां तूं रुपये देऊन जा मग उद्यांकडे तुमचें करारपत्र रद्द करून मी पाठवून देईन. तूं आज रुपये आणशील अशी मला कल्पनादेखील नव्हती. उलट मला असें वाटलें होतें कीं ह्या हप्त्यांच्या वसुलीकरितां मला फार त्रास होणार आहे म्हणून मी आजच तें करारपत्र आमच्या विश्वंभर वकिलाजवळ देऊन आलों. ”

“ एकंदरीनें भाऊसाहेब तुम्हीं वकिलापर्यंत गेलां म्हणायचं ! ”

“ हो. मग खरं आहे तें सांगतों. व्यवहाराला नेहमीं चोख असावें. ”

“ मग आपण असं कसं म्हणतां ! व्यवहाराला जर चोख म्हणवितां तर मला आज रुपये देण्यास सांगून उद्यांकडे करारपत्र रद्द करून पाठवीन असें कसें ह्मणतां ! ”

“ मग माझा एवढा विश्वास नाहीं कीं काय ! ”

“ हा विश्वासाचा प्रश्न नाहीं. हा आहे व्यवहाराचा प्रश्न ! ” प्रभाकर म्हणाला, “मग आपण आतां असं करा, उद्यां वकिलाकडून तें करारपत्र आणून ठेवा आणि मी रुपये घेऊन पुन्हां उद्यां संध्याकाळीं ह्याच वेळीं येईन.”

पुनः भाऊसाहेब विचारांत पडले. त्यांच्या मनांतून रुपये घेऊन करारपत्र देण्यास प्रभाकराला त्रास द्यावा असें होतें. परंतु तेंही कांहीं साधन नाहीं असें पाहून ते ह्मणाले, “ बरं तर चल दिवाणखान्यांत. मी पाहातों तें करारपत्र आहे का ? ”

सर्व हिशोब होऊन प्रभाकरानें जेव्हां नोटा मोजून भाऊसाहेबांच्या पुढें ठेविल्या त्यावेळीं त्यांच्या मनांत अनेक विचार आले. दाजीबानें तयार केलेली आंबराई आपणांस मिळावी ह्मणून त्यांनीं आजवर किती प्रयत्न केले ते वाचकांना आठवत असतीलच. दाजीबानें आपल्या हयातींत भाऊसाहेबांना आपल्या आंबराईकडे वांकड्या दृष्टीनेंहि पाहूं दिलें नाहीं. परंतु त्यांच्या मृत्युनंतर मात्र भाऊसाहेबांना आंबराई आपल्या घशांत उतरणार अशी खात्रीच होती ह्मटलें तरी चालेल, पण प्रभाकरानें तर आपल्या बापाचे वर तोंड केली. दाजीबांना दहा वर्षांत जें कर्ज फेडतां आलें नाहीं, तें त्यानें अवघ्या चार वर्षांत प्रतिज्ञेनें फेडून टाकलें. आतां प्रभाकराला त्रास देण्यास आपल्या हातीं कोणतेंहि शस्त्र राहिलें नाहीं, हें पाहून भाऊसाहेबांस वाईट वाटलें. शेवटीं नोटा मोजून घेऊन त्यांनीं तिजोरी उघडली आणि तींतून करारपत्र-दादासाहेब देशमुखांनीं मृत्यु-शय्येवर असतांना त्यांस फाडून टाकण्यास सांगितलें होतें-तें करारपत्र बाहेर काढलें, तें पाहून प्रभाकर मुद्दाम ह्मणाला, " करारपत्र काल वकिलास दिलें ह्मणून ह्मणालांत पण तें तर येथेंच आहे ! "

" मला वाटलं कीं काल इतर कागदपत्रें मी वकिलाच्या स्वाधीन केलीं, त्यांत हेंहि दिलें ह्मणून ! " ओशाळून भाऊसाहेब ह्मणाले.

प्रभाकरानें विषय जास्त वाढविला नाहीं. त्यानें त्या करारपत्रावर ' व्याजासह सर्व पैसे पावले, ' असा भाऊसाहेबांच्या सहीनिशीं शेरा मारून घेऊन तें आपल्या खिशांत ठेविलें आणि हात जोडून तो ह्मणाला, " भाऊसाहेब, आजपासून आपला पैशांचा व्यवहार बंद झाला. तरी प्रसंग हे प्रत्येकावर आहेत. ह्मणून माझी आपणास जातां जातां एवढीच विनंति आहे कीं, दादासाहेब देशमुखांच्या मागें आपण आमच्यावर जशी कृपादृष्टि ठेविली होती तशीच कायम ठेवा. आह्मी गरीब शेतकरी. आह्माला आपल्या सारख्या थोर मंडळींनीं संभाळून घेतलें पाहिजे. माझ्याकडून आपले कांहीं अपराध झाले असतील, तर ते पोटांत घालून आपण मला क्षमा करावी आणि आपलें प्रेम कायम ठेवावें"

कितीहि दुष्ट स्वभावाचा मनुष्य असला, तरी सात्त्विक भाषणांचा त्याच्या मनावर पगडा बसायचाच ! त्याचप्रमाणें प्रभाकराचें भाषण ऐकून भाऊसाहेबांच्या मनावर परिणाम झालाच ! त्यांनीं आजवर केलेल्या वर्तनाबद्दल आतां त्यांना लाज वाटूं लागली.

जातां जातांना यशवंताला भेटावें म्हणून प्रभाकर त्याच्या खोलींत गेला आणि इकडे भाऊसाहेब खुर्चीवरून उठून खोलींतच इकडे तिकडे येरझारा घालूं लागले. प्रभाकराचा आपणावर शह बसला असें त्यांना वाटूं लागलें. थोडावेळ येरझारा घातल्यावर ते खोलींतून बाहेर आले आणि जिना उतरून गेले. त्याचवेळीं बाबुराव खाणीवरून परत घरीं आला. आज त्याची वृत्ति चंचल दिसत होती. त्याच्या डोक्यांत मधुकराच्या पत्रांतील विचार घोळत होते. तो कपडे काढण्याकरितां माडीवर गेला परंतु आंतल्या खोलींत कोणी बोलत आहे असें पाहून त्यानें दरवाजाच्या फटींतून आंत डोकावून पाहिलें. तों यशवंतजवळ प्रभाकर बसलेला !

प्रभाकरानें देशमुखवाडींत येणें म्हणजे सर्वांचा तो आश्चर्याचा विषय झाला होता. त्याला खोलींत बसलेला पाहून बाबुराव प्रथम दचकला परंतु त्याच्या तोंडचें एक वाक्य ऐकतांच तो मनाचा मोठा हिय्या करून तेथेंच उभा राहून आंत चाललेलें भाषण ऐकूं लागला.

" यशवंत, आजपासून मी अगदीं निष्काळजी झालों, " प्रभाकर आंत बोलत होता, " भाऊसाहेबांचे साडेतिनशें रुपये भरून मी त्यांच्या मगरमिठींतून आज कायमचा सुटलों. आमची आंबराई गट्ट करण्याकरितां त्यांनीं किती दीर्घ प्रयत्न केले परंतु शेवटीं त्यांचा सर्व बेत फसला. आज पैसे घेतांना त्यांच्या मनांत हेच विचार घोळत असतील असें मला वाटलें. असो—पण एकदांचा मी मोकळा झालों म्हणून मला किती आनंद झाला आहे म्हणून सांगूं !—बरं तर यशवंत मी आतां जातों. " असें म्हणून प्रभाकर उठला तें पाहून दरवाजाजवळ चोरासारखा उभा असलेल्या बाबुरावाची धांदल उडाली. तो चटकन् भाऊसाहेबांच्या खोलींत शिरला. परंतु त्या गडबडीनें त्याचा धक्का खोलीच्या दरवाजाला लागून तो मोठ्यानें वाजला. तेव्हां सहाजिकच जिज्ञासा होऊन बाहेर कोण आहे हें पाहण्याकरितां प्रभाकर पुढें झाला तेव्हां पलीकडच्या खोलींत घाईनें प्रवेश करीत असलेला बाबुराव त्याच्या दृष्टीस पडला; परंतु कांहींच न बोलतां यशवंतरावाचा निरोप घेऊन तो जिना उतरून खालीं गेला.

वत्सला ओटीवरच होती. मधून मधून ती आंत डोकावून पहात होती. ती कोणाची तरी वाट पहात असावी काय ?—होय. कारण ती पहा स्वतःशीं कांहीं पुटपुटत आहे !

" छे ! असं त्यांच्याकडून होईल असं नाहीं मला वाटत ! ही गोष्ट ते आईला कशी सांगतील ? ते आले आहेत, ते केवळ भाऊंना हप्त्याचे पैसे भरण्याकरितांच ! पण त्यांना आईजवळ बसलेले पाहून माझी किती पण भीतीनें गाळण उडाली ! माझ्या छातींत तर धस्स् झालें ! पण तसा जर कांहीं प्रकार असता तर ते नेहमीं सारखें हांसून मजशीं बोलले असते का ! कसं पण नेहमीं विनोदाचं बोलणं ! मला ते ' याहो—जाहो ' म्हणून मान देऊन बोलतात पण मला नाहीं तें पसंत !—पण माझ्या पत्राचा आशय त्यांना कळला असेल काय ? मी अगदीं मनाचा धडा करून थोडक्यांत सर्व उघड करून स्पष्ट लिहिलं आहे. मग त्यांनीं माझ्या पत्राचं कां बरं उत्तर पाठवूं नये ? आतां खालीं आल्यावर पहिलं तें विचारतें." अशा तऱ्हेनें तिचें पुटपुटणें चाललें आहे, तों प्रभाकर बाहेर आला. आपल्या पाळतीवर वत्सला असेल, अशी त्याला कल्पना देखील नव्हती. तो जोडे घालून ओटीच्या पायऱ्या उतरूं लागला, तेव्हां मागून वत्सला म्हणाली—

" अगदीं पाहयचं देखील नाहीं वाटतं ? "

" कोण--वत्सलाबाई ? " मागें वळून प्रभाकर म्हणाला.

" हें काय ? मला ' बाई-बाई ' काय म्हणतां ? इश्श गडे ! मला नाहीं हें आतां आवडत ! मी आतां ' बाई ' का आहें ? "

" नाहीं तर कोण बुवा अहांत ? "

" इश्श ! भलतंच कांहीं तरी बोलायचं झालं ! "

" भलतंच काय बोललों ? तुह्मी म्हणतां ' मी बाई नाहीं ' तेव्हां तुह्मी बुवा अहांत कीं काय, असा साहजिकच प्रश्न उद्भवला ! "

" जाऊं द्या मेलं तं ! पण मला सांगा, माझ्या सकाळच्या पत्राचं उत्तर कां नाहीं पाठविलं ? वेळ नाहीं का मिळाला ? "

" होय असं तर खरंच ! आज मी मोठ्या कामांत गुंतलों होतों. आज मी ऋण-मुक्त झालों."

" मग आतां तर झालांत ना मोकळे ? मग द्या तर माझ्या पत्राचें उत्तर ? "

" उत्तर !--पत्राचं उत्तर !--पण पत्रांत असे काय तुम्ही मला प्रश्न केले आहेत तर त्यांचें मी उत्तर देऊं ? "

" असं काय गडे ! –" असें म्हणून वत्सलेनें प्रभाकराचा हात धरला. त्याबरोबर अग्निस्पर्शाप्रमाणें त्याला भास झाला. तोंच ' वत्से, वत्से, ' हांका मारीत इंदुबाळ बाहेर आली. त्यामुळें वत्सलाबाईंचा सर्वच हिरमोड होऊन तिला प्रभाकराचा हात चटकन् सोडून देऊन तिच्याकडे वळावें लागलें.

" काय ग पाहिजे तुला इंदे ! "

" मला कांहीं नको. पण आत्या तुला मघांपासून जेवायला हाका मारते. चल—पण तें कोण गेलं ? प्रभाकर वाटतं ? हो—तोच ! कायग सांगत होता तो तुला ? "

" सांगत होता तुझं कपाळ ! पण तूं कशाला आलीस इथें ? " चिडून वत्सला म्हणाली.

तितक्या अवधींत प्रभाकर देशमुखवाडीचें मोठें फाटक ओलांडून हमरस्त्यावर गेला. आतां त्याचा जीव शांत झाला आणि भाऊसाहेबांचे सर्व हप्ते दिल्याबद्दल व वत्सलेच्या जवळून निसटायला मिळाल्याबद्दल, अशा दोन गोष्टींबद्दल त्याला जो आनंद झाला, तो आनंद तो फाटकाबाहेर येतांच त्यानें उच्चारलेल्या एका वाक्यावरून स्पष्ट होत होता—

" सुटलों बुवा एकदांचा ! "



# प्रकरण २३ वें.



## साडेतिनशें रुपये.





प्रभाकरानें यशवंताचा निरोप घेऊन तो उठतांच बाबुरावाची धांदल उडाली, ती हकीकत गेल्या प्रकरणांत वर्णन केलीच आहे. बाबुराव भाऊसाहेबांच्या खोलींत येऊन दरवाजाआड उभा राहिला. थोड्या वेळानें प्रभाकर जिना उतरून खालीं गेल्यावर त्याच्या जिवांत जीव आला. तेव्हां त्यानें सहज मागें वळून पाहिलें, तों त्याची दृष्टि भाऊसाहेबांच्या मेजावर गेली. त्याच्यावर कागद अस्ताव्यस्त पडले होते, तें पाहून बाबुराव पुढें झाला, तोंच मेजावर मध्यभागीं असलेली तिजोरी देखील उघडी असलेली त्याच्या दृष्टीस पडली.

जगांत कधीं न घडणारी गोष्ट म्हणजे भाऊसाहेबांची तिजोरी उघडी राहणें ही होय! त्यांनीं आजपर्यंत आपल्या अक्कलहुशारीनें आणि कर्तबगारीनें जें कांहीं मिळविलें होतें, तें सर्व त्या तिजोरींत होतें. तेव्हां ते त्या तिजोरीला कसें डोळ्यांत तेल घालून जपत असतील याची वाचकांनींच कल्पना करावी. नेहमींचा त्यांचा प्रघात म्हटला ह्मणजे तिजोरी बंद केल्यावर सतरादां ती बरोबर बंद झाली आहे किंवा नाहीं हें पहावयाचें! मग आजच असा कसा प्रकार घडला?–‘ आंबराई आपल्या हातून गेली आणि प्रभाकरानें आपणावर शह बसविला ’ ह्या विचारांनीं वृत्ति गोंधळून तिजोरी बंद करण्याचें विसरून ते खालीं गेले होते.

परंतु त्यामुळें झालें काय?–तिजोरी उघडी दिसतांच बाबुरावाच्या छातींत एक प्रकारचा धक्का बसून भलतेच विचार त्याच्या मनांत शिरले. आजच त्याला मधुकराचें पत्र आलें होतें, आणि त्याच्याकरितां तो पैशाच्या शोधांत होता. तेव्हां त्याला अनायासें ही एक सुसंधीच प्राप्त झाली म्हणायची! त्यानें मागला पुढला

विचार न करितां तिजोरी उघडण्याकरितां हात पुढें केला, तोंच मेजावर नोटांचें पुडकें त्यानें पाहिलें. त्याबरोबर त्यानें एखाद्या अधाशाप्रमाणें तें एकदम उचललें आणि आपल्या कोटाच्या आंतल्या खिशांत कोंबलें. नंतर त्यानें तिजोरीचा दरवाजा बंद केला. ती तिजोरी आपोआपच बंद व्हावी अशी तिची रचना केली होती. इतका प्रकार होईपर्यंत त्याच्या मनांत कांहीं एक विचार आला नाहीं. परंतु पुडकें खिशांत जाऊन बसल्यावर आपणास कोणी पाहिलें काय ? हा विचार त्याच्या मनांत येऊन त्यानें चटकन् मागें वळून दरवाजाकडे पाहिलें. परंतु तेथें कोण होते ? पलीकडच्या खोलींत यशवंत मात्र होता. आपणास कोणीं पाहिलें नाहीं, असें पाहून त्याचा टांगलेला जीव खालीं पाडला.

बाबुराव हळूंच पाय न वाजवितां बाहेर आला, तेव्हां दुसरा विचार त्याच्या डोक्यांत आला ' आतां ह्या नोटी पचवाव्या कशा ? ' ह्याच विचारांत हळू हळू जिना उतरून खालीं येत असतां एकदम त्याच्या डोक्यांत एक कल्पना शिरली; त्याबरोबर त्याला धीर येऊन तो जिना उतरतांच तडक स्वयंपाक घरांत गेला. त्यावेळीं दुर्गाताई ' तूं आतां हात धुवून वत्सलेला जेवायला पाठवून दे ' असें म्हणत इंदुबाळाच्या हातावर पाणी घालीत होती. कृष्णा जेवीत होती आणि पलीकडील देवघरांत भाऊसाहेब देवाला धुपारती करीत होते.

" ताई जरा इकडे ये. " बाबुरावानें दरवाजांतून दुर्गाताईला हांक मारिली.

" कायरे, बाबुराव काय आहे ? "

" ताई, आज प्रभाकर कशाला आला होता ? " ती जवळ आल्यावर हळूंच बाबुराव म्हणाला.

" तो आला होता हप्ते भरायला. कां ? "

क्षणभर बाबुराव स्तब्ध होता. नंतर तो म्हणाला, " ताई, मी आतां वर माडीवर एक विलक्षण प्रकार पाहिला. "

" काय—काय ? काय पाहिलंस तूं माडीवर ? "

" मी आतां खाणीवरून आलों आणि कपडे काढून ठेवण्याकरितां नेहमींप्रमाणें माडीवर गेलों. तेव्हां भाऊसाहेबांच्या तिजोरीच्या खोलींत कोणीं बोलत आहे, असा

मला भास झाला. मला प्रथम वाटलें, कीं भाऊसाहेब असतील ह्मणून मी तिकडे लक्ष न देतां जाऊं लागलों, तों यशवंताचा आवाज मला ऐकूं आला. तेव्हां मी हळूच पुढें होऊन दरवाजाच्या फटींतून पाहूं लागलों. तेथें भाऊसाहेबांच्या टेबलाजवळ यशवंत आणि प्रभाकर उभे ! यशवंत म्हणाला, माझा कोणी संशय घेतील तूंच ठेव तुझ्याजवळ ! तुझा कोणालाहि संशय येणार नाहीं.' हें यशवंताचें वाक्य मी ऐकलें, तेव्हां आंत जाऊन मी विचारणार होतों, पण काल मी प्रभाकराला चिडविलें होतें, तेव्हां तो कदाचित् माझ्या अंगावर हात टाकील असें मला वाटून मी आंत गेलों नाहीं. नंतर हळू हळू त्या दोघांच्या कांहीं गोष्टी झाल्या. पण त्या मला ऐकूं आल्या नाहींत मग प्रभाकर जाण्याकरितां निघाला. तेव्हां मी दुसऱ्या खोलींत गेलों आणि तो आतां खालीं उतरून गेल्यावर मी हा खालीं आलों, आणि प्रथम तुला हांक मारून तुझ्या कानावर मी पाहिलेला हा प्रकार घातला. ''

ही काय भानगड असावी, याचा दुर्गाताईला उलगडा होईना. ती बराच वेळ गप्प राहिली, तें पाहून बाबुराव पुढें म्हणाला. ''आणि ताई, येश्या छातींत दुखतें म्हणून नेहमीं बोलत असतो, तें देखील सर्व ढोंग आहे. काल रात्रीं त्यानें कसा फार्स केला तो पाहिलास ना ? आणि आतां पहा कसा प्रभाकराजवळ टुणटुणींत उभा आहे तो ! ह्या दोघांचीं फार खलबतें चालतात. नेहमीं ते एकमेकांला भेटतात. रोज त्यांच्या रात्रीं बैठकी होतात. पण आपणास त्या कळत नव्हत्या परंतु परवां भाऊसाहेबांनीं रात्रीं दरवाजा बंद करण्याची युक्ति काढतांच अशी त्यांचीं कारस्थानें आपोआप बाहेर आलीं. ह्या चार दिवसांत असे प्रसंग दोनदां झाले. तेव्हां भाऊसाहेब फार रागावतील म्हणूनच येश्यानें घरांत येण्याकरितां काल रात्रीं तो छातींत दुखण्याचा फार्स केला. ''

बाबुरावाचा हा युक्तिवाद दुर्गाताईला पटला. खऱ्या वस्तुस्थितीचा विपर्यास करून बाबुरावानें सर्व गोष्टी सोळा आणे जुळवून आपली बाजू निर्दोष करून ठेविली. दुर्गाताई पुढें कांहीं बोलणार होती. परंतु इतक्यांत भाऊसाहेब देवघरांतून जेवण्याकरितां आंत आले, तेव्हां त्यांना वाढण्याकरितां तिला आंत जावें लागलें.

" जा, तूं कपडे काढून जेवायला ये. मग सगळं आटोपल्यावर आपण त्याचा विचार करूं ! " असें म्हणून ताई आंत गेली.

बाबुराव कपडे काढण्याकरितां पुनः वर आला. खोलींत येतांच त्यानें प्रथम आपल्या खिशांतून नोटाचें पुडकें काढून पाहिलें. ती एकंदर रक्कम साडेतीनशें रुपयांची होती. आपणास अवश्यकता आहे त्यापेक्षां दीडशें रुपये जास्त आहेत, असें पाहून त्याला आनंद झाला. त्यानें कपडे काढून ते खुंटीवर टांगून ठेविले. परंतु एवढी मोठी रक्कम खिशांत ठेवावी किंवा नाहीं हा त्याला विचार पडला. आपल्या मागें कोणी येऊन खिशांत जर हात घातला तर सर्वच गोष्टी बाहेर येतील, तेव्हां आतां काय करावें ह्मणून तो इकडे तिकडे पाहूं लागला. परंतु नोटा लपवून ठेवण्यास त्याला सोईची जागाच दिसेना. शेवटीं तें पुडकें गादीच्या खालीं ठेऊन तो ह्मणाला, "उद्यांच्या उद्यां ह्या मधुकराकडे पाठवून देऊं ह्मणजे झालं!"

भाऊसाहेब जेवून वर आले. आज त्यांचें चित्त अस्वस्थ होतें. खोलींत आल्यावर त्यांनीं मेजावर पडलेले कागद व्यवस्थेनें खणांत ठेविले आणि शतपावली करीत खोलींत इकडे तिकडे ते फिरूं लागले. आज आपली साडेतिनशें रुपयांची चोरी झाली आहे याची त्यांना कल्पना देखील नव्हती.



# प्रकरण २४ वें.

## माधवराव वकील.



ती दुसऱ्या दिवशीं घडलेली गोष्ट ! सकाळीं नवाचा सुमार झाला होता. त्यावेळीं एक तरुण खाणीच्या गेटावर उभा राहिला. त्याच्या हातांत एक चामड्याची ब्याग असून पायांत बूट अंगांत हंटिंग कोट होता. धोतराला कास मारलेला, डोळ्यांला सोन्याच्या फ्रेमचा चष्मा आणि डोक्याला जरीचा सफेद रुमाल असा त्याचा पोशाख होता. ह्या एकंदर थाटावरून तो कोणी तरी पुण्याहून आलेला गृहस्थ असेल असें हरिभाऊ हजिरीमास्तरास वाटून तो पुढें झाला आणि ह्मणाला, " कोणाची चौकशी करतां आपण ? "

" देशमुखवाडी येथून किती लांब आहे ? "

" देशमुखवाडी येथून फार लांब आहे. कां बरं—आपणास तेथें जावयाचें आहे काय ?"

" होय. पण येथून एखादी गाडी मिळूं शकेल काय ? सकाळीं फक्त शहरांत येण्यापुरती मला गाडी मिळाली. गाडीवानास मी देशमुखवाडीपर्यंत चल, वाटेल तें भाडें देतों ह्मणून कबूल केलें, परंतु या मुसलमानलोकांचा कांहीं सण असल्यामुळें इतक्या लांब यावयास कोणीच कबूल होईना. "

" आज गाडी मिळणं मुष्किल आहे. आपणास पायींच जावं लागेल. पण आपण पुण्याहून आलां काय ? "

" होय—मी तेथून निघतांना चूक केली. नाहीं तर प्रभाकरराव सरदेसाई यांनीं माझ्याकरितां गाडीची व्यवस्था केली असती. "

हरिभाऊनें त्या गृहस्थास आंत नेऊन थोडा वेळ विश्रांति घ्यावयास सांगितलें. बोलतां बोलतां त्यांच्या गोष्टींत खाणीविषयीं गोष्टी निघाल्या. तेव्हां तो गृहस्थ ह्मणाला, " ही भाऊसाहेबांची खाण ! तेव्हां देशमुख म्हणतात, ते हे भाऊसाहेब कीं काय ? "

" होय. "

" पण काय हो, त्यांनीं म्हणे आपल्या मेहुण्याच्या मुलाचा वारसा बळकाविला असून त्या दोन मुलांचा अतिशय छल चालविला आहे ही गोष्ट खरी का ? "

" मी काय सांगूं ! मी त्यांचाच नोकर, तेव्हां मी त्यांच्या विरुद्ध काय बोलूं ! बाकी वस्तुस्थिति अशी आहे खरी ! "

" मग तुह्मी सर्वांनीं प्रयत्न करून त्या मुलांचे हक्क त्यांना परत मिळवून देण्याचा कां प्रयत्न करीत नाहीं ? "

" आह्मी गरीब–आह्मीं काय करणार ? आणि यदाकदाचित् आम्ही तसा प्रयत्न करीत आहोंत असं जर भाऊसाहेबांस कळलं तर ते आमचीं मुळं पार उकरून काढून आम्हाला रसातळाला किंहो पोंचवितील ! "

इतक्यांत खाणीवरील मुकादम व चार सहा मजूर कांहीं कामासंबंधानें विचारपूस करण्याकरितां गेटावर आले परंतु कोणी गृहस्थ हजिरीमास्तराजवळ बसलेला आहे असें पाहून ती मंडळी दरवाजाजवळ उभी राहिली तेव्हां त्यांच्याकडे पहात पहात त्या गृहस्थानें हरीभाऊच्या प्रश्नाला उत्तर दिलें, " तुह्मी भाऊसाहेबांचे आश्रित म्हणून तुम्हाला तशी भीति वाटणें साहजिक आहे. परंतु मी तुह्माला असं विचारतों कीं, जर कोणी मनुष्य त्या मुलांच्या वतीनें उभा राहिला तर तुम्ही मंडळी त्याला सहाय्य कराल काय ? "

" हो हो. असा जर कोण हरीचा लाल पुढें येईल तर खाणींतील एकून एक मजूर भाऊसाहेबांच्या विरुद्ध साक्ष देईल. " असें म्हणून हजिरीमास्तर दरवाजांत उभे असलेल्या मजुराकडे पाहून म्हणाला, " कायरे पिऱ्या, भाऊसाहेबांनीं ही देशमुखवाडी अन्यायानें बळकाविली आणि ते यशवंतरावांना अतिशय छळतात असं तुम्ही वेळ आली तर सांगाल काय ? "

" हो हो. सांगाल ह्मजी काय ? खऱ्यास कुठं मरण हाय ?

पुढें थोडा वेळ त्यांच्या गोष्टी झाल्यावर तो गृहस्थ उठला आणि हरिभाऊनें दाखविलेल्या जवळच्या रस्त्यानें जाण्यास निघाला. तो गेल्यावर पिऱ्यानें " तो कोण ? " ह्मणून हजिरीमास्तरास विचारिलें तेव्हां हरिभाऊ म्हणाला, " तो कोण आहे तें मला नाहीं माहित ? पण तो पुण्याचा कोणी तरी मोठा वकील आहे असं वाटतं ! कारण तो एक एक प्रश्न फारच खुबीदार विचारीत होता. त्याच्या एकंदर बोलण्यावरून तो

यशवंतरावांना त्यांची देशमुखवाडी परत मिळवून देण्याकरितां येथें आला असावा असं दिसतं ! ”

हरिभाऊमास्तराच्या तर्कानें सर्व खाणींत निराळ्याच गोष्टी सुरू झाल्या. पिऱ्या आणि त्याचे मजूर ह्या चालत्याबोलत्या टेलिफोनांनीं ‘ यशवंतरावांच्या वतीनें भाऊसाहेबा-बरोबर भांडण्याकरितां एक मोठा वकील पुण्याहून आला आहे ’ ही बातमी सर्व खाणींत सर्वतोमुखीं झाली !

इकडे अकरा साडेअकराच्या सुमारास तो गृहस्थ प्रभाकराचा शोध करीत आंबराईत आला. त्यावेळीं प्रभाकर नुकताच जेवून देशमुखवाडीचा रखवालदार म्हातारा रायबा याच्याबरोबर बोलत ओटीवर बसला होता. आंबराईतील झाडांवरून फळें उतरविलीं म्हणजे रायबा आंबराईत येत असे. त्याला पांच दहा नारळ, पांच पन्नास सुपाऱ्या आणि कांहीं आंबे ते देत असत. आणि हा परिपाठ दाजीबापासून चालत आलेला होता. कारण देशमुखावाडींतील रायबा हा अगदीं जुना आणि विश्वासू नोकर होता. प्रभाकरहि त्याला फार चहात असे त्यानें भाऊसाहेबांचे सर्व हप्ते भरले ही गोष्ट जेव्हां रायबाला कळली, तेव्हां त्याला अत्यानंद झाला.

“ प्रभाकरराव, सुटलांत बुवा तुह्मी त्या भाऊसाहेबांच्या तावडींतून ? तसेंच एकदां यशवंतराव सुटले ह्मणजे मला आनंद होईल. ”

“ अरे ? माधवराव माने आले वाटतं ! ” आंबराईच्या मोठ्या दरवाजांतून आंत येत असलेल्या गृहस्थांकडे नजर जातांच प्रभाकर आश्चर्यानें म्हणाला, ‘ या–या तुह्मी माधवराव ? अगदीं अलभ्यलाभ म्हणायचा ? ”

“ आलों–आलों. पण पक्की अद्दल घडली बुवा ! तुमच्या येथें येईपर्यंत पायाचे सांधे ढील झाले प्रभाकरराव ? ”

“ कां–टांगा नाहीं मिळाला ?–होय, पण आज टांगा नाहींच मिळायचा ! पण माधवराव, मला प्रथम पत्र लिहावयाचें होतें कीं नाहीं म्हणजे मी गाडीची व्यवस्था केली असती. ”

“ मी आलों होतों मुंबईस कांहीं कामाकरितां, तेव्हां विचार केला कीं, तुह्मी पुण्यास आलां होतां, त्यावेळीं फार आग्रह केला होता आणि मलाही बोटीचा प्रवास कसा असतो तो अनुभवायचा होता, तेव्हां म्हटलं चला प्रभाकररावांच्या येथें जंजिऱ्यास जाऊं ! ”

माधवराव माने हे पुण्याचे राहणार. मध्यंतरी मधुकराचा शोध करण्याकरितां प्रभाक पुण्यास गेला होता, त्यावेळीं त्यांची ओळख झाली होती. माधवराव हे वकिलीच अभ्यास करीत होते. पुण्यास दोन तीन दिवस असतांना ' तुझी घाटावर राहणार माणसं, तुझाला बोटीचा प्रवास कसा असतो तो माहित नाहीं; तर एकदां तुझी आम च्या गावीं या,' असा प्रभाकरानें त्यांस आग्रह केला होता. त्याप्रमाणें हे होतकरू वकी माधवराव आज प्रभाकराकडे आले. प्रभाकरानें त्यांचें योग्य स्वागत करून आपण आं उठून गेला आणि मल्हारीला हांक मारून स्नानाच्या पाण्याची व्यवस्था करावयास सांगि तलें. त्याचप्रमाणें आई आणि आका यांस आपणाकडे पुण्याहून पाहुणे आले आहेत करितां त्यांच्या जेवणाची वर्दीहि दिली. प्रभाकर आंत उठून आल्यावर बाहेर ओटीव माधवराव आणि झातारा रायबा राहिले. माधवरावांचा स्वभाव फार बोलका असल्य मुळें त्यांनीं रायबाला पहिला प्रश्न केला, " काय पाटील, यंदां पिकपाणी क आहे ? तुमचीं किती शेतें आहेत ? आहेत का पोटापुरतीं ! "

" रावसाहेब माझीं गरिबाचीं कुठलीं आलीं खेतें ! मी भाऊसाहेबांच्या येथें दे डीवर असतों. देतात पोटापुरतं झालं ! "

" हे भाऊसाहेब म्हणजे त्या यशवंतरावाची इस्टेट आपल्या घशाखालीं उतरवि तेच ना हे भाऊसाहेब ! "

" होय होय रावसाहेब. तेच हे भाऊसाहेब. "

इतक्यांत गणबा तेथें आला. आणि त्याच्या जवळ बसला.

" मग असं जर आहे तर तुम्ही हा अन्याय होऊं दिला कसा ? एक सरकार अर्ज दिलात म्हणजे सर्व गोष्टी व्यवस्थेशीर होतील. " माधवराव म्हणाले.

" होतील पण एवढी छाती करून पुढें कोण होणार ? आणि आपल्या विरुद्ध को गडबड करतो आहे, असं जर भाऊसाहेबांस कळलं तर ते त्याला वाटेल तें क हाणून पाडतील. काय गणबा, मी म्हणतो तें खरं ना ? "

" त्यांत काय संशय ! सर्व पुरेल पण भाऊसाहेबांशीं प्रसंग नको ! "

" पण मी म्हणतों, असा जर कोणी प्रयत्न केला तर तुम्ही त्याला कांहीं म कराल काय ? " माधवरावांनीं विचारलें.

" वाटेल ती मदत करूं.—"

" काय रायबा, कसली ऐवढी मदत करायला तयार झालांत ? " प्रभाकर बाहेर येऊन म्हणाला.

" हे रावसाहेब म्हणतात, कीं यशवंतरावांच्या बाबतींत भाऊसाहेबांनीं जो नीचपणा केला आहे, त्याविरुद्ध कोणी उभें राहील तर त्याला मदत कराल काय ? "

" मग काय तुम्ही मदत कराल म्हणतां ? "

"हो हो कराल म्हणजे काय ? मी तर सर्वांच्या पुढें उभा राहून सरकाराला सांगेन."

" पहा बरं रायबा, मग शब्द मागें घ्याल ! " असें म्हणून प्रभाकर थट्टेनें पुढें म्हणाला, " हें पहा रायबा, हे माधवराव पुण्याचे मोठे वकील आहेत; आणि ते मुद्दाम ह्याच कामाकरितां येथें आले आहेत. तेव्हां आतां सर्व माहिती गोळा करून ते यशवंताच्या वतीनें भाऊसाहेबांबरोबर भांडणार आहेत. म्हणून ह्मणतों, तुमची आहेना तयारी त्यांना मदत करण्याची ? "

" अहो, आहे म्हणून काय विचारतां ? खरं सांगायला कोणाच्या बापाची चोरी आहे ! "

परंतु प्रभाकरानें केलेल्या थट्टेच्या भाषणाचा परिणाम फारच चमत्कारिक झाला. त्यानें माधवरावास स्नानाकरितां घरांत नेल्यावर रायबा आणि गणबा उठले आणि आपापल्या घरीं जाण्याकरितां निघाले. वाटेंत त्यांच्या त्याच गोष्टी चालल्या होत्या. ते दोघेजण बोलत बोलत देशमुखवाडीच्या मोठ्या फाटकाजवळ आले. त्यावेळीं फाटकाआड भाऊसाहेब खाणीवर जाण्याकरितां घोड्याची वाट पहात उभे होते त्यांच्या कानीं रायबानें जोरांत उच्चारलेलें पुढील वाक्य पडलें.

" आणि भाऊसाहेबांचं काय चालणार आहे ? त्यांनीं ही सर्व फसवाफसवी केली आहे असं एखादं लहान मूलहि सांगेल ! "

" कायरे रायबा, काय मीं फसवाफसवी केली ?" भाऊसाहेबांनीं पुढें होऊन विचारलें.

भाऊसाहेबांस पाहून रायबा थोडा चपापला.परंतु तो भाऊसाहेबांना इतरांसारखा इतका वचकून नव्हता. तोहि तितक्याच धिटाईनें पुढें होऊन म्हणाला, " खरं होतं तें सांगितलं ! त्यांत काय कोणाची चोरी आहे का कोणी फांसावर देतो ? "

" काय खरं होतं तें सांगितलंस ? मी फसवाफसवी केली, कोणाची फसवाफसवी केली ? आणि हें तुला विचारायाला आलं होतं कोण ? "

" ते आले आहेत पुण्याचे मोठे वकील ! यशवंतराव देशमुखवाडीचा खरा वारस आहे म्हणून ते आतां तुमच्याबरोबर सरकारदरबार करणार आहेत. "

एकदम भाऊसाहेबांचा चेहरा उतरला !

" कोण आले आहेत ?—वकील ! "

" होय. ते मोठे वकील आहेत आणि तुम्ही ही देशमुखवाडी अन्यायानें मिळविली आहे आणि यशवंताचा फार छळ करतां ह्मणून ते वकिलसाहेब मुद्दाम पुण्याहून आले आहेत. "

" जा—अशा कुत्र्यांना मी भीक घालीत नाहीं ! " असें मोठ्या दमानें बोलून रामजीनें आणलेल्या घोड्यावर ते स्वार होऊन खाणीवर जाण्याकरितां निघाले. परंतु तो त्यांचा दम खाणीवर येईपर्यंत टिकला काय हा प्रश्न आहे ?—टिकला परंतु तो लवकरच गळला ! कारण गेटावर घोडा सोडून ते खाणींत देखरेख करण्याकरितां गेले तेव्हां बरेच मजूर एकत्र जमून कांहीं गोष्टी करीत असलेले त्यांच्या नजरेस पडले. वास्तविक भाऊसाहेब खाणींत पाय ठेवतांच प्रत्येक मजूर आपापल्या कामांत चूर असलेला दिसायचा ! कारण भाऊसाहेबांची नजरच तशी करडी होती ! परंतु आज त्या मजुरांना गप्पा मारीत एकत्र उभे असलेले पाहून ते रागानें म्हणाले, " कायरे ए, गाढवाच्या लेकांनो ! आज काम नाहीं वाटतं तुम्हाला ! चकाट्या पिटीत उभे आहांत... तुम्हाला शरम नाहीं वाटतं ? थांबा–आज सगळ्यांचा खाडा मांडायला सांगतों. जारे, त्या हरीभाऊला बोलावून घेऊन ये. मांड म्हणावं ह्या सर्वांचा खाडा. "

भाऊसाहेब कातावलेले पाहून पिऱ्या मुकादम पुढें झाला, आणि म्हणाला, " भाऊसाहेब, तुम्ही रागावूं नका ! आम्ही कांहीं व्यर्थ चकाट्या पिटीत नव्हतों. "

" मला शिकवतोस काय ? मी प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलं तरी खोटं बोलतोस ? "

" त्या चकाट्या नव्हत भाऊसाहेब ! तो एक मोठा वकील आला होता. आणि म्हणाला, तुम्ही सर्व भाऊसाहेबांच्या विरुद्ध साक्ष द्या. म्हणून आम्हाला विचार पडला आहे. "

इतक्यांत हरीभाऊ तेथें आला, त्याच्याकडे वळून भाऊसाहेब म्हणाले, " कायरे हरिभाऊ, हा पिऱ्या काय म्हणतो ? कोण आला होता वकील येथें ? "

"होय कोणी एक वकील सकाळीं येथें आला होता आणि तो चौकशी करीत होता."

" काय करीत होता चौकशी ? "

" ही सर्व देशमुखांची वतनवाडी भाऊसाहेबांनीं अन्यायानें बळकाविली असून ते यशवंतरावाचा फार छळ करतात. "

"वरं बरं ! फार शहाणा होऊं नकोस ! तुला कोणीं सांगितलं होतं ह्या गोष्टी बोलायला ?"

"मी नाहीं बोललों भाऊसाहेब. तो वकील म्हणत होता तें मीं आपण विचारलं म्हणून सांगितलें !"

"जा—चालता हो आपल्या कामाला ! आणि पुनः जर कोणी ह्या अशा मूर्खा-सारख्या गोष्टी केल्या तर संभाळून रहा. चला—व्हा चालते आपल्या कामावर ?"

भाऊसाहेब गेटावर येऊन काम करीत बसले परंतु त्याचें कामावर लक्ष लागेना. 'खाई त्याला खवखवें !' त्यांची अगदीं त्रेधा उडाली. घरून बाहेर पडतांच पहिला रिपोर्ट रायबानें दिला, त्याकडे दुर्लक्ष केलें तों येथेंहि तोच प्रकार ! आज बऱ्याच दिवसांपासून त्यांना प्रभाकराचा सशंय येत होता. तो आणि यशवंत मिळून आपल्या विरुद्ध कांहीं तरी कारस्थान करीत आहेत अशी त्यांची दृढ समजूत झाली होती. त्यांतून आज हें वकिलाचें प्रकरण त्यांनीं नवीन ऐकलें. त्यांना मोठा विचार पडला. हा वकील कोण असावा ? तो येथें का आला ? त्याला कोणीं बोलाविलें ? त्याला ह्या उठाठेवी करण्याचें कारण काय ? आपल्या विरुद्ध हीं सर्व सूत्रें कोण हालवितो ? वगैरे अनेक प्रश्न त्यांच्या डोक्यांत येऊन गेले. परंतु एकाहि प्रश्नाचा त्यांना उलगडा होईना. तेव्हां त्यांनीं पुनः हरिभाऊला हांक मारिली आणि विचारलें, "कायरे हरिभाऊ, तो वकील आला होता तो तूं स्वतः पाहिलास का ?"

"हो, तो येथेंच—ह्या खुर्चीवर बसून विचारपूस करीत होता."

"त्याला कोणी आणला आहे येथें ?"

"तें नाहीं मला ठाऊक ! पण त्यानें प्रभाकराचें नांव घेतलें."

"मला वाटलंच तें ! तोच चांडाळ मोठा कारस्थानी आहे !"

भाऊसाहेबांचें मन फारच अस्वस्थ झालें. प्रभाकराचा आतां त्यांना पक्का संशय आला. आपणाकडून देशमुखवाडी हिरावून घेण्याकरितां त्याचीच ही सर्व खटपट आहे असें त्यांना वाटलें. आज इतकीं वर्षें आपण देशमुखवाडीचा उपभोग घेऊन—नव्हे मालकी गाजवून आतां ती आपल्या हातून जाणार हा विचार मनांत येतांच त्यांचा जीव घाबरा-घाबरा झाला. वाटेल तें होवो, पण देशमुखवाडी हातची जाऊं द्यावयाची नाहीं, त्याकरितां आपणास वाटेल तें करावें लागलें तरी करावयाचें असा त्यांनीं तात्काळ निश्चय केला.

किंचित्काल त्यांना स्वस्थता वाटली. परंतु पुनः विचारांची सुरवात झाली. देशमु-खवाडी हातची जाऊं द्यावयाची नाहीं असा निश्चय करून 'आ' पसरून पुढें अस-

लेलें संकट थोडेंच दूर होणार आहे ? प्रभाकरानें यशवंताच्या वतीनें आणलेल्या वकिलानें सरकार दरबारांत यशवंत हा देशमुखवाडीचा खरा वारस असें ठरविलें तर ?—तर सर्वच गोंधळ ! हा गोंधळाचा विचार त्यांच्या डोक्यांत येतांच त्यांच्या सर्व विचारांचा एकच गोंधळ उडाला ! ' आपण ह्यापूर्वीच यशवंताचा कांटा काढून टाकला असता म्हणजे आतां आपण निर्भय असतो पण आतां काय ? आतां जर आपण त्याला दूर केलें तर—तर सर्वच गोष्टी येथल्या येथें मिटतील ' हा एक विचार त्यांच्या डोक्यांत आला. आणि थोड्या विचाराअंतीं हीच गोष्ट त्यांना संकटमुक्त होण्यास बिनतोड आहे, असें वाटूं लागलें. पुष्कळ विचार केला, संध्याकाळ झाली परंतु आपल्या मार्गांतील कांटा दूर करण्यास दुसरा एखादा सुलभ उपाय त्यांना सुचेना.

संध्याकाळ झाली. भाऊसाहेब एखाद्या भ्रमिष्टासारखे उठले आणि घरीं जाण्याकरितां निघाले. एका नोकरानें त्यांचा घोडा पाणी पाजून गेटजवळ आणून उभा केला. भाऊसाहेब बाहेर आले, इतक्यांत समोरून बाबुराव तट्टावर बसून येतांना त्यांना दिसला तेव्हां ते पुढें झाले आणि बाबुराव जवळ आल्यावर म्हणाले, " कायरे बाबुराव कुठें गेला होतास ? "

" शहरांत. ही सुरुंगाची दारू संपली होती ती आणण्याकरितां गेलों होतों. " बाबुराव सुरुंगाची दारू आणण्याकरितां शहरांत गेला होता परंतु शहरांत जाण्याचा त्याचा मुख्य उद्देश निराळाच होता. आज त्याचें पोष्ट कचेरींत मोठें काम होतें आणि उद्यांहि त्याला पोष्ट कचेरींत जावयाचें होतें. आज त्यानें शंभराच्या दोन नोटा रजिष्टर पाकिटानें मधुकराच्या नांवें पुण्यास पाठविल्या आणि उद्यांहि बाकी राहिलेल्या दीडशें रुपयांच्या नोटा त्याला पाठवावयाच्या होत्या.

बाबुरावानें शहरांत जाण्याचें योग्य कारण सांगितल्यावर भाऊसाहेब कांहीं बोलले नाहींत. ते आपल्या घोड्यावर स्वार होऊन निघाले. तोंच त्यांच्या डोक्यांत एक विचार आला. सुरुंगाची दारू आज आणिली आहे, तेव्हां आपल्या मार्गांतील कांटा दूर करण्यास आपणास त्या दारूचा कांहीं उपयोग करतां येईल काय ? याचा ते विचार करूं लागले. शेवटीं त्यांना युक्ति सुचली. त्याबरोबर त्यांनीं घोड्याला चाबुक हाणला. आणि त्याबरोबरच त्यांच्या मुखांतून खालील उद्गार बाहेर पडले.

" त्याला एकट्यालाच देतों पाठवून आंत आणि देतों एकदम सुरुंग उडवून झालं ! "

# प्रकरण २५ वें.



## सुरुंगाचा भडका.





वरील गोष्टीला दोन दिवस झाले. तितक्या अवधींत ' पुण्याचे एक मोठे वकील आले आहेत आणि ते यशवंताच्या वतीनें भाऊसाहेबां-बरोबर भांडणार आहेत ' ही गोष्ट लहानापासून थोरांच्या तोंडीं झाली. परंतु पहिल्या दिवसाप्रमाणें भाऊसाहेबांच्या तोंडावर मात्र कोणीहि ह्या गोष्टीचा उच्चार केला नाहीं. तथापि लोकमत काय आहे, याची भाऊसाहेबांना चांगली कल्पना होती. गेले दोन दिवस ते एका मोठ्या विचारांत गढले होते. त्यांच्या वर्तनांतहि असा कांहीं चमत्कारिक फरक पडला होता कीं, घरांतील प्रत्येक व्यक्तीला त्याचें आश्चर्य वाटत होतें. गांवांत प्रभाकराच्या घरीं कोणी एक मोठा वकील आला आहे, ही गोष्ट सर्वांबरोबर सगुणाबाईला आणि यशवंता-लाहि कळली होती. त्याची प्रकृति आतां पुष्कळ सुधारली होती. दुसऱ्याच दिवशीं तो खालीं येऊं लागला. तिसऱ्या दिवशीं म्हणजे आज त्याला पूर्वीप्रमाणें हुशारी वाटत होती. त्याच्या प्रकृतींत जी मोठी गोम होती ती हीच कीं, त्याला चांगली विश्रांति पाहिजे होती. त्याप्रमाणें तीन दिवस त्याला पूर्ण विश्रांति मिळाली, तेव्हां त्याला साह-जिकच आराम पडला. अशीच पूर्वी त्याला आणखी कांहीं दिवस विश्रांतीची आवश्यकता होती, पण भाऊसाहेबांनीं ती त्याला घेऊं दिली नाहीं. परंतु आज दोन दिवस ते यशवंताची दिवसांतून पन्नास वेळा चौकशी करीत होते आणि त्यामुळें घरांतील सर्वांचा तो आश्चर्याचा विषय बनला होता.

परंतु ह्या चौकशीच्या मुळाशीं काय होतें ? भाऊसाहेबांचें पूर्वीचें कठोर मन बदलून आतां तें मृदु बनलें होतें काय ?—नाहीं. प्रभाकराच्या घरीं वकील आला आहे, त्याअर्थी चौकशी करण्याकरितां किंवा इतर कांहीं माहिती मिळविण्याकरितां यशवंताची भेट

घेण्यास तो उत्सुक झाला असेल असें गृहित धरून यशवंताची आणि प्रभाकराची भेट होऊं नये ह्मणूनच ते यशवंतावर डोळ्यांत तेल घालून पाळत ठेवित होते.

आपण सहज थट्टेनें रायबाजवळ बोललेल्या गोष्टीचें पर्यवसान इतकें चमत्कारिक झालें असेल, अशी प्रभाकराला कल्पना देखील नव्हती. नाहीं म्हणायला, दुसऱ्या दिवशीं जेव्हां जो तो त्याला ' काय प्रभाकर, ही गोष्ट खरी का ?—तुमच्या घरीं पुण्याचे एक मोठे नामांकित वकील आले आहेत ? आणि ते असें करणार आहेत ' असे प्रश्न विचारूं लागला, तेव्हां त्याला आपण केलेल्या थट्टेचा असा परिणाम झाला आहे असें कळलें आणि मोठी मौज वाटली. व तोहि उत्तरादाखल होच म्हणत होता.

प्रभाकराला थट्टा वाटत होती परंतु इकडे भाऊसाहेबाच्या जिवाला विंचू सारख्या नांग्या मारीत होते. दोन दिवस त्यांच्या डोक्यांत एक भयंकर विचार खेळत होता. आणि त्या विचाराची अम्मलबजावणी ते आज करणार होते.

दुपारीं तिहींचा सुमार झाला होता. भाऊसाहेब यशवंताजवळ जाऊन म्हणाले, " यशवंत, आज दोन तीन दिवस झाले, घरांतल्या घरांत तुला अगदीं कंटाळा आला असेल नाहीं ? चल येत असलास तर आपण खाणीवर जाऊं म्हणजे तुला बाहेरची मोकळी हवा मिळेल. आणि काल शास्त्रीबुवांनींही असंच सांगितलं आहे, कीं, तूं जितकी मोकळी हवा घेशील तितका तूं लवकर बरा होशील, तर चल—तयार हो. मी गाडी जोडण्यास सांगितलं आहे. "

भाऊसाहेबांनीं इतकें प्रेम आणि आस्था दाखविलेली पाहून यशवंताला गहिंवरून आलें. आतां आपणाविषयीं भाऊसाहेबांचें मन साफ बदललें असें त्याला वाटूं लागलें. तो उठला आणि कपडे करून बाहेर आला. थोड्या वेळानें तो आणि भाऊसाहेब गाडींत येऊन बसले. आपला पति यशवंताला इतक्या प्रेमानें वागवूं लागला हें पाहून सगुणाबाई-लाहि मोठें समाधान वाटूं लागलें. ते दोघे गाडींत बसत असतां सगुणाबाई आपल्या खिडकींतून पहात होती. त्यावेळीं तिच्या डोक्यांत एक विचार घोळत होता. आणि तो विचार ह्मणजे आपल्या पतीच्या वर्तनांत असा अकल्पित फरक कसा पडला हा होय. पुष्कळ विचार केल्यावर तिला असें वाटूं लागलें कीं, प्रभाकराकडे आलेला वकील ह्या सर्व स्थित्यंतराला कारण असेल. कारण आपण यशवंताला फार प्रेमानें वागवितों, आणि

लोकांनीं पिकविलेल्या कंड्या साफ खोट्या आहेत, हेंच सिद्ध करण्याचा आपल्या पतीच्या वर्तनाचा उद्देश असावा, असें आतां तिला वाटूं लागलें. कृष्णीलाहि तसाच आनंद झाला होता. भाऊसाहेब आपल्या भावाला इतक्या प्रेमानें वागवीत असलेले पाहून तिला कां बरें आनंद होणार नाहीं ?

परंतु भाऊसाहेबांच्या ह्या प्रेमानें वागण्यांत सत्यांश किती होता, तोच आपणास पहावयाचा आहे. तर वाचकहो ! चला–आपण सर्वजण त्यांच्या गाडीबरोबर खाणीवर जाऊं.

साडेचारांच्या सुमारास त्यांची गाडी गेटावर आली. यजमान आलेले पाहतांच हरिभाऊ बाहेर आला. त्याला भाऊसाहेब म्हणाले, " कायरे हरिभाऊ, मी काल सांगून पाठविल्याप्रमाणें केली का सर्व व्यवस्था ? "

" होय. दहाहि सुरुंग ठांसून वात लावून तयार आहेत. पिऱ्या आपण येणार म्हणून खोटी आहे. "

भाऊसाहेब गाडींतून उतरून खाणीकडे जावयास निघाले. यशवंतहि खालीं उतरून हरिभाऊबरोबर बोलत उभा राहिला. भाऊसाहेब दूर गेले असें पाहून हरिभाऊ त्याला म्हणाला, " कायहो यशवंतराव, तुह्मांला तर ती गोष्ट कळलीच असेल !–म्हणे तुमच्या वतीनें पुण्याचा एक बडा वकील भाऊसाहेबांबरोबर भांडण्याकरितां येथें मुद्दाम आला आहे. आणि तो प्रभाकररावाकडे उतरला आहे. "

" होय. मी अशी गोष्ट ऐकतों खरी ! पण त्यांत कितपत खरेपणा आहे तो ईश्वराला माहित ! तुम्हाला त्यांतील काय माहिती आहे सांगा पाहूं ? "

हरिभाऊनें प्रथमपासून हकीकत सांगण्यास सुरवात केली. पण त्याच्या सांगण्यांत खऱ्या वस्तुस्थितीचा विपर्यास केलेला असून ' पराचा कावळा ' केलेला होता. त्यांच्या गोष्टी चालल्या असतां समोरून भाऊसाहेब आणि त्यांच्यामागून पिऱ्या येतांना त्यांना दिसला. तेव्हां हरिभाऊ आंत निघून गेला. थोड्या वेळानें पिऱ्याला मागें बऱ्याच अंतरावर उभा करून भाऊसाहेब पुढें आले आणि म्हणाले, " यशवंत, गाडींतून तूं उतरलास आणि येथेंच काय करतोस ? थोडें फिरल्याशिवाय तुझे पाय कसे मोकळे होतील ?–हो पण इकडे ये. असा खाणीपर्यंत जा पाहूं म्हणजे तुझें चालणेंहि होईल; आणि हें

पहा, आज दहा सुरुंग एकदम पेटवावयाचे आहेत. तेव्हां सर्व मजूर खाणीबाहेर आले आहेत किंवा नाहींत, हेंहि पाहून ये. जा." यशवंत जाऊं लागला. तेव्हां त्याला पुनः हांक मारून भाऊसाहेब पुढें म्हणाले, " आणि हें पहा, तूं स्वतः आंत उतरून—खाणींत खालीं उतरून स्वतः पहा. नाहीं तर चुकून एखादा अजागळ आंत राहील. काय समजलास ?–तूं स्वतः सर्व ठिकाणीं हाक मारून खात्री करून घे हो ! नाहीं तर वरच उभा राहून हाका मारशील, तर तसं नको करूं. जा." असें म्हणून भाऊसाहेब आंत जाऊन बसले आणि मेजावर असलेले कागद चाळूं लागले. यशवंताला जाऊन दहा मिनिटें झालीं. आतां तो खाणींत गेला असेल असें समजून ते एकदम म्हणाले, " अरे, तो पिऱ्या कुठें आहे ? काय मूर्ख आहे हा—"

" हा मी हिकडेच आहे नव्ह का भाऊसाहेब ! "

" अरे गाढवा ! इकडे उभा राहून काय करतोस ! मी मघांपासून समजत होतों कीं तूं इतक्या वेळांत सुरुंग पेटविले असशील. पण तूं कसला अजागळ ! इकडेच उभा राहिलास काय ? जा–जा, तोंड काय पाहतोस ! दोन मिनिटांच्या आंत सुरुंग पेटले पाहिजेत. दोहोंचीं तीन मिनिटें झालीं तर सांभाळ–"

इतकी पुष्पांजलि मिळतांच हातांतील तोडा पेटवीत पिऱ्या धांवत निघाला. आजचा प्रत्येक सुरुंग त्यानें भाऊसाहेबांच्या हुकुमाप्रमाणें चांगला ठांसून डब्बल भरला होता आणि त्या सर्व सुरुंगांची एकच वात करून ती खाणीच्या वर बरीच दूरवर आणून ठेविली होती. पिऱ्या त्या जागेजवळ येतांच मोठ्यानें ओरडून म्हणाला, " तोडा लावलारे लावला ! हुश्शार रहा–सांभाळा ! "

पिऱ्यानें वातीला तोडा लावतांच तीं एकदम पेटली आणि जळत जळत सर्पासारखी पुढें जाऊं लागली. पिऱ्याहि तेथून पळत सुटला आणि दूर अंतरावर खाणींतील सर्व मजूर एकत्र जमून उभे होते त्या बाजूला जाऊं लागला. इतक्यांत भाऊसाहेब मोठमोठ्यानें ओरडत धांवत सुटले.

" अरे पिऱ्या, थांब–थांब ! यशवंत कुठें आहे ? थांब–तोडा नको लावूं ! "

ही भाऊसाहेबांची ओरड ऐकतांच प्रत्येकाच्या हृदयाचें पाणी झालें. पिऱ्या तसाच मागें फिरला आणि तितक्याच मोठ्या स्वरानें ओरडून म्हणाला, " यशवंतराव कुठें आहेत ?–सांगा–सांगा लवकर. मी वात पेटविली आहे, सांगा लवकर— "

" अरे तो खाणींत गेला आहे ना ! "

हें भाऊसाहेबांचें वाक्य ऐकतांच एखाद्या तिरासारखा वात विझविण्याकरितां पिन्या मागें धांवत सुटला. परंतु काय ?–तो अर्ध्या वाटेंत गेला नाहीं तोंच ' धुड्डम् !' असा कानठाळ्या बसविणारा भयंकर आवाज झाला !

एकदम दहाहि सुरुंग पेटून त्यांचा एकच स्फोट झाला. त्या धडाक्याबरोबर मोठ-मोठ्या शिला खाणीच्या वर येऊन धडाधड पडल्या. क्षणभर आसपासची जमीन देखील हादंळली. सर्व खाण धुरानें भरून तेथें एक प्रचंड ढग दिसूं लागला. थोड्या वेळानें सर्वत्र शांतता झाली !

पण यशवंत कुठें आहे ?

सर्वत्र शोधाशोध सुरू झाली ! पण यशवंताचा कांहीं पत्ता लागेना ! सर्वांच्या तोंडचें पाणी पळालें ! परंतु भाऊसाहेबाची काय स्थिति होती ? ते देखील यशवंताचा शोध लागत नाहीं म्हणून दुःखानें ऊर बडवून घेत होते काय ? वाचक हो ! त्यांच्या चेहऱ्याकडे नीट न्याहाळून पहा. तें पहा–त्यांच्या चर्येवर राक्षसी हास्य चकमत आहे. आणि थांबा ! ते स्वतःशीं काय पुटपुटतात तें ऐका—

" बरोबर गोळी लागली ! माझा प्रतिस्पर्धी जगांतून नाहींसा झाला ! ! आतां मी निर्भय झालों ! ! ! "



# प्रकरण २६ वें.

## यशवंत कुठें आहे?



त्या वेळीं देशमुखवाडींत काय प्रकार चालला होता तो आपण पाहूं. भाऊसाहेब यशवंताला बरोबर घेऊन खाणीवर गेल्यानंतर थोड्या वेळानें बाबुराव घरीं आला. आज त्याला एक प्रकारचा विशेष आनंद झालेला दिसत होता. आणि असा आनंद होण्यास कारणहि तसेंच मोठें होतें. त्याला नुकतेंच पुण्याहुन मधुकराचें पत्र आलें होतें आणि त्या पत्रांत 'दोनशें रुपये पावले आणि आणखी उद्यां दिडशें रुपये पाठविणार अहांत हें आपल्या पत्रांत वाचून मंडळींना अत्यानंद झाला. आणि सर्वानुमतें आपणास कंपनीचे मालक केलें आहे ही आनंदाची बातमी ह्या पत्रद्वारें आपणास कळविण्याची मी परवानगी घेतो. आतां सर्व मंडळींची काळजी आपणास आहे. तर आपण येथें येणार किंवा तेथेंच राहून पुढल्या व्यवस्थेसंबंधीं आपल्या आज्ञा लिहून कळविणार ते कळविणें.' अशा प्रकारचा लांब-मजकूर होता. आपण एका नाटक कंपनीचे मालक झालों, हें वाचतांच बाबुरावाला का बरें आनंद होऊं नये?

घरीं येतांच तो प्रथम स्वयपाक घरांत गेला आणि ताई चुलीजवळ बसून कांहीं काम करीत होती तिला म्हणाला " हं मला वाढा बुवा, फार भूक लागली आहे."

"काय! इतक्या लवकर वाढा? अरे बाबुराव हें आहे तरी काय? अद्यापि कशाला ठिकाण नाहीं—भाजी ही अद्यापि चिरायची पडली आहे, पोळ्या व्हावयाच्या आहेत आणि वाढा काय?"

आज आपण काय करित आहोंत, काय बोलत आहोंत, हें देखील त्याला कळत नव्हतें, असा तो आनंदानें बेहोष झाला होता. ताईचा जबाब ऐकून किंचित् ओशाळून तो बाहेर आला. तेथें माजघरांत वत्सला उभी होती. तिच्या पदराला ओढून तो म्हणाला, " वत्से, येतेसका आपण गार्डीतून फिरायला जाऊं?"

" का–आज एवढा कसा प्रेमाचा रस पाझरला ? मोठं भाग्यच म्हणायचं माझं ! नाहीं तर बहिणीचा हेवादेवा केल्याशिवाय आमच्या बंडुनानाचा एक दिवसही जायचा नाहीं. मग आज हें असं कसं झालं ! कायरे बंडुनाना, आज तूं आनंदांत दिसतोस तेव्हां कांहीं विशेष—"

" तुला त्याची पंचाईत करण्याची काय जरूर ? यायचं असेल तर हो म्हण. नाहीं तर मी आईला आज फिरायला घेऊन जाणार आहे. आज भाऊसाहेब येशाला घेऊन गेले आहेत खाणीवर तसा मी, तूं येत असतील तर तुला आणि आईला घेऊन जाणार फिरायला ! "

" जा—खुशाल जा. मी नाहीं येत. " असें म्हणून वत्सला तोऱ्यानें फिरली आणि मागल्या पडवींत गेली. तिनें आज निराळाच विचार केला होता. रोज संध्याकाळीं शेतावरून परत येतांना प्रभाकर आपल्या मळ्याच्या बाजूच्या रस्त्यानें कुंपणांतून जातो, हें तिला माहित होतें. तेव्हां आज प्रभाकराला त्या ठिकाणीं गांठून आपल्या मनाची तळमळ शांत करून घ्यावयाची असा तिचा विचार होता. ती निघून गेल्यावर बाबुराव आपल्या आईच्या खोलींत आला. तेथें इंदूला कपडे घालीत कृष्णा बसली होती. तिची फिरावयास जाण्याची तयारी चालली होती. बाबुराव आंत येतांच म्हणाला, " आई, आज तुला बरं वाटतं ना ? मग चल तर आपण गाडींतून फिरावयास जाऊं ! "

" काय ? फिरावयास जावूं ! " सगुणाबाईला आश्चर्य वाटलें. आपल्या मुलानें आपणास फिरावयास नेण्याविषयीं विचारलें, म्हणजे कधीं न घडणारी गोष्ट ! तेव्हां आश्चर्यानें तिनें स्वाभाविकपणें तोच प्रश्न त्याला केला.

" आई, आज भाऊसाहेब गेले आहेत येशाला घेऊन तसं आपणहि जावूं ! "

सगुणाबाईच्या मनांत काय आलें असेल तें असो, आज आपण फिरावयास जावें असेंच तिच्या मनांत आलें. कदाचित् कधीं न विचारणाऱ्या तिच्या प्रतापी मुलानें विचारलें म्हणून ती जाण्यास तयार झाली, किंवा भाऊसाहेबांनीं यशवंताला इतक्या प्रेमानें आपणाबरोबर गाडींत नेलें म्हणून आनंद झाला होता, त्या आनंदाच्या भरांत तिचेंही मन फिरावयास जाण्यास उत्सुक झालें, तें मात्र सांगतां येत नाहीं. ती म्हणाली, " ठीक आहे. चल मी येते. आज मला साधारण बरं वाटतं; तेव्हां थोडावेळ बाहेरून जाऊन आल्यास मन तरी रमेल. जा—वत्सलेला पण तयार होण्यास सांग. "

" ती नाहीं येत. मी तिला मघांच विचारलं. "

" मग कृष्णा, तूं आणि इंदू चला. आज आमच्या बाबुरावांच्या मनांत आलं आहे. तेव्हां चला जरा खाणीपर्यंत जाऊन येऊं. "

बाबुराव ताबडतोब तबेल्यांत गेला आणि रामजीला गाडी जोडण्याकरितां हांका मारूं लागला. परंतु तो तेथें नव्हता. तेव्हां त्यानें आपल्या तट्टाला बाहेर काढून त्याच्यावर सामान चढविलें. व स्वतःच गाडी जोडून स्वारीनें ती दरवाजाजवळ आणिली. कृष्णा आणि इंदू तयारच होती. सगुणाबाईला लुगडें बदलून अंगावर शाल टाकण्यास कांहीं फारसा उशीर लागला नाहीं. ती मंडळी गाडींत येऊन बसतांच बाबुरावानें ऐटीनें तट्टाला चाबुक ओढला.

" अरे बंडू हळूं—हळूं ! तूं अशी नको बाबा गाडी पिटाळी पिटाळीत नेवूं ! " सगुणाबाई म्हणाली.

कृष्णाच्या आठवणींतील गाडींत बसण्याची तिची ही दुसरी खेप होती. वास्तविक त्याच बहिणभावंडांचा गाडी घोड्यांवर हक्क ! परंतु दैवाचे खेळच असें कांहीं चमत्कारिक आहेत, कीं ज्या घरांत त्या दोघांचा शब्द झेलण्याकरितां नोकर चाकर तत्पर असायचे, त्याच घरांत त्यांना नोकरापेक्षांहि कमी योग्यतेनें त्यांचें दैव त्यांना वागवीत होतें. आज गाडींत बसल्यामुळें कृष्णाला अतिशय आनंद झाला होता. तिची आत्या गाडी हळूं चालविण्यास सांगत होती, परंतु बंडुनानानें गाडी जोरानेंच चालवावी असें तिला वाटत होतें. हां हां म्हणतां त्यांची गाडी देशमुखवाडी पासून बरीच दूर गेली. तेव्हां समोरून दोन इसम येत असतांना त्यांना दिसले. त्यांपैकीं एक प्रभाकर होता. परंतु दुसरा मनुष्य मात्र गाडींत बसलेल्या मंडळीच्या ओळखीचा नव्हता. समोरून प्रभाकराला येतांना पाहून त्याला आपलें गाडी हांकण्याचें कौशल्य दाखवावें अशा उद्देशानें बंडुनानानें मोठ्या ऐटीनें तट्टाला चाबुक हाणला. परंतु ईश्वरी नेमानेम कांहीं निराळाच होता. कारण त्यानें चाबुक मारायला आणि गेल्या प्रकरणांत उल्लेख केलेला सुरूंगांचा स्फोट व्हावयाला एकच गांठ पडली. त्या स्फोटाचा स्पष्ट आवाज येथपर्यंत ऐकूं आला. आणि त्या आवाजाबरोबर तें पाणीदार तट्टू एकदम बिचकलें आणि उधळलें. बाबुरावाला कांहीं केल्या तें आंवरेना ! शेवटीं रस्त्याच्या कडेवरून जातां जातां त्यानें

गाडी बाजूच्या शेतांत घातली. त्याबरोबर एकाबाजूचीं दोन चाकें खालीं जावून गाडी लवंडली !

तट्टू उधळलेला पाहतांच प्रभाकर आणि त्याच्याबरोबर असलेला दुसरा गृहस्थ ' हो हो ' करीत मदती करितां धांवत पुढें आले परंतु ते येण्यापूर्वींच गाडी शेतांत जावून आदळली होती.

" कुठें लागलं का तुम्हाला ?–हो, तें पहा तुमच्या कपाळाला घसवटलं आहे ! " सगुणाबाईला उठवीत प्रभाकरानें विचारलें.

" अह ! तें जाईल पण कृष्णा–इंदू तुझाला कांहीं लागलं कां ?–बऱ्याचं वरं, नाहीं तर आतां काय अनर्थ होता ? तरी मी म्हणतें, कीं गाडी हळूं जावूं दे म्हणून ! "

सुदैवानें कोणालाहि इजा झाली नाहीं. सगुणाबाईच्या कपाळाला थोडें लागलें परंतु तिच्या अशक्त छातीला बराच धक्का बसला. गाडीची मात्र सर्वतोपरी दुर्दशा झाली. चाकें मोडून पोल तुटला आणि त्यामुळें तट्टाच्या कुशींत चांगलाच मार बसला. बाबुराव त्याला थापटून थोपटून शांत करीत होता. तें पाहून सगुणाबाई म्हणाली, " कायरे बाबुराव, तट्टाला लागलं वाटतं ? हो–तें पहा त्याच्या कुशींतून रक्त येत आहे. " असें म्हणून ती प्रभाकराकडे वळून पुढें म्हणाली, " पण प्रभाकर, तो एवढा मोठ्यानें एकदम आवाज कसला झाला ? त्या आवाजामुळेंच जनावर उधळलं ? आणि माझ्या छातींत तरी किती मोठ्यानं धडकी भरली म्हणून सांगूं ? "

" कसला आवाज झाला कांहीं कळत नाहीं. पण हा आवाज सुरुंगाचाच असला पाहिजे. कदाचित् तुमच्या खाणीवर लावले असतील सुरुंग ! "

" होय कायरे बाबुराव ? आज खाणीवर सुरुंग लावायचे होते काय ? " सगुणाबाईनें विचारलें. परंतु बाबुरावानें उत्तर दिलें नाहीं. आपण ऐट दाखवायला गेलों आणि झालें भलतेंच, त्यामुळें त्याची मिजाज गेली ! त्यानें तट्टाची लगाम धरून त्याला घराकडे चालविला. तें पाहून प्रभाकर म्हणाला, " आतां तुम्ही इतक्या लांब परत चालत जाणार कीं काय ?–छे ? मी आतां गाडीची व्यवस्था करतो. तुम्ही येथेंच थोडा वेळ बसा. "

" कशाला ? प्रभाकर, आम्हीं जाऊं हळुहळू ? इतक्यांत तिकडून खाणीवरून येणं होईल. मग ही मोडकी गाडी घरीं नेण्याची करतील व्यवस्था ! "

" छे. छे ! तुम्ही पायीं चालत जाणं केव्हांहि श्रेयस्कर नाहीं. एक तर तुम्ही अशक्त आणि त्यांतून हा अपघात !—अहो माधवराव, तुम्हीं एक आतां कृपा करून काम करा. ह्या आंतल्या वाटेनें आपल्या घरीं जाऊन मल्हारीला गाडी जोडून आणण्यास सांगा. "

माधवराव—प्रभाकराला भेटण्याकरितां आलेला पुण्याचा मित्र 'बरं' म्हणून निघाला. कृष्णा गाडीच्या बाजूला उभी राहून सर्व गोष्टी ऐकत होती. तिला किंवा इंदूला कांहींच लागलें नव्हतें. फक्त त्या दोघी घाबरल्या होत्या इतकेंच ! इंदूबाळ गाडी कुठें मोडली, काय झालें याची तपासणी करीत इकडून तिकडे फिरत होती.

" प्रभाकर, हे आतां गेले हे कोण ? "

" माझे एक पुण्याचे स्नेही आहेत. "

" हेच का ते पुण्याहून आलेले वकील ? आणि प्रभाकर, मी ऐकते ती गोष्ट खरी का ? "

" कोणती गोष्ट तुम्ही ऐकतां ? "

" कीं, तुझ्याकडे पुण्याहून एक मोठा वकील आला आहे आणि तो म्हणे यशवंताचें हक्क शाबीत करणार आहे—"

प्रभाकर हांसत हांसत म्हणाला, " छे हो ! ही गोष्ट निव्वळ बाजारगप्प आहे. ते सहज दोन दिवस आले आहेत येथें. पण लोक तरी पहा कसें चमत्कारिक आहेत ते ! त्यांनीं येतांना वाटेंत चौकशी केली. त्या चौकशीचा मंडळींनीं हा असा भलताच विपर्यास केला. "

" पण त्यामुळें तिकडचं मन दोन दिवस अगदीं अस्वस्थ झालं होतं. आणि आतां तिकडच्या स्वभावांतहि फरक पडलेला दिसतो. आज स्वतः यशवंताला बरोबर गाडींत घेऊन खाणीवर जाणं झालं आहे. "

" खरं कीं काय ? वाः मग ठीकच झालं म्हणायचं ! पहा—केव्हां केव्हां वाईटापासून चांगलं निघतं म्हणतात तें हें असें ! बरंपण आतां अनायासें भेट झाली आहे तेव्हां

परवां शनिवारचें आमंत्रण देऊन ठेवतों. परवां आमच्या घरीं श्रीसत्यनारायणाची पूजा आहे; तेव्हां आपण सर्वांनीं प्रसादाला आलंच पाहिजे. ”

अशा रीतीनें त्यांच्या गोष्टी चालल्या आहेत, इतक्यांत गवळ्या जीव घेवून धांवत येत असलेला त्यांच्या दृष्टीस पडला. ह्या गवळ्याला वाचकांनीं ओळखलेंच असेल. तिसऱ्या प्रकरणांत दाजिबांना अपघात झाला असतां जो वेडापीर पोर प्रभाकराबरोबर त्या अपघाताच्या ठिकाणीं गेला आणि ज्यानें देशमुखवाडींत त्या अपघाताची बातमी वेड्यावांकड्यारीतीनें प्रथम पोंचविली, तोच हा गवळ्या !

“ अहो प्रभाकररावदादा, धांवा–धांवा की लवकर ! भाऊसायबांच्या खानींत धाच्या धा सुरुंग एकदम भडाकले आन् संमूदि खान ढासळून पडलिया. आन् काय सांगूं तुम्हास्नी ताईसाब ! यमवंतरावांचा पत्ता नाहीं. तें खानींत चिराडलें–मोठमोठ्या दगूडा-खालीं चिरडूनशानी मेले—”

“ काय काय गवळ्या ? ” भयभीत होऊन सगुणाबाईनें विचारलें. गवळ्या धांवून आल्यामुळें दम घेत सांगत होता. त्याचा प्रत्येक शब्द, थोड्या वेळा पूर्वीं गाडीचा अपघात होऊन धक्का बसलेल्या तिच्या हृदयावर घेणाच्या आघाताप्रमाणें ठोका मारीत होता. तिनें कांपत कांपत पुनः विचारलें, “ गवळ्या, नीट सांग. काय झालं खाणीवर यशवंताला—”

“ काय सांगूं ताईसाब, यसवंतराव खानींत चिरडून शानीं मेले नव्ह का ? आतां थिकडं सोधा सोध चाललिया. दगूड उपसूनशानी काढत्याती. पन यसवंतराव गवसत् न्हाईत ! ”

प्रभाकर चटकन् पुढें झाला आणि त्यानें सगुणाबाईला आपल्या हातावर सांवरलें. नाहींतर ती धाडकन् जमिनीवर आदळली असती. ‘ यशवंत खाणींत चिरडून मेला. ’ हें वाक्य ह्मणचे तिला वज्रघात होता. कृष्णी बाजूला उभी होती परंतु तिचीहि स्थिति जवळ जवळ आपल्या आतेसारखी झाली होती. एखाद्या वेड्यासारखी ती गवळ्याकडे पहात स्तब्ध उभी राहिली. आपण ऐकतों काय हेंच तिला कळेना. प्रभाकरानें एकदां तिच्याकडे वळून पाहिलें. परंतु तिचें शांतवन करण्याची ती वेळ नव्हती. त्यानें फक्त सहा-

नुभूति दर्शक दृष्टीनें तिच्याकडे पाहून गवळ्याला विचारलें, " गवळ्या, तूं ही बातमी सांगितलीस, ती तूं स्वतः पाहिलीस कीं, तुला कोणी सांगितली ? "

" आतां काय सांगावं तुह्मासनी प्रभाकर दादा! मी सवता माझ्या डोळ्यानं पाह्यलं आन् काय? "

" प्रभाकर, माझा यशवंत–"

छे! सगुणाबाईच्या मुखांत पुढला शब्द अडकला! तिला शब्दोच्चार करतां येईना. ती तिची स्थिति पाहून प्रभाकर गोंधळून गेला. तिचें आपणास कसें समाधान करतां येईल, हेंच त्याला कळेना. इतक्यांत समोरून येत असलेल्या गाडीकडे त्यांचे लक्ष गेलें. मल्हारी गाडी पिटाळीत आणीत होता. तें पाहून प्रभाकराला बराच धीर आला. तो म्हणाला, " चला–आतां गाडी आली. एकदां घरीं गेल्यावर मग काय तें सर्व कळेल. "

" प्रभाकर, घरीं जायचं म्हणतोस ? नको–नको. मला खाणीवर घेऊन चल. माझ्या यशवंताचं काय झालं, तें मला नीट कळल्याशिवाय आतां मला चैन पडायचं नाहीं. "

" प्रभाकराला नाहीं म्हणतां येईना. त्याला मोठा विचार पडला. गवळ्या म्हणतो त्याप्रमाणें जर खरोखरच खाणींत सुरुंग पेटविल्यामुळें अपघात झाला असेल आणि त्यांत यशवंत सांपडला असेल, तर त्याचें छिन्नभिन्न प्रेत पाहून सगुणाबाईची काय अवस्था होईल याची त्याला कल्पना होईना. तो स्तब्ध उभा होता. गाडी अगदीं जवळ येऊन उभी राहिली. तेव्हां इंदूबाळ कृष्णीच्या जवळ जाऊन म्हणाली. " कृष्णा खरंच काग यशवंत मेला ? पण कसाग तो मेला असेल? त्याचं कपाळ फुटलं काय ? "

उत्तरा ऐवजी कृष्णीचा डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. तें पाहून सगुणाबाई बाईला गहिंवर येऊन तिनें कृष्णीला आपल्या जवळ ओढून पोटाशीं धरलें. आणि तीहि अश्रू गाळूं लागली. बऱ्याच वेळानें ती अश्रू पुसून म्हणाली, " ईश्वरा, माझ्या यशवंताच्या दैवीं असाच कायरे मृत्यु लिहून ठेविला होतास ? दुःखा दुःखानें पोरं गांजली. शेवटीं हा एकाचा शेवट झाला. पण बाळा यशवंता, छळलं—छळलरे तुला ! "

आतां आपण बोललों नाहीं तर हा सगुणाबाईचा दुःखवेग जास्त भडकत जाईल असें जाणून प्रभाकर म्हणाला, " गवळ्या, तूं एक काम कर. आम्ही आतां खाणीवर जातो. आणि तूं इंदूला आणि—"

" नको—नको प्रभाकर, त्या दोघींनाही येऊं दे. चल बाळ कृष्णा—अरेरे ? नारायण ! आतां तिकडे जाऊन आमच्या काय दृष्टीस पडणार ? माझा बाळ—माझा यशवंत–"

" चला चला कीं ! आतां वखुत कशापायीं करतां ?" असें म्हणून गवळ्यानें गाडीचा दरवाजा उघडला. प्रथम सगुणाबाई आंत बसली. नंतर कृष्णा आणि इंदू वर चढल्या. प्रभाकरानें कोचबॉक्सवर बसून लगाम हातीं धरलें आणि घोडा पिटाळला. तें जनावर फार तेज असल्यामुळें गाडी हां हां म्हणतां खाणीजवळ आली. गेटाजवळ गाडी येईपर्यंत आंत बसलेली मंडळी आपापल्या विचारांत मग्न होती. आतां आपणास यशवंताचें छिन्न-भिन्न झालेलें शरीर दृष्टीस पडेल आणि तो हृदयविदारक देखावा पाहून आपली काय अवस्था होईल या विचारांत बिचाऱ्या सगुणाबाईचें मन द्विधा होऊन गेलें होतें. गेटा-जवळ गाडी येतांच सगुणाबाई इकडे तिकडे पाहूं लागली. परंतु येथें कोणीहि नव्हतें. सर्व मंडळी खाणीजवळ एकत्र गोळा झाली होती. प्रभाकरानें दरवाजा उघडतांच सगुणाबाई आणि कृष्णा खालीं उतरून खाणीकडे जाऊं लागल्या. त्यावेळीं सगुणाबाई इतकी झपा-ट्यानें चालत होती कीं, तिला लांबून येतांना पाहून खाणीच्या बांधावर उभे असलेल्या भाऊसाहेबांनाहि आश्चर्य वाटलें. आपण आजारी आहोंत ही कल्पना देखील त्यावेळीं तिच्या मनांत नव्हती. ती झपझप् पावलें टाकीत चालत होती. तिच्याबरोबर चालण्या-करितां कृष्णीला मधून मधून धांवावें लागे. प्रभाकरहि तिच्याच बरोबर चालत होता. परंतु गवळ्या मात्र माकडासारख्या उड्या मारीत मारीत केव्हांच जाऊन खाणीवर पोंचला होता. त्याला पाहतांच भाऊसाहेब रागानें दरडावून म्हणाले, " कायरे गाढवा, तूं जाऊन ही घरीं वर्दी दिलीस वाटतं ? पाजी कुठला !–तुला ही उठाठेव कोणी सांगितली होती ?"

" मी कशापायीं सांगाया जावूं ! ताईसाब हकडंच येया निघाल्या व्हत्या ! तुमच्या बाबुरावांनीं गाडी हानली ! घोडा बिचाकला आन् खाचरामंदी गाडी नेऊनशानी टाक-लिया ! तुमची गाडी मोडली, ताईसायवास्नी लागलं आन् बघा घोड्याच्या कुशीत्न रगुतबी येऊं लागलं !"

गाडी खाणीवर येत असतां तो मल्हारीजवळ गाडीच्या मागें बसला होता. तेव्हां मल्हारीनें त्याला ही सर्व हकीकत सांगितली होती, तीच तो आतां भाऊसाहेबांना

सांगत होता. तितक्या अवधींत गाडींतील मंडळी तेथें आली. सगुणाबाईनें एकवेळ दृष्टीला दृष्टि भिडवून आपल्या पतीच्या मुखाकडे पाहिलें परंतु भाऊसाहेबांच्या चर्येवर आपण ऐकलेल्या गोष्टीविषयीं—यशवंताच्या अपघाताविषयीं दुःख, भीति किंवा उद्वेग यांपैकीं कांहींच चिन्ह न दिसतां त्यांची मुद्रा उलट रागीट दिसत होती. नंतर तिनें खाणीकडे आपली दृष्टि फिरविली. तेथें तर एकच गडबड उडाली होती. खाणींतून लहान मोठे दगड आणि शिला वर आणून टाकण्याचा एकसारखा सपाटा चालू होता. त्यावरून गवळ्यानें सांगितलेली गोष्ट खरी आहे अशी तिची खात्री झाली. ती पुढें होऊन विचारणार तोंच भाऊसाहेबांनीं क्रूर दृष्टीनें प्रभाकराकडे पाहून सगुणाबाईला विचारलें, "तूं येथें मुलांना घेऊन कशाला आलीस? तूं आजारी आहेस आणि इतक्या लांब उघड्या हवेंत येण्याचें तुला कारण काय होतें?"

सगुणाबाईनें उत्तर दिलें नाहीं. आपल्या पतीनें यशवंताविषयीं आपणास कांहीं सांगावें अशी तिची इच्छा होती. आणि त्याकरितांच ती अत्यंत उत्सुक झाली होती. तथापि आपल्या आईच्या ऐवजीं इंदूबाळ पुढें होऊन म्हणाली, "भाऊ, आतां येतांना वाटेंत एक मोठा आवाज झाला. त्याबरोबर नानाचें तट्टू एकदम धांवत सुटलें. आणि मग आमची गाडी खाचरांत जाऊन आदळली. तिचीं चाकं मोडलीं, आईच्या कपाळाला लागलं पण माझ्या नाहीं लागलं."

"पण तुम्हांला इकडे यायला सांगितलं कुणी?"

"आम्हाला नानानें फिरायला आणलं."

"यशवंताची काय खबर आहे?" मध्येंच कातरस्वरानें सगुणाबाईनें विचारलें. परंतु भाऊसाहेबांनीं त्या प्रश्नाकडे दुर्लक्ष करून इंदूला विचारलें "पण तुम्ही खाणीवर कशाला आलांत?"

भाऊसाहेब कोणत्या उद्देशानें विचारतात, तें जाणून बाजूला उभा असलेला प्रभाकर म्हणाला, "घोडा उधळला आणि गाडी रस्त्यावरून उलटली त्यावेळीं मी तेथून जात होतों. तो अपघात पाहून मी तेथें धांवून गेलों. ताईसाहेबांस कांहीं विशेष लागलं नाहीं, तथापि धक्का मात्र बसला. त्यांना परत नेण्याकरितां मी मनुष्य पाठवून माझी गाडी

मागविली. इतक्यांत गवळ्यानें येथें अपघात झाला ही बातमी आम्हांला येऊन सांगितली, तेव्हां ताईसाहेबांच्या आग्रहावरून मी त्यांना येथें घेऊन आलों. "

" पण यशवंताचें काय झालें ? " पुनः सगुणाबाईनें विचारलें. " खरंच का तो खाणींत—"

"होय. तो सुरुंग उडाले त्यांत सांपडला आहे. अद्यापि त्याचा पत्ता लागला नाहीं. " भाऊसाहेबांनीं किंचित् धीट होऊनच उत्तर दिलें.

" पण सुरुंग उडण्याच्या वेळीं तो खाणींत कसा गेला ? "

" गेला आपल्या कर्मानें !–अग कसा गेला म्हणून काय सांगूं ? " असें अर्धवट उत्तर देऊन खाणीजवळ उभा असलेल्या मुकादमाला भाऊसाहेबांनीं ओरडून विचारलें, " कायरे काळ्या, कांहीं लागतो का पत्ता ? "

" नाहीं–अझून पुष्कळ खालीं उपसलं पाहिजे. "

काळ्याचें उत्तर ऐकून भाऊसाहेब त्याच्याजवळ जाऊन उभे राहिले. सगुणाबाई तेथेंच उभी राहून खाणींतून दगड आणि माती घेऊन वर येत असलेल्या मजुरांकडे पहात होती. प्रभाकर आणि हरिभाऊ जवळच गोष्टी करीत उभे होते. इतका वेळ भाऊसाहेब जवळ उभे असल्यामुळें त्यांच्या हळुहळू गोष्टी चालल्या होत्या. परंतु ते आतां दूर जातांच हरिभाऊ मोठ्यानें बोलूं लागला. त्याचा प्रत्येक शब्द सगुणाबाईला ऐकूं जात होता. प्रथम थोडावेळ ती आपल्याच विचारांत मग्न असल्यामुळें बाजूला चाललेल्या गोष्टींचा तिला शून्य मनाला बोध झालाच नाहीं. परंतु ' भाऊसाहेबांनीं त्याला मुद्दाम पाठविलें ' हें वाक्य तिच्या कानावर आदळतांच ती हरिभाऊचें भाषण लक्ष्यपूर्वक ऐकूं लागली.

" भाऊसाहेबांनीं त्याला मुद्दाम पाठविलें, " हरिभाऊ प्रभाकराला सांगत होता. " आणि तो जावूं लागला, तेव्हां त्याला परत बोलावून ते म्हणाले, ' यशवंत, तूं त्यांना वर उभा राहून हांक मारशील; तर तसं करूं नकोस. सगळे मजूर गबाळ आहेत. तर तूं आंत जाऊन सर्वांना खाणीबाहेर काढ. ' त्या भाऊसाहेबांच्या आज्ञेप्रमाणें यशवंत खाणीवर आला आणि थोडा वेळ झाला नाहीं तोंच भाऊसाहेबांनीं काळ्याला हांक मारून एकदम सुरुंगाला बत्ती देण्याचा हुकूम केला. पण त्यावेळीं यशवंतराव खाणींत उतरला आहे त्या गोष्टीचें त्यांना स्मरण नव्हतें कीं काय कोण जाणें ! पण—"

इतकी हकीकत सांगितली आणि तो पुढें सांगणार इतक्यांत 'हरिभाऊ' अशी भाऊसाहेबांनीं त्याला मोठ्यानें हांक मारिली. तो प्रभाकराबरोबर बोलत आहे हें पाहून भाऊसाहेबांना संशय आला. आणि म्हणूनच त्यांनीं त्याला हांक मारिली. तो जावूं लागला तें पाहून सगुणाबाईहि आपल्या पतीजवळ जावूं लागली. हरिभाऊनें सांगितलेली हकीकत ऐकून तिला जबरदस्त संशय आला. तिच्या डोक्यांत निराळ्याच विचारांचें काहूर माजलें. हळुहळू सारी वस्तुस्थिति तिच्या लक्षांत येऊं लागली. आपल्या पतीनें दोन दिवस यशवंताला मोठ्या प्रेमानें वागविलें परंतु त्या प्रेमाच्या पोटांत त्यांनीं जो भयंकर चक्रव्यूह रचला होता, तो आतां तिला स्पष्ट दिसूं लागला. ती आपल्याच विचारांत पुढें होऊन आपल्या पतीजवळ जाऊन उभी राहिली. नंतर ती सूक्ष्म दृष्टीनें आपल्या पतीकडे पाहूं लागली. आपल्या मनांत आलेली शंका खरी किंवा खोटी आहे, हें पाहण्याकरितां तिनें आपल्या पतीच्या मुखाकडे क्षणभर भेदक दृष्टीनें सूक्ष्मावलोकन केलें. त्याच वेळीं पतिपत्नीची एक दृष्टि झाली. परस्परांनीं परस्परांच्या मनांत चाललेले विचार ओळखले.

" तुम्ही यशवंताला मुद्दाम खाणीवर पाठविलं ना ? "

आपल्या पत्नीचा हा निर्भिड प्रश्न ऐकतांच भाऊसाहेबांचीं चर्या खाड्कन उतरली !



# प्रकरण २७ वें.



## काळ आला पण वेळ आला नाहीं.



"यशवंत बाळा, लाडक्या, शेवटीं तुझा अशा छळांत शेवट व्हावा ना!" दुःखाच्या वेगांत हें एक वाक्य बोलून सगुणाबाई एकदम खालीं बसली आणि दोन्हीं हातांनीं आपलें तोंड झांकून घेऊन हुंदके देऊं लागली. कृष्णाहि पलीकडे तोंड करून रडत होती. त्यावेळीं त्या दोघींची स्थिति आजूबाजूच्या मंडळींच्या डोळ्यांतून पाणी आणणारी होती. खाणींतून माती आणि दगड भरून आणणाऱ्या मजुरांना देखील तो देखावा पाहून वाईट वाटलें. त्यांच्यापैकीं कित्येकांनीं आपलें डोळे पुसले. यशवंतरावाच्या ऐवजीं आपणापैकीं एखादा खाणींत सांपडला असता तर फार बरें झालें असतें असाहि विचार कित्येकांच्या मनांत आला, इतका तो देखावा हृदयद्रावक होता. भाऊसाहेब तर एखाद्या दगडी पुतळ्याप्रमाणें उभे होते. आपलें दुष्ट कृत्य आपल्या पत्नीच्या पूर्ण लक्षांत आलें, हे त्यांनीं चांगल्याप्रकारें जाणलें. आतां त्यांना सगुणाबाईकडे वळून पाहण्याचें किंव तिच्या दृष्टीलादृष्टि भिडविण्याचें धैर्य होईना. बऱ्याच वेळानें सगुणाबाई जास्त जोराजोरानें हुंदके देऊं लागली. तेव्हां उसनें अवसान आणून तिला नजरेनें दाबावी, अशा हेतूनें भाऊसाहेबांनीं तिच्याकडे किंचित् डोळे ताणून पाहिलें. पुनः त्यांची दृष्टि एक झाली. परंतु ह्या खेपेस असा कांहीं विलक्षण चमत्कार झाला कीं, सगुणाबाईच्या अश्रुयुक्त डोळ्यांत एकप्रकारचें चमत्कारिक तेज त्यांच्या दृष्टीस पडलें. आणि त्यामुळें आपोआप त्यांची दृष्टि जमिनीकडे वळली. आपण एक अमानुष कृत्य केलें याची त्यांना त्यावेळीं जाणीव झाली. आपण एक हत्या केली हे पुढचे विचार त्यांच्या मनांत येतांच त्यांच्या हृदयांत एकदम धडकी बसली परंतु ही स्थिति फार वेळ टिकली नाहीं. कारण आपला प्रतिस्पर्धी नाहींसा झाला आणि आतां आपण खरेखुरे देशमुख बनलों हे विचार तात्काळ मनांत येतांच क्षणापूर्वी त्यांच्या हृदयांत बसलेल्या धडकीचे आनंदाच्या

उमाळ्यांत स्थित्यंतर झालें. परंतु ही स्थिति देखील फार वेळ टिकली नाहीं. कारण त्याचवेळीं खाणीच्या वर उभे असलेल्या मजूरांनीं आनंदाच्या आरोळ्या मारण्यास सुरवात केली. ही निराळी गडबड कशाबद्दल आहे, याचा प्रथम कोणालाच उलगडा झाला नाहीं. सगुणाबाई, कृष्णा आणि प्रभाकर यांच्या स्थितीबद्दल वर वर्णन केलेंच आहे. परंतु मजुरांच्या आरोळ्या ऐकतांच त्या सर्वांची दृष्टि एकदम त्या बाजूला वळली.

" यशवंत—माझा यशवंत—बाळा कुठेंरे होतास ? "

हे सगुणाबाईचे आनंदाचे उद्गार भाऊसाहेबांच्या कानांत तापलेल्या तेलाप्रमाणें शिरले. त्यांनीं बाजूला वळून पाहिलें तों खरोखरीच माधवराव वकिलाबरोबर यशवंत हळूहळू येत होता. यशवंत दृष्टीस पडतांच भाऊसाहेबांची चर्या कावरी बावरी झाली. त्यांनीं क्षणभर डोळे फाडून त्याच्याकडे पाहिलें. आपण पाहतों तो खरोखरीच यशवंत आहे किंवा आपल्या कृष्ण कारस्थानाला खाणींत बळी पडलेल्या यशवंताचें तें पिशाच्च आहे, अशी त्यांस क्षणभर शंका उद्भवली. परंतु आतां शंका घेण्याचें कांहीं कारण नव्हतें. तो खरोखरीच यशवंत होता. तो पुढें येतांच सगुणाबाईनें त्याला घट्ट मिठी मारून आपल्या हृदयाजवळ धरलें. जवळ आपले पतिराज उभे आहेत, तेव्हां त्यांच्या समक्ष आपण हें काय करतों याचा विचारहि तिच्या मनांत आला नाहीं. नाहीं तर आतांपर्यंत ती आपल्या पतीला किती भीत असे, त्याचा उल्लेख वेळोवेळीं येऊन गेलाच आहे.

" यशवंत—बाळा तूं होतास तरी कुठें ? आज ईश्वरानें खैर केली नाहीं तर माझ्या तोंडाला जन्माचें काळें लागलें असतें !" यशवंताच्या पाठीवरून हात फिरवीत सगुणाबाई म्हणाली.

परंतु आपली आत्या काय बोलत आहे, हें मात्र त्याच्या लक्षांत आलें नाहीं. आपला देहान्त व्हावा म्हणून भाऊसाहेबांनीं भयंकर कपटव्यूह रचला होता, ही त्याला कल्पना देखील नव्हती. तो हरिभाऊ बरोबर बोलत असतां पूर्वी ठरविल्याप्रमाणें भाऊसाहेबांनीं त्याला खाणीवर जाऊन मजुरांना खाणींतून वर येण्यास सांगण्याकरितां पाठविलें आणि त्याप्रमाणें तो खाणीवर गेला. पुढें थोडा वेळानें सुरुंग पेटविण्याचा भाऊसाहेबांनीं काळ्याला सांगितलें, ती हकीकत वाचकांना आठवत असेलच, त्याप्रमाणें यशवंत खाणीवर जाण्याकरितां निघाला. परंतु जातां जातां त्याच्या मनांत निराळाच

विचार आला. त्यावेळीं संध्याकाळ झाला होता. आणि संध्याकाळीं घेण्याकरितां शास्त्रीबुवांनीं त्याला दोन गोळ्या दिल्या होत्या. त्या त्याच्या खिशांत होत्या. आपली औषध घेण्याची वेळ झाली असें पाहून यशवंतानें आपल्या खिशांतून गोळ्या काढल्या आणि पाण्याकरितां तो इकडे तिकडे पाहूं लागला. खाणीपासून पन्नास पावलांवरून ओढा वहात होता. तेथें जाऊन पाण्याच्या घोटावर गोळ्या घ्याव्या आणि मग खाणींत जावून सर्व मजुरांना भाऊसाहेबांचा निरोप कळवावा असा त्यानें विचार केला. त्याचा काळ आला होता परंतु वेळ मात्र आली नव्हती म्हणूनच त्या काळाला चुकविण्याकरितां ओढ्यावर जाऊन औषध घेण्याचा विचार त्यांच्या मनांत आला. पहा-ईश्वरी नेमानेम कसा असतो तो ! ‘ तारत्या पुढें मारत्याचें कांहीं चालत नाहीं ’ तेंच खरें ! यशवंत ओढ्यावर जाऊन आपल्या बंडीचे हात वर करून एका दगडावर बसला. आणि प्रथम त्यानें एक चूळ भरून टाकली. आतां तो गोळ्या तोंडांत टाकून त्यावर पाण्याचा घोट घेणार इतक्यांत पाठीमागें खाणीवर सुरुंगाचा स्फोट होऊन ‘धड्ड्-ड्’ असा भयंकर आवाज झाला. त्या आवाजाबरोबर असावध असलेल्या यशवंताच्या छातींत धडकी भरून तो तेथेंच धाड्कन निचेष्टित पडला. थोडक्यांत चुकलें ! तो मागल्या बाजूला पडला म्हणून ठीक झालें. नाहींतर पाण्यांत पडून तो तशा बेशुद्ध स्थितींत ओढ्यांतून वहातच गेला असता. अशा रीतीनें तो एक तास त्याच स्थितींत पडला होता. त्याचवेळीं माधवराव तेथून येत होता, सगुणाबाईच्या गाडीला अपघात झाल्यावर प्रभाकरानें त्यांस घरीं पाठवून गाडी पाठविण्यास सांगितलें, त्याप्रमाणें त्यानें घरीं जावून गाडी पाठविली. मल्हारी गाडी घेऊन गेल्यावर माधवराव थोडावेळ आंबराईत फिरल्यानंतर खाणीवर आवाज झाला तो कशाचा, याचा शोध करावा ह्या उद्देशानें तो पुनः आंबराईतून बाहेर पडला. आपणास वाटेंतच अपघात झालेली देशमुखांच्या मंडळी प्रभाकराच्या गाडींतून परत येतांना भेटतील, अशी त्याला खात्री होती. म्हणून तो मोठ्या सडकेनेंच चालला होता. पुष्कळ रस्ता चालून गेल्यावर गाडी येण्याचें कांहींच चिन्ह दिसेना. तेव्हां आपण येण्यापूर्वीच गाडी परत गेली असेल असेंही त्यास वाटलें. परंतु गाडी परत आली असती तर प्रभाकर आपणास भेटला असता. आणि प्रभाकर अद्यापि भेटला नाहीं, त्याअर्थीं गाडी आलीच नाहीं असें गृहीत धरून तो पुढें जावूं लागला. हळु हळूं तो खाणीच्या रस्त्याला लागला. आतां

आपण इतकें जवळ आलों आहोंत, तेव्हां प्रत्यक्ष खाणीवरच जावें म्हणजे आवाज कसला झाला तें आपणास कळेल, असा विचार करून तो पुढें निघाला.

खाणीवर जातांना वाटेंत एक ओढा लागत असे. चार दिवसापूर्वीं ह्याच ओढ्यावर यशवंत बेशुद्ध पडला होता आणि तेथून त्याला काळ्यानें आपल्या पाठीवर घेऊन आणलें होते, ती हकीकत वाचकांना स्मरतच असेल. त्या ओढ्याजवळ येतांच माधवराव सहज इकडे तिकडे पाहूं लागला. तोंच ओढ्याच्या तीराजवळ अस्ताव्यस्त पडलेली एक मनुष्याकृति त्याच्या दृष्टीस पडली, त्याबरोबर चार दिवसांपूर्वीं घडलेल्या गोष्टीची त्यास आठवण झाली. चार दिवसांपूर्वीं यशवंत येथेंच बेशुद्ध पडला होता, तसाच आ-जहि कांहीं प्रकार घडला आहे किंवा काय अशी शंका उद्भवून तो पुढें झाला. आणि नीट न्याहाळून पाहूं लागला.

तो यशवंतच होता. पुनः त्याची अशी अवस्था पाहून माधवरावाला फार आश्चर्य वाटलें आणि वाईटही वाटलें. ओढ्यावरच येऊन तो बेशुद्ध कसा होतो असा एक प्रश्न त्याच्या मनांत आला. परंतु शंका कुशंका आणि तर्कवितर्क काढीत बसण्याची ती वेळ नव्हती. त्यानें चट्कन पुढें होऊन यशवंताला सावध करण्याचा यत्न सुरू केला. त्याच्या डोळ्याला पाणी लावतांच थोड्या वेळानें तो शुद्धीवर आला.

" काय हो यशवंतराव, पुनः तुम्ही ह्याच ठिकाणीं येऊन बेशुद्ध कसें झालांत ? ह्या ओढ्यावर येतांच तुम्हाला अशी झांट कशी येते बुवा ! " माधवरावानें विचारलें.

" मी आलों होतों येथें शास्त्रीबुवांनीं दिलेली गोळी घेऊन तीवर पाण्याचा घोट घेण्याकरितां ! इतक्यांत खाणीवर सुरुंग पेटविले त्या भयंकर दणक्याबरोबर मला झीट आली. "

नंतर माधवरावानें त्याला हातांशीं धरून वर उठविलें. आणि दोघेहि खाणीवर जाव-यास निघाले. त्यांना येतांना पाहून खाणीवरून मजुरांनीं आनंदानें आरोळ्या मारून त्यांचें कसें स्वागत केलें त्याविषयीं वर उल्लेख केलाच आहे. सगुणाबाईनें यशवंताला आपल्या हृदयाशीं धरलेलें पाहून बाजूला उभी असलेल्या कृष्णाच्या मनांत काय विचार आले असतील बरें ? ती आपल्या भावाच्या तोंडाकडे टकमका पाहतच राहिली. इकडे

प्रभाकरानें माधवरावांस एका बाजूला नेऊन थोड्या वेळापूर्वी हरिभाऊनें सांगितलेली सर्व इकाकित त्यांस सांगितली.

" एकूण भाऊसाहेबांनीं हा सर्व पूर्वीच रचून ठेविलेला बेत होता यांत बिलकुल शंका नाहीं. " माधवराव म्हणाला, " आतां यशवंतरावाच्या सुदैवानें आणि भाऊसाहेबांच्या दुर्दैवानें त्यांनीं योजला होता तसा प्रकार झाला नाहीं, तो प्रश्न निराळा ! बाकी त्यांस खून करण्याचा प्रयत्न केला ह्या आरोपावरून कोर्टापुढें नेऊन हजर करण्यास कांहीं सुद्धां हरकत नाहीं. "

" हरकत नाहीं, ती गोष्ट खरी परंतु हा इतका खटाटोप करतो कोण ? "

" हेंच तर मुळीं चुकतं तुमचं प्रभाकरराव ! अशा नीच माणसांची केव्हांहि गई करतां उपयोगी नाहीं. अशा दुष्टांचीं डोकीं तात्काळ ठेंचलीं पाहिजेत. अहो, हे बोलून चालून मानवी राक्षस ! "

इतक्यांत बाजूला भाऊसाहेब आपल्या पत्नीला उद्देशून मोठ्यानें म्हणाले, " कां–आतां तरी झाली ना मनाची खात्री ! मिळाला ना तुझा लाडका यशवंत तुला ? पण मघां बोलतांना थोडासा विचार करायचा होतास ! "

भाऊसाहेबाचें हें भाषण ऐकून त्यांनीं झालेल्या गोष्टीवर पांघरूण घालण्याचा केलेला प्रयत्न माधवरावांच्या लक्षांत आला. वास्तविक त्याला कांहीं एक बोलण्याची जरूरी नव्हती परंतु तो प्रसंगच तसा होता कीं, त्याला बोलल्याशिवाय राहवेना. तो पुढें होऊन म्हणाला, " भाऊसाहेब, यशवंतरावाच्या आयुष्याची दोरी सबळ म्हणूनच ते ह्या प्रसंगांतून निभावले; नाहीं तर तुमचा हेतु आज सोळा आणे तडीला जात होता. "

" माझा हेतु ? माझा हेतु कसला ? "

" कसला हेतु तो तुमच्या जीवाला ठाऊक ! "

" आपण जरा तोंड सांभाळून बोला ! " एकदम आवाज बदलून भाऊसाहेब रागानें म्हणाले, " तुम्हाला ह्या गोष्टींत तोंड घालण्याची काय जरूरी ? "

माधवराव अशा धमकवणीस थोडीच भीक घालणार! तो तितक्याच मोठ्यानें म्हणाला, " काय जरूरी तें प्रसंग पडल्यावर सांगेन. "

" काय सांगणार तुम्ही ? आणि तुम्हाला विचारतो कोण ? "

भाऊसाहेबांचा वाढता स्वर पाहून प्रभाकरानें माधवरावास दाबण्याचा प्रयत्न केला. आपण भाऊसाहेबांच्या कोणत्याहि भानगडींत पडावयाचें नाहीं असा त्यानें निश्चय केला होता. आणि त्याप्रमाणें त्यानें आपल्या मित्राला-माधवरावाला पूर्वीं सांगितलेंहि होतें. परंतु माधवरावानें तिकडे लक्ष दिलें नाहीं. तथापि त्याच्या मनांत कांहीं विशेष हेतु होता, असें नाहीं. फक्त भाऊसाहेबांस भिवविण्याचा त्याच्या उद्देश होता.

" माधवराव, जाऊं द्या ! " प्रभाकर मध्यें होऊन म्हणाला, " का उगाच तुम्ही ह्या भानगडींत पडतां ?"

" अरे, तुम्हां सर्वांना मी चांगला ओळखून आहे." भाऊसाहेब म्हणाले " तुम्ही काय काय कारस्थानं चालविलीं आहेत तीं सर्व मला कळलीं आहेत. पण याद राखून ठेव प्रभाकर—"

" भाऊसाहेब, तुम्ही प्रभाकराला यशवंत समजून धमकी देतां वाटतं ? तो गरीब पडला म्हणून तुमचं फावलं आहे पण माझ्यासारखा असता तर केव्हांच तुमचे बारा वाजविले असते हें लक्षांत ठेवा. " प्रभाकरानें त्याला धरून पलीकडे नेत असतां माधवराव मागें वळून इतकें बोललाच ! आणि त्याचवेळीं सगुणाबाईची आणि प्रभाकराची दृष्टादृष्ट झाली. ' तुझा मित्र माझ्या पतीबरोबर जीं प्रश्नोत्तरें करतो, तीं ऐकून मला वाईट वाटत आहे.' असा अर्थ सगुणाबाईच्या दृष्टींत होता, हें प्रभाकराच्या लक्षांत आलें.

संध्याकाळ होत आला. भाऊसाहेब रागारागानें हरिभाऊला पुढल्या व्यवस्थेचे हुकूम देऊन गाडींत जावून बसले. परंतु त्याच गाडींत त्यांच्या शेजारीं जावून बसण्यास आतां सगुणाबाईला धैर्य होईना. इंदू आपल्या बापाजवळ जातांच रागानें भाऊसाहेब ओरडून म्हणाले, "जाग ए तुझ्या आईला घेऊन ये.-येते कीं नाहीं ती—"

" मी ह्या प्रभाकराच्या गाडींतून येतें. " आपल्या पतीला ऐकूं जाईल अशाच स्वरांत सगुणाबाई म्हणाली, " तुम्ही व्हा पुढें—"

" असं काय ? अझून नाहीं का तुमचे बेत योजून झाले ! योजा-वाटेल ते बेत

योजा—मी तुम्हां सर्वांना नीट रस्त्यावर आणतों, तुम्ही काय समजत आहांत ! " असें म्हणून त्यांनीं घोड्याला चाबूक हाणला.

पतीचें वाक्य ऐकून सगुणाबाईला फार वाईट वाटलें. आपणाविषयीं पतीचा असा भलताच ग्रह झालेला पाहून त्या साध्वीला कां बरें वाईट वाटूं नये ? ती शून्यदृष्टीनें पतीनें भरधांव हांकित नेलेल्या गाडीकडे पहात राहिली. प्रभाकराचीहि तीच स्थिति झाली. आपल्या मित्राच्या बोलण्याचा परिणाम असा चमत्कारिक झालेला पाहून त्यालाहि वाईट वाटलें !

" माधवराव, तुम्ही बोललांत खरें, पण त्याचा परिणाम मात्र फार वाईट झाला ! " प्रभाकर म्हणाला, " भाऊसाहेब आतां यशवंताला ह्यापुढें चांगलें वागवितील किंवा नाहीं हा प्रश्न निराळा ! पण आतांच्या त्यांच्या बोलण्यावरून ताईसाहेबाविषयींहि त्यांचा भलताच समज झाला आहे असं दिसतं. "



# प्रकरण २८ वें.



## भाऊसाहेब गडबडले.





"मग काय माधवराव, जाणार तर तुम्ही आज! मी तुम्हाला फार आग्रह करीत नाहीं. फक्त दोनच दिवस रहा. परवां आमची पूजा आटोपली कीं तुम्ही जा. आतां तुम्ही थोडेच लवकर येणार आहांत ?"

"छे! आतां तुम्ही बिलकूल आग्रह करूं नका. आज मला निघालंच पाहिजे. आमच्या बाजूला प्लेगची धामधूम असल्याशिवाय मला पुण्याहून असं पत्र यावयाचं नाहीं. म्हणून म्हणतों, प्रभाकरराव, तुम्ही मला आतां राहण्याचा आग्रह करूं नये."

"मग आतां बोलणेंच खुंटलें!" प्रभाकर म्हणाला, "ठीक आहे तर आतां मी लवकरच शेतावरून जाऊन येतों म्हणजे आपण संगतीनेंच जावूं. मलाहि शहरांत थोडेसें काम आहे."

"पण जातां जातां एकदां यशवंतरावाची भेट झाली असती म्हणजे बरें होतें."

"त्याची आतां भेट होईल किंवा नाहीं तें कांहीं सांगतां येत नाहीं. पण आज जर त्याला भाऊसाहेबांनीं खाणीवर नेलं नाहीं तर आपण जातांना त्याची घरीं भेट होईल."

प्रभाकर शेतावर निघून गेल्यावर माधवरावानें आपलें स्नान आटोपून घेतलें. प्रभाकर शेतावरून यावयास पुष्कळ अवकाश आहे असें पाहून माधवराव आंबराईतून बाहेर पडला. आजचा शेवटचा दिवस आहे तेव्हां सहज एकदां देशमुखवाडीला चक्कर मारून यावें. आणि साधल्यास यशवंताची भेट घ्यावी असा त्याचा उद्देश होता. त्यावेळीं दहा वाजून गेले होते. माधवराव देशमुखवाडीच्या दरवाजाजवळ गेला

त्यावेळीं भाऊसाहेब दरवाजांतच उभे होते. आज ते खाणीवर लवकर जात होते. आधल्यादिवशीं खाणींत वाजवीपेक्षां जास्त सुरुंग लाविल्यामुळें खाण किती कोसळली याची त्यांनीं ह्या गडबडींत चौकशी केली नव्हती, म्हणून ते आज खाणीवर लवकर जात होते. त्यांचें चित्त आज बरेंच अस्वस्थ होतें. आपण इतक्या चतुराईनें रचलेला बेत अगदीं अखेरच्या पायरीवर ढासळला आणि त्या बरोबरच आपल्या कृष्णकर्मांचा चार चौघांत स्फोट झाला, ह्या गोष्टी त्यांच्या मनाला आतां सारख्या टोंचूं लागल्या. त्यांनीं योजल्याप्रमाणें सर्व गोष्टी सुरळीत पार पडून जर त्या गोष्टीचा स्फोट होता, तर त्याची संपादणी करण्यास त्यांनीं वाटेल त्या क्लृप्त्या लढविल्या असत्या. कारण त्या कामांत ते पुरे तरबेज होते. परंतु आतां काय? सर्वच बाजू अंगावर उलटली होती. तथापि त्यांचें मन मात्र स्वस्थ नव्हतें. एक बेत फसला म्हणून ती स्वारी नशिबाला दोष देत स्वस्थ बसणारी नव्हती. कारण रात्रींपासून दुसरा बेत रचण्यांत त्यांचें विशाल डोकें गुंतलें होतें. असो.

आपल्या वाड्याच्या दरवाजाजवळ माधवरावाला टेहळणी करतांना पाहून भाऊसाहेबांचें डोकें साहजिकच गरम झालें. ते पुढें होऊन म्हणाले, "काय हो, तुम्ही कोणाला पाहतां आहांत?"

परंतु माधवरावानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. तो तसाच पुढें जावूं लागला. त्यामुळें भाऊसाहेबांस जास्तच चीड येऊन ते जरा जोरानें म्हणाले, " अहो वकीलसाहेब, जरा थांबा. तुम्ही कोणत्या उद्देशानें येथें आलां अहांत तें एकदां मला कळूं द्या. तुमचे काय काय बेत चालू आहेत, ते सर्व मला कळतात तरी तुमच्या तोंडून एकदां मला कळूं द्या."

"कळतात ना, मग माझ्याच तोंडून वदविण्यांत काय जास्त आहे?—"

"अहो जरा नीट सरळ उत्तर द्या. तुम्ही कोणाबरोबर बोलत आहांत याचा कांहीं विचार केला काय?" माधवरावाला भीति दाखविण्याचा आंव घालून भाऊसाहेब थोडें तोऱ्यानें म्हणाले.

"मी पायरी सोडून बोलत असेन असें जर तुम्हांला वाटत असेल तर ती तुमची चुकी आहे. तुम्ही विचारतां त्याचीं मी सरळ उत्तरें देत आहें."

"असं काय?–पाहून घेईन तुमचीं उत्तरें!" भाऊसाहेबांचा पारा चढूं लागला. "तुमच्या चांगल्या नांग्या मोडल्याशिवाय तुमचीं तोंडं बंद व्हावयाचीं नाहींत."

"आतां आपली भाषा सभ्यपणाला अनुसरूनच आहे वाटतं?" माधवराव जरा खोंचून बोलला, "भाऊसाहेब, जरा विचार करून बोला. नाहींतर हें भाषण आपणाला परिणामीं जड जाईल, हें लक्षांत ठेवा."

"ठेवलं लक्षांत. तुमच्या अशा दटावणीला हा भाऊसाहेब भीक घालणार नाहीं, समजलांत?"

"समजेल–तेंही समजेल! भाऊसाहेब असे गुर्मींत येऊन बोलूं नका. घोडनदी कांहीं फार दूर नाहीं. मग कळेल कोण कोणाला भीक घालतो तें!"

"मग तुम्ही माझं काय करणार?" रागानें एकदम पुढें होऊन भाऊसाहेब म्हणाले.

"मी तुमचें काय करणार? न्यायदेवता कांहीं आजच झोंपली नाहीं."

"जा–जा–काय वाटेल तें करून घ्या. विचारतो कोण तुम्हाला!"

"असं असं! कळेल–आतां तुमचा पापाचा घडा पूर्ण भरला आहे. आतां तुम्हाला लवकरच काय तें कळेल! बिचारा गरीब यशवंतराव, म्हणून तो तुमच्या कारस्थानाला बळी पडला पण–पण आतां बोलून कशाला दाखवूं–?" इतकेंच अर्धवट बोलून माधवराव तेथून एकदम निसटला. त्याच्या मनांतून आतां जास्त प्रश्नउत्तरें करावयाचीं नव्हतीं.

भाऊसाहेब त्याच्याकडे पहातच रागाचे सुस्कारे सोडीत तेथेंच उभे राहिले. परंतु माधवरावाच्या अर्धवट भाषणाचा त्यांच्या मनावर परिणाम झालाच! गाडी येईपर्यंत ते त्याच वाक्याचा विचार करीत राहिले. "आतां बोलून कशाला दाखवूं?" ह्या वाक्याचा अर्थ काय असावा, याचा ते विचार करीत होते. थोड्या वेळानें गाडी आली. भाऊसाहेब गाडींत बसले आणि गाडी खाणीवर जाण्याकरितां निघाली.

माधवराव घरीं येत असतां वाटेंत त्याला शेतांतून परत येत असलेला प्रभाकर भेटला. त्याला त्यानें नुकताच घडलेला सर्व प्रकार सांगितला. तेव्हां प्रभाकर म्हणाला,

" माधवराव, आतां तुम्ही उगाच भाऊसाहेबांच्या तोंडीं लागलां ! तो मनुष्य कांहीं सरळ नाहीं. काल तुम्ही खाणीवर त्यांना जें कांहीं बोललां, त्याचा कसा परिणाम झाला तो तुम्ही पाहिलाच आहे. "

" पण मी असं म्हणतों कीं, तुम्ही भाऊसाहेबांना एवढें घाबरतां का ? तुमचं तर त्यांना कांहींएक वाकडं करतां येत नाहीं ना ?-मग झालं तर ! "

" माझं जरी त्यांना कांहीं वाकडं करतां येत नसलं तरी यशवंताविषयीं—ताईसाहेबांविषयीं नको का कांहीं विचार करायला ! "

अशा प्रकारें बोलत बोलत ते दोघेजण घरीं आले. आज माधवराव जाणार असल्यामुळें पंक्तीला दोन पदार्थ जास्त केले होते. एक वाजेपर्यंत त्यांचें भोजन आटोपलें. नंतर त्यांनीं आपली जाण्याची तयारी केली. मुंबईस परत जाणारी बोट बंदरावर तीन वाजतां येत असे. लवकरच गाडी जोडून ते दोघे मित्र जाण्यास निघाले. प्रभाकराला आज शहरांत जाण्याचें कारण त्याला मुकुंदशेटनां भेटावयाचें होतें. त्यांनीं प्रभाकराला एक शेत व वाडी घेऊन देण्याचें कबूल केलें होतें ती गोष्ट वाचकांच्या स्मरणांत असेलच ! त्याचबद्दल तो आज मुद्दाम शेटजींना भेटणार होता. हळुहळू त्यांची गाडी खाणीच्या गेटाजवळ आली. तेथें घोड्याला पाणी पाजून मग पुढें जावें अशा उद्देशानें मल्हारीनें गेटाजवळ गाडी उभी केली. वाटेंत येत असतां मुकुंदशेटनीं आपणास कोणतें शेत घेऊन देण्याचें कबूल केलें आहे तें प्रभाकरानें माधवरावास दाखविलें. आणि त्यावरच त्यांच्या आतां गोष्टी चालल्या होत्या. थोड्या वेळानें घोड्याला पाणी पाजून गाडी पुनः जोडल्यावर ते दोघे मित्र गाडींत बसले. त्यावेळीं बोलतां बोलतां माधवराव म्हणाला, " माझी मनोदेवता मला ग्वाही देते कीं, आज तुमचें काम अगदीं सोळा आणे फत्ते होईल—"

हें इतकेंच अर्धवट वाक्य त्याचवेळीं दरवाजाजवळ आलेल्या एका व्यक्तीनें ऐकलें. आणि ती व्यक्ति म्हणजे भाऊसाहेब होत. गेटाजवळ प्रभाकराची गाडी आली, त्यावेळीं भाऊसाहेब आंत बसले होते. दरवाजाजवळ गाडी येऊन उभी राहतांच आपणास कोणीतरी भेटण्याकरितां आलें असावें असें त्यांना वाटलें परंतु बराच वेळ कोणी आंत आलें नाहीं, म्हणून ते उठून बाहेर येऊं लागले. परंतु दरवाजांत येतांच प्रभाकराची गाडी

दृष्टीस पडली म्हणून ते दरवाजांतच थबकले. आणि आडून ऐकूं लागले. परंतु ' लपून ऐकणारास नेहमीं स्वतःची निंदाच ऐकूं येते ! ' असें जें म्हणतात तें अगदीं खरें आहे. माधवरावानें उच्चारलेलें व त्यांनीं ऐकलेलें अर्धवट वाक्य आपणासच उद्देशून आहे, असें त्यांना वाटलें. ते तेथेंच त्या वाक्याचा विचार करीत राहिले, तोंपर्यंत प्रभाकराची गाडी गेटावरून निघून गेली.

भाऊसाहेबांचें मन अवस्थ झालें. खाणीवर येतांना सकाळीं त्यांची आणि माधवरावाची जी थोडावेळ बाचाबाची झाली, त्यांत देखील माधवरावाच्या अर्धवट वाक्यानें त्यांचें मन अस्वस्थ केलें होतें. त्या वाक्याचा आणि आतां आडून ऐकलेल्या वाक्याचा ते मेळ बसवूं लागले. परंतु त्या वाक्यांत मेळ बसावा कसा ? ' चोराच्या मनांत चांदणें ' त्याच प्रमाणें त्यांचें कारस्थानी मन त्या ऐकलेल्या वाक्यांत कारस्थान आहे, असें त्यांना स्पष्टपणें सूचवूं लागलें. आपण उपभोगीत असलेली देशमुखवाडी आपणाकडून हिसकावून घेण्याचा त्यांचा प्रयत्न आहे, हें तर त्यांना केव्हांच कळून चुकलें होतें. प्रभाकर आणि यशवंत एकमत होऊन त्यांनीं माधवराव वकिलास पुण्याहून मुद्दाम बोलाविले आहे, हें त्यांना समजलेंच होतें. आणि तेव्हांपासून त्यांचें मन गडबडलें होतें. आपणाविषयीं लोकमत काय आहे हेंहि त्यांना माहित होते. शिवाय कालच्या आणि आजच्या प्रत्यक्ष भाषणावरून माधवराव वकिलास आपल्या कारस्थानाच्या बऱ्याच गोष्टी कळल्या आहेत, आणि चांगले पुरावेहि त्याला मिळाले आहेत म्हणूनच तो इतक्या चढेल पणानें आपणाशीं वागला असें आतां त्यांना वाटूं लागलें. आतां तो आणि प्रभाकर शहरांत गेले, त्याचें कारण दुसरें तिसरें कांहीं नसून केवल ते सरकारी मदत घेण्याकरितांच गेले असावेत असाहि एक विचार त्यांच्या मनांत आला. बराच वेळ ह्या गोष्टीचा विचार केल्यावर त्यांना पुढल्या गोष्टी स्पष्ट दिसूं लागल्या. जसा जसा ते जास्त विचार करूं लागले, असें तसें त्यांचें मन जास्त गोंधळूं लागलें. आतां आपण ह्या मंडळींनां विरोध केला नाहीं, तर हें प्रकरण आपणास पुढें फार जड जाईल असा एक विचार त्यांच्या मनांत आला. परंतु आपण ह्या मंडळींना विरोध कसा करणार हें मात्र त्यांना कांहीं सुचेना.

शेवटीं बराच वेळ विचार केल्यावर आपल्या विश्वंभर वकिलास जावून भेटावें व त्यांस सर्व गोष्टी सांगून त्यांचा सल्ला घ्यावा असा विचार त्यांच्या मनांत येतांच ते एकदम उठले आणि हरिभाऊला हांक मारून ' आपला घोडा आला काय ? ' म्हणून त्यांनीं चौकशी केली. परंतु घोडा यावयास अद्यापि पुष्कळ अवकाश आहे, असें कळतांच त्यांनीं खाणीवरील एका मजुराला घोडा आणण्याकरितां घरीं पिटाळलें.

घोडा येईपर्यंत आपण पुढें काय करावें, कसा व्यूह रचावा, ह्या मंडळींना कसें हाणून पाडावें इत्यादि विचार त्यांच्या मनांत सारखे चालले होते. आतां आपल्या कृष्णकटांत आपल्या वकिलाला घेतल्याशिवाय, त्याला आपली सर्व कारस्थानें उघड उघड सांगितल्याशिवाय गत्यंतर नाहीं असें पाहून भाऊसाहेबांस थोडें चमत्कारिक वाटूं लागलें. परंतु करतात काय ?— ' अडला नारायण गाढवाचे पाय धरी ! आपलीं कारस्थानें परक्याला स्वमुखानें सांगून, आलेल्या नवीन संकटाला तोंड देण्याकरिता स्वतःला परक्या मनुष्याचा नवीन शह लावून घेतल्याशिवाय त्यांना दुसरा मार्गच नव्हता. असो.

अडीच वाजण्याच्या सुमारास त्यांचा घोडा आला. तेव्हां भाऊसाहेब ' मला शहरांत फार जरूरीचें काम आहे म्हणून जातों ' असें हरिभाऊस सांगून ते घोड्यावर स्वार झाले आणि शहरांत जाण्याकरितां निघाले. त्यांच्या वकिलाची कचेरी फुल शहरांत होती. विश्वंभर वकील म्हणजे सर्व जंजिऱ्यांतील एक प्रसिद्ध व्यक्ति होती. त्याची ' प्राक्टिस ' जरी दांडगी नव्हती, तरी त्याचें उत्पन्न फार दांडगें होतें. तो मोठा पाताळयंत्री मनुष्य होता त्याचा संबंध नसावा म्हणून पक्षकार त्याच्याकडे जाण्यास तयार नसत. परंतु योगायोगच असा विलक्षण असे कीं, विश्वंभर वकिलाशिवाय त्यांचें सरकारदरबारीं कामच होत नसे. तीन वाजण्याच्या सुमारास भाऊसाहेब शहरांत आले. त्यांचा रस्ता मुकुंदशेटच्या पेढीवरूनच होता. तेव्हां ते पेढीवरून जात असतां शेटजीजवळ बसलेल्या प्रभाकरानें त्यांना पाहिलें. तो नुकताच आपल्या मित्राला—माधवरावाला बंदरावर पोंचवून तेथून परत आला होता. तो शेटजीजवळ आंतल्या बाजूला बसलेला असल्यामुळें भाऊसाहेबांच्या दृष्टीस पडला नाहीं आणि त्यांनीं देखील मुद्दाम पेढीवर डोकावून पाहिलें नाहीं. मागें नवव्या प्रकरणांत प्रभाकराची ' पेढीवरून सुटका ' झाली, त्यावेळीं भाऊसाहेबांचा आणि मुकुंदशेटचा जो खटका उडाला, ती हकीकत वाचकांच्या स्मरणांतून

गेली नसेलच ! त्या दिवसापासून भाऊसाहेब मुकुंदशेटजींच्या पेढीवर गेले नाहींत. ते गेल्या तीन वर्षांत कैक वेळां कामानिमित्त शहरांत गेले होते परंतु चुकून सुद्धां त्यांनीं शेटजीच्या पेढीकडे पाहिलें नाहीं. त्या वेळच्या खटक्यांत शेटजींनीं बोलतां बोलतां भाऊसाहेबांचें जसें धावें दणाणून सोडलें होतें, तोच प्रकार ह्या एकदोन दिवसांत माधवरावानें केला होता.

भाऊसाहेब शहरांत येतांच त्यांनीं आपला घोडा विश्वंभर वकिलाच्या घराकडे वळविला. ओटीवरच त्यांना एक मनुष्य भेटला होता. तो विश्वंभर वकिलाचा घरांतील सांगकाम्या नोकर असून त्यांच्या कचेरींत कारकूनीहि करीत असे. त्यानें भाऊसाहेबांस पाहतांच उठून नमस्कार केला, तेव्हां भाऊसाहेबांनीं विचारलें, " काय व्यंकोबा, विश्वंभरराव आहेत काय ? "

" नाहींत. ते कालच्या बोटीनें मुंबईस गेले आहेत. "

" अरेरे !—पण येतील केव्हां ? "

" तें कांहीं सांगून गेले नाहीं. पण आठ चार दिवस कांहीं येत नाहींत एवढें खरें ! "

" आतां काय करावं ह्या गृहस्थाला ! केव्हां येणार तें देखील सांगितलें नाहीं ? बरं—मुंबईंत कुठें गेले आहेत ? "

" तेंहि कांहीं माहित नाहीं. पण बहुधा सरदारगृहांत ते उतरतात, इतकं मला ठाऊक आहे. "

भाऊसाहेब बराच वेळ विचार करीत उभे राहिले. आतां पुढें काय करावें हें त्यांना सुचेना. इतक्यांत त्यांना एक विचार सुचला. ते म्हणाले, " कायरे व्यंकोबा, आतां मी बंदरावर गेलों तर मला बोट मिळेल काय ? अद्यापि तीन वाजले नाहींत. बोट आली असेल का बंदरावर ? " खिशांतील घड्याळ पहात भाऊसाहेब म्हणाले.

" हो—मिळेल तर काय झालं ! मुंबईची आगगाडी जशी टाईमाटाईमावर येते, तशी आगबोट थोडीच टाईमावर येते ! आतां घाई केलीत तर मिळेलही ! "

भाऊसाहेबांनीं तात्काळ घोडा फिरवून बंदराच्या रस्त्याला घोडा फेंकला. आज बंदरावर बरीच गर्दी होती. खाडींत बोट आली होती परंतु अद्यापि ती धक्क्याला

लागली नव्हती. भाऊसाहेबांनीं टिकीट ऑफिसांत जाऊन मुंबईची वरच्या वर्गाची टिकीट काढिली. आतां त्यांना घोडा परत देशमुखवाडींत कसा पाठवावा, ही काळजी पडली. शिवाय मुंबईस जाण्याचा त्यांचा एकाएकीं बेत झाल्यामुळें त्याविषयीं घरींहि कोणाला कांहींच माहित नव्हतें. आपण सायंकाळीं नेहमींप्रमाणें घरीं गेलों नाहीं तर घरची मंडळी काळजी करीत राहतील, तेव्हां आतां काय करावें हाहि त्यांना विचार पडला. इतक्यांत दुसऱ्या एका उतारूचें ओझें घेऊन सांवळ्या येत असतां त्यांच्या दृष्टीस पडला. तेव्हां त्याला हांक मारून ‘ओझें ठेवून लवकर ये’ असें त्यांनीं सांगितलें. तो परत येईपर्यंत भाऊसाहेबांनीं आपल्या खिशांतील रोजनिशी काढून तींतील एक पान फाडलें आणि ‘मी मुंबईंत कांहीं निकडीच्या कामा करितां जात आहें, काम होतांच परत येईन, वाट पाहूं नये. व्यवस्थेनें रहा.’ असें त्यावर लिहिलें. थोड्या वेळानें सावळ्या आला, तेव्हां ते म्हणाले, “सांवळ्या, हा घोडा आणि हें पत्र घरीं घेऊन जा. नीट संभाळून जा. घोड्याला हातीं धरून ने. घोड्यावर बसूं नकोस. काय समजलास ? आणि हें घे.” असें म्हणून त्यांनीं त्या पोराच्या हातावर एक चवली ठेविली.

दृष्टी आड होईपर्यंत सांवळ्या घोड्याला हातार्शी धरून चालवीत होता. नंतर त्यानें एकदां मागें वळून पाहिलें. भाऊसाहेब दिसत नाहींत असें पाहून तें अचपळ पोर घोड्यावर स्वार होऊन घोडा उडवीत निघालें.



# प्रकरण २९ वें.



## सल्ला घेतला.



भाऊसाहेबांच्या मनाची स्थिति आणि ते ज्या बोटींतून प्रवास करीत होते, त्या बोटीची स्थिति अगदीं सारखीच होती बोट पाण्यावर हेलकावे खात होती आणि त्यांचें मन विचारांत हेलकावे खात होतें. आपण आतां विश्वंभर वकिलाला भेटून सर्व गोष्टींचा योग्य बंदोबस्त करूं अशी त्यांना खात्री वाटत होती. परंतु त्यांतूनहि त्यांचें मन अस्वस्थ होतें. आपल्या गैरहजिरींत आपल्या मागें लागलेली मंडळी काय काय कारस्थानें करीत राहतील आणि यशवंताला कसें शिकवून ठेवतील याची त्यांना कल्पना होईना. आपण मुंबईस जाण्याचा बेत करण्यापूर्वीं यशवंत आणि प्रभाकर यांच्या भेटी न होतील अशी कांहीं तरी व्यवस्था करावयास पाहिजे होती, असें आतां त्यांना वाटूं लागले. आणि आपण हा विचार न करतां मुंबईस जाण्याची फार घाई केली म्हणून त्यांचें मन त्यांना आतां खावूं लागलें.

भाऊसाहेब डेकवर कठड्याला धरून समुद्रसपाटीवर येणाऱ्या शुभ्र फेंसाकडे शून्य दृष्टीनें पहात होते. थोड्या वेळ ते अशा प्रकारें डेकच्या कठड्याजवळ उभे राहात, तर थोडा वेळ तेथें ठेविलेल्या एखाद्या खुर्चीवर बसत; असा प्रकार चालला होता. त्यांची ही हालचाल त्यांचें मन किती अस्वस्थ झालें आहे याची साक्ष पटवीत होती. थोड्या वेळानें एक गृहस्थ त्यांच्या बाजूला कठड्याजवळ येऊन उभा राहिला आणि म्हणाला, " काय भाऊसाहेब, आज कुणीकडे निघाली स्वारी ? "

भाऊसाहेबांनीं बाजूला वळून पाहिलें. ते रामकृष्णपंत कंट्राक्टर होते. भाऊसाहेब ह्मणाले, " जातों जरा मुंबईंत. एका कामांत वकिलाची सल्ला—"

इतक्यांत रामकृष्णपंताच्या मागें उभा असलेला माधवराव भाऊसाहेबांच्या दृष्टीस पडला. त्यामुळें त्यांचें वाक्य अपुरेंच राहिलें. माधवरावानें त्यांना बोटीवर चढतांना

पाहिलें आणि तो पुनःकांहीं तरी खुसपट काढण्याच्या विचारांत होता. गेल्या दोन चार प्रकरणांत ह्या पुण्याहून आलेल्या व्यक्तीचा ठिकठिकाणीं उल्लेख झालाच आहे. त्यावरून माधवराव कोणत्या स्वभावाचा होता हें वाचकांच्या लक्षांत आलें असेल. त्याला पाहतांच भाऊसाहेब अडखळले, याचें कारण आपण मुंबईंत का जातों, हें त्याला कळूं देऊं नये हा त्यांचा उद्देश होता. ते माधवरावाकडे पहात रामकृष्णपंतांना म्हणाले, " आपण कुणीकडे जात आहांत ? "

" मी जातों जरा मुंबईंत लोखंडाच्या तुळई खरेदी करण्याकरितां ! आणि आपण ह्यांना ओळखतां काय ? " मागें असलेल्या माधवरावाकडे पाहून रामकृष्णपंत म्हणाले.

भाऊसाहेबांनीं किंचित् भिवया चढवून मान हालवीत 'होय' म्हणून उत्तर दिलें. तेव्हां माधवरावच पुढें होऊन म्हणाला, " मीहि जातों आहें मुंबईंत ! भाऊसाहेब आणि मी एकाच कामाकरितां मुंबईंत जातों. ते वकिलाचा सल्ला घेणार आहेत पण मी एका प्रख्यात ब्यारिस्टराचा सल्ला घेणार आहें."

माधवरावाच्या उत्तरानें तर भाऊसाहेबांचे हातपायच गळले ! त्यांना खिजविण्याकरितांच माधवराव असें म्हणाला होता. वास्तविक तो कुणीकडे निघाला होता हें वाचक जाणतातच !

पुढें मुंबई येईपर्यंत भाऊसाहेब फारसें कुणाबरोबरच बोलले नाहींत. आणि माधवरावानेंहि त्यांच्या बरोबर बोलण्याचा प्रयत्न केला नाहीं. मुंबईस सायंकाळच्या सुमारास उतरतांच माधवरावानें भाड्यानें व्हिक्टोरिया करून बोरीबंदरचा रस्ता धरला आणि भाऊसाहेब सरदारगृहांत जाण्याकरितां निघाले. ते फारच क्वचित् मुंबईस येत असत, त्यामुळें त्यांना मुंबईची चांगलीशी माहिती नव्हती. सरदारगृहांत येतांच त्यांनीं विश्वंभर वकिलाची चौकशी केली. परंतु कोणीच त्यांना वकिलसाहेबांचा पत्ता सांगेना. शेवटीं गृहाचा म्यानेजर त्यांस भेटला, तेव्हां त्यानें आपल्या रजिस्टर बुकांत वकिल साहेबांचें नांव पाहिलें. आणि आपल्या नोकरांजवळ चौकशी केली तेव्हां ' वकिलसाहेब सरदार गृहांत आधल्या दिवशीं आले होते. व एक वेळचें जेवण करून ते कामाकरितां ठाण्यास गेले आहेत. तेथून ते शनिवारीं येतील.' असें त्यांस कळलें. भाऊसाहेब विचारांत पडले. आतां दोन दिवस काय करावें, ह्या त्यांना मोठा प्रश्न पडला. त्यांचा जीव टांगल्या सारखा

झाला. दोन दिवस येथें रहावें किंवा परत जंजिऱ्यास जावें हें त्यांना कांहीं सुचेना. शेवटीं त्यांचा विचार ठरला. आपल्या मागें वाटेल तें होवो परंतु आतां विश्वंभर वकिलास भेटल्याशिवाय आणि त्याचा सल्ला घेतल्याशिवाय येथून परत जावयाचें नाहीं, असा त्याचा निश्चय ठरला.

ते दोन दिवस भाऊसाहेबांस दोन युगासारखे वाटले. त्यांच्या मनांत अनेक प्रकारचे बरे वाईट विचार येत होते. यशवंत—आपला प्रतिस्पर्धी जगांतून नाहींसा झाल्याशिवाय आपणास स्वस्थपणा येणार नाहीं आणि तो जिवंत आहे तोंपर्यंत आपण कितीहि धडपड केली तरी ती व्यर्थ आहे; असेंच त्यांना राहून राहून वाटत होतें. तो लहान असतांनाच आपण आपला कार्यभाग उरकून घेतला असता म्हणजे आतां आपणास इतका त्रास पडला नसता असे विचार त्यांच्या मनांत येऊन आपल्या हातून घडलेल्या ह्या चुकीबद्दल आतां त्यांना फार पश्चात्ताप होऊं लागला.

शेवटीं शनिवारचा दिवस उजाडला. ह्या दोन दिवसांत त्यांच्या मनाची स्थिति जशी झाली होती, तशी स्थिति त्यांनीं आपल्या सर्व आयुष्यांत केव्हांहि अनुभविली नव्हती. आपल्या वकिलाची वाट पाहून शेवटीं त्याची सकाळची येण्याची वेळ टळल्यावर त्यांनीं आपलें प्रातर्भोजन आटोपून थोडावेळ वामकुक्षि करण्याचा विचार केला परंतु कांहीं केल्या त्यांना झोंप येईना. त्यांचें सर्व लक्ष विश्वंभर वकिलाच्या वाटेकडे लागलें होतें. पुष्कळवेळ चळवळ केल्यावर त्यांचा डोळा लागला. थोड्याच वेळांत त्यांना एक स्वप्न पडलें. त्या स्वप्नांत त्यांनीं चमत्कारिक देखावा पाहिला. ' आपण आजवर हजारो युक्त्या लढवून, खऱ्याचें खोटें करून आणि रक्ताचें पाणी करून जें कांहीं मिळविलें आणि तें पन्नास गांठी मारून ठेवलेलें डबोलें आपला नाहींसा झालेला मेहुणा एकाएकीं प्रगट होऊन आपणापासून बळजोरीनें हिरावून घेत आहे ' असा भयंकर देखावा पाहतांच ते स्वप्नांतून ओरडत जागे झाले.

" काय भाऊसाहेब असें ओरडता का ? स्वप्नांत भ्यालांत वाटतं ? अहो, जर तुम्ही भर दोनप्रहरीं स्वप्नांत असें भिवून ओरडूं लागला तर मग रात्रीं–"

" पण विश्वंभरराव तुम्ही केव्हां आलांत ? मी तुमची दोन दिवस सारखी मार्गप्रतिक्षा करीत येथें माशा मारीत बसलों आहे. "

" का बरं ? इतकं काय निकडीचं काम आहे ? "

" काय निकडीचं काम आहे ! गृहस्था ! मोठा आणीबाणीचा प्रसंग आहे. हे दोन दिवस मी कसे घालविले आहेत तें माझ्या जिवालाच ठाऊक ! "

" पण इतका काय प्रसंग ओढवला आहे, तें तरी एकदां कळूं द्या. "

प्रथम भाऊसाहेब आपलें मन उघड करीनात. त्यांनीं वरवर हकीकत सांगितली, तेव्हां विश्वंभर वकील म्हणाले, " मग यांत एवढं भिण्यासारखं काय आहे ? तो मोठा वकील–नव्हे वकिलाचा बाप जरी असला तरी त्याला तुमच्या विरुद्ध पुरावा काय आहे ? तुम्ही यशवंताचा छळ करतां असं तो कशावरून सिद्ध करूं शकेल ? "

आपण यशवंताचा कसा छळ केला तें न सांगतां विश्वंभर वकिलाची समजूत पटवि-विण्याचा भाऊसाहेबांनीं पुष्कळ प्रयत्न केला. परंतु तसा प्रयत्न करीत असतां भाऊसाहेब आपणापासून कांहीं तरी मुद्याच्या गोष्टी छपवून ठेवितात असा विश्वंभररावास संशय आलाच ! ते म्हणाले, " हें पहा भाऊसाहेब, तुम्ही खऱ्या काय काय गोष्टी आहेत त्या जर मला सांगितल्या नाहींत तर मग मी आपणास सल्ला तरी काय देणार ? –भाऊसाहेब, अशी लपवालपवी आणि छपवाछपवी करून कसं चालेल ! काय आहे तें सर्व उघड सांगा. अहो, सुईणीजवळ, डॉक्टराजवळ त्याप्रमाणें वकिलाजवळ सुद्धां कांहींएक छपवून चालत नाहीं, हें तुम्ही विसरलांत वाटतं ! "

इतकी प्रस्तावना झाल्यावर भाऊसाहेबांनीं हळुहळू सर्व हकीकत आपल्या वकीलाला सांगि-तली. विश्वंभरराव वकील मुकाट्यानें ती हकीकत ऐकत होते. भाऊसाहेबांचा जरी तो वकील होता, तरी त्याला आपलें कुळ इतकें कारस्थानी असेल अशी कल्पना देखील नव्हती. प्रभाकराकडे माधवराव वकील आल्यानंतर आपणास कशी दहशत पडली, आणि आपण यशवंताचा कांटा काढण्याकरितां कसा प्रयत्न केला व तो कसा फसला, इत्यादि सर्व हकीकत त्यांनीं प्रामाणिकपणें शेवटीं आपल्या वकिलास सांगितली, तेव्हां ते म्हणाले–"

" आतां सर्व गोष्टी माझ्या चांगल्या लक्षांत आल्या आणि तुम्ही इतक्या तांतडीनें इकडे–माझ्या मागें कां आलांत तेंहि कळलें !" असें ह्मणून वकिलसाहेब थोडावेळ विचा-रांत मग्न झाल्यासारखे दिसले. नंतर त्यांनीं विचारलें, "पण भाऊसाहेब, तुमच्या श्वशुरांनीं –दादासाहेब देशमुखांनीं उइलपत्र केलें होतें काय ? "

" नाहीं–होय–केलं होतं पण–" भाऊसाहेब अडखळूं लागले !

" समजलों–समजलों ! त्यांनीं उईलपत्र केलं होतं पण तुम्ही त्याची योग्य ती व्यवस्था लावली असंच ना ? " भाऊसाहेबांनीं होकारार्थी मान हालविली. तेव्हां विश्वंभररावानें पुढें विचारलें, " बरं आतां यशवंताचें वय काय ? "

" त्याला आतां अठरावें वर्ष चालू आहे. "

पुष्कळ वेळ विश्वंभररावानें विचार करून ह्मटलें, " तुह्मी आपला हेतु साध्य करून घेण्याकरितां जी योजना केली होती, ती जर साधली असती तर आज तुमची ही धांवाधांव होती ना ! कारण दादासाहेब देशमुखांची सर्व इस्टेट त्यांच्या मुलीला म्हणजे तुमच्या कुटुंबालाच मिळती. परंतु हा यशवंत असल्यामुळें—"

" होय–होय, त्याकरितांच तर मी इतका धडपडतों ! त्यांतून हा मध्येंच उपटसूळ वकील येऊन मध्यें बिब्बा घालतो आहे–"

" म्हणूनच म्हणतों कीं, ही देशमुखवाडी पचवायची असेल तर प्रथम ह्या यशवंताची व्यवस्था करा. आणि ती व्यवस्था झाली नाहीं तर तुमचें कांहीं एक चालावयाचें नाहीं. पण मी म्हणतों, तुम्ही इतके दिवस असें कसें स्वस्थ बसला होता ? "

" काय सांगूं हो ! तो झाला खरा मूर्खपणा ! पण आतां ह्याशिवाय दुसरी कांहींच तोड राहिली नाहीं काय ? "

बराच वेळ त्यांच्या गोष्टी झाल्या. शेवटीं काय करायचें त्याचा एकदाचा निर्णय झाला. तेव्हां भाऊसाहेब उठले. तें पाहून विश्वंभरराव म्हणाले, " मग आतां तयार होऊन तुह्मी चालला कुठें ?–कुठें बाहेर जावयाचें आहे कीं काय ? "

" छे ! छे ! आतां निघालों एकदम जंजिऱ्याला. आतां ह्या गोष्टीचा एकदां सोक्षमोक्ष लावल्याशिवाय मला चैन पडायचं नाहीं ! "

" पण आतां तुह्मी जाणार कसे ? आतां बोट कुठें आहे ? बोट आतां उद्यां ११ वाजतां ! "

" बोट नसली तरी पडाव आहेत कीं नाहीं ? "

" होय पण आतां इतकी घाई कां ? आपण उद्यां दोघेहि संगतीनेंच जावूं. "

परंतु भाऊसाहेब कांहीं केल्या ऐकेनात ! ते तसेच व्हिक्टोरिया करून बंदरावर आले. आणि एक भाड्याचा मचवा करून निघाले. सुदैवानें त्यावेळीं वाराहि अनुकूल होता.

---

# प्रकरण ३० वें.

## गंजी पेटली.



"अग कमला, तूं ही किती उंच वाढलीस ! परवां मीं तुला पाहिलं तेव्हां तूं परकर किंग नेसत होतीस !" सगुणाबाई आश्चर्यानें कमळेकडे पहात म्हणाली. तेव्हां तिनें हास्य मुद्रा करून पदरानें आपलें तोंड झांकून घेतलें. "आतां तर तूं मोठी—लग्नाला योग्य झालीस ! ये, बैस—" असें म्हणून सगुणाबाईनें तिला आपल्याजवळ बसविलें.

प्रभाकर आणि कमला त्यांच्या घरीं असलेल्या सत्यनारायणाच्या पूजेबद्दल आमंत्रण देण्याकरितां मुद्दाम देशमुखवाडींत आले होते. आज त्यांच्या घरीं होणारी पूजा बरीच कडाक्यानें होईल असा रंग दिसत होता. कारण प्रभाकरानें आपल्या सावत्र आईच्या अनुमतानें सर्व कुळांना पूजेबरोबर जेवणाचेंहि आमंत्रण दिलें होतें. आणि आंबराईत हा इतका मोठा बेत सजण्याचें कारणही तसेंच होतें. भाऊसाहेबांच्या मगरमिठींतून सुटका झाल्याबद्दल त्या लहानशा कुटुंबाला आनंद झाला होताच, परंतु दोन दिवसांपूर्वीं मुकुंदशेटनीं प्रभाकराला कबूल केल्याप्रमाणें वाघमाऱ्याची वाडी त्याला घेऊन दिली होती आणि त्या रकमेची फेड त्यानें हळुहळू उत्पन्नांतून करावी असें ठरलें होतें. अशा रीतीनें त्यांचा आनंद द्विगुणीत झाला होता. आज आपणास इतके सुखाचे दिवस यावयास आपला सावत्र मुलगा—प्रभाकरच कारण आहे हें सावित्रीबाई जाणून होती. प्रथम प्रथम तिच्या मनांत प्रभाकराविषयीं थोडा सापत्नभाव होता परंतु आपल्या मेहनती, सालस आणि मनमिळाऊ स्वभावानें त्यानें लवकरच आपल्या सावत्र आईचें पूर्ण प्रेम संपादन केलें. प्रभाकरावर सर्व कुळें अगदीं खूष होतीं. तीं भाऊसाहेब देशमुखापेक्षांहि त्याला जास्त मान देत असत.

आजच्या आनंदाच्या प्रसंगीं मधुकर घरीं असावा अशी प्रभाकराची फार इच्छा होती. त्यानें दोन दिवसां पूर्वीं माधवराव पुण्यास जाण्याकरितां निघाला, त्यावेळीं त्या-

च्या बरोबर निरोप पाठवून त्याला घरीं बोलवावें म्हणून हळूच सावित्रीबाई जवळ गोष्ट काढिली. परंतु तिनें ती गोष्ट कबूल केली नाहीं. ' तुला जर आपल्या आनंदाचा विरस करून घ्यावयाचा असेल तर त्याला बोलाव. परंतु मी मात्र त्याचें तोंड पाहणार नाहीं. ' असें तिनें स्पष्ट मत दिलें. ती मोठी कगरी स्त्री होती. आईचा इतका निश्चय कळल्यावर प्रभाकराला गप्पच राहावें लागलें. असो, वर लिहिल्याप्रमाणें प्रभाकर आणि कमला आमंत्रण देण्याकरितां देशमुखवाडींत आलीं.

" आज प्रसादाकरितां आणि जेवणाकरितां आपण सर्वांनीं आलं पाहिजे. " प्रभाकर म्हणाला, " भाऊसाहेब घरीं असते म्हणजे त्यांनाहि आमंत्रण दिलें असतें. "

" ते नाहींत म्हणूनच जरा - "

" म्हणून काय आम्हा गरिबाकडे येणार नाहीं कीं काय ? "

" छे ! छे ! प्रभाकर तसं नाहीं. अरे वेड्या, गरीब कोण आणि श्रीमंत कोण ? सगळे आपण सारखेच ! "

" असं कसं म्हणतां ताईसाहेब ! आपण किती झालं तरी देशमुख आणि आम्ही गरीब शेतकरी—"

" म्हणूनच वाटतं देशमुखांच्या घराण्यांतील मुलीची मागणी केलीस ! " असें म्हणून कमळेबरोबर पलीकडे बोलत असलेल्या कृष्णीकडे सगुणाबाईनें पाहिलें. तेव्हां तिनें लज्जेनें आपली मान खालीं घातली. प्रभाकरहि निरुत्तर झाल्यामुळें वेळ मारून नेण्याच्या उद्देशानें म्हणाला, " बाबुराव आणि यशवंत खाणीवर गेले असतील ना ?—आणि वत्सला कुठें आहे ? "

" ती वर आहे. पण हें पहा प्रभाकर, मी ताईंना विचारून तुला सांगतें. " असें म्हणून मुलांना पूजेकरितां पाठवावें किंवा नाहीं, हें दुर्गाताईला विचारण्याकरितां सगुणाबाई उठून आंत गेली. आणि प्रभाकरहि तिच्या मागून माडीवर गेला. वत्सला आरामखुर्चीवर बसून एक कादंबरी वाचीत होती. जिन्यावर पावलें वाजलेलीं तिनें ऐकलीं. परंतु इंदु किंवा कृष्णा आली असेल असें वाटून तिनें मागें वळून पाहिलें नाहीं. प्रभाकर खुर्चीजवळ जाऊन उभा राहिला, तेव्हां तिनें वर पाहिलें. आणि प्रभाकर दृष्टीस पडतांच ती चटकन् उठून उभी राहिली.

" ओहो ! आज अगदीं मुद्दाम येणं केलं ! मीं दोन दिवस तुमची किती वाट पाहिली म्हणून सांगू ! शेवटीं मी दुसरं एक पत्रहि लिहून ठेवलं आहे. पण माझ्या पहिल्या पत्राचं उत्तर कुठें आहे ? द्या ना गडे पत्राचं उत्तर—" असें ह्मणून ती प्रभाकराच्या अंगाजवळ भिडली !

" मला अलीकडे बिलकूल वेळ नाहीं. गेले दोन दिवस मला इतकं काम होतं कीं—"

" अहाहा ! चार ओळी लिहिण्याइतका देखील वेळ नाहीं वाटतं ? "

" खरोखरीच नाहीं. मी तुमच्या जवळ खोटं बोलेन असं का तुम्हाला वाटतं ? "

" पण मी कुठें म्हणते, तुह्मी खोटं बोलतां म्हणून !— बरं नाहीं उत्तर तर नाहीं. पण आतां तोंडी तरी सांगायला वेळ आहे ना ?–मग सांगा तर मग. " प्रभाकराचा हात धरून लडिवाळपणानें हांसत वत्सला म्हणाली.

प्रभाकर अगदीं पेंचांत सांपडला. तिला एकदम झिडकारून टाकावें, असें त्याच्या मनांत होतें. इतक्यांत ऐनवेळेवर त्याची बहीण त्याच्या सुटकेकरितां आली. ती वर येत असतां जिन्यांत तिचें पाऊल वाजतांच वत्सला आपोआप प्रभाकराचा हात सोडून दूर झाली. थोड्या वेळानें कमळा वर आली. तिनें रितीप्रमाणें वत्सलेला पूजेचें आमंत्रण दिलें. आणि ती परत जाऊं लागली. तेव्हां प्रभाकरहि तिच्या मागून निघाला तें पाहून वत्सला हळूंच म्हणाली, " मग मला सांगतां ना ?–थांबा जरा–हें काय ?–इतकी काय मेली घाई ! "

परंतु तिचें भाषण ऐकलें न ऐकलें असें करून प्रभाकर जिना उतरतांना मागें वळून म्हणाला, " मग वत्सलाबाई, आज पूजेला अवश्य यावयाचें बरें ! "

दुर्गाताईनें परवानगी दिल्यावर मुलें पूजेकरितां प्रभाकराकडे गेलीं. बाबुराव मात्र गेला नाहीं. वत्सलेनें तर आज विशेष थाट केला होता. ती आज आपल्याच विचारांत गर्क होती. कृष्णीनें आपणाबरोबर प्रभाकराच्या घरीं येऊं नये म्हणून तिनें प्रथम कुरकूर केली. परंतु ' इंदूला कोण सांभाळील ? ' असें ताईनें दरडावून विचारल्यामुळें तिला गप्प बसावें लागलें. वाटेनें चालत असतां ती स्वतःशीं अनेक बेत योजीत होती. तिनें आपल्या पोलक्याच्या खिशांत दुसरें लिहिलेलें पत्र ठेविलें होतें. तें पत्र संधी साधून

प्रभाकराला देण्याचा तिचा विचार होता. परंतु तिला आपला एकहि बेत सिद्धीस नेतां आला नाहीं. उलट तिचा सर्व उत्साह नाहींसा होऊन रागानें आणि त्वेषानें तिच्या अंगाची लाही मात्र झाली. कारण प्रभाकरानें ती आली असतां ' या बसा ' इतकेंच तिचें औपचारिक स्वागत केलें. कृष्णीबरोबर मात्र तो मधून मधून बोलत होता. शिवाय तिच्याविषयीं प्रभाकरानें आपला मनोदय प्रगट केला असल्यामुळें राधाआका आणि सावित्रीबाई यांनींहि तिला प्रेमानें जवळ बसवून तिची विचारपूस केली होती. हा सर्व प्रकार वत्सला पहात होती, त्यामुळें तिचा राग भडकला.

पूजा सात वाजतां आटेपून मंडळी जेवावयास बसली. पुरुषांची पहिली पंगत जेवून उठेपर्यंत नऊ वाजले. यशवंताचें जेवण होतांच तो घरीं जाण्याची चळवळ करूं लागला. तेव्हां प्रभाकर म्हणाला, " यशवंत, आतां थोडा वेळ थांब. वत्सला, इंदू आणि कृष्णा यांचें आतां इतक्यांत जेवण होईल. मग तुम्ही सर्वजण एकदमच जा. "

" नको आतां मला उगाच आग्रह करूं ! माझी प्रकृति नाहीं ठीक. शिवाय त्यांना जेवायलाहि अद्यापि पुष्कळ वेळ आहे. बायका बसतील तेव्हां ना ? "

" मग जातोसच का ?–जा. पण थांब. मल्हारीला चुडी पेटवून तुझ्याबरोबर देतों. " असें म्हणून प्रभाकरानें मल्हारीला हांक मारिली. आणि चुडी पेटवून येण्यास सांगितलें. यशवंत घरीं जात आहे असें कळतांच कृष्णा बाहेर आली आणि त्याला थांबण्याचा आग्रह करूं लागली. परंतु यशवंत तिचें ऐकेना. ' तुमचें अद्यापि जेवण व्हावयाचें आहे, इतका वेळ मी थांबत नाहीं, ' असें सांगून तो बाहेर पडला, तेव्हां प्रभाकर म्हणाला, " जाऊं दे त्याला. त्याची प्रकृति ठीक नाहीं. मग मी तुम्हाबरोबर मल्हारी देईन, त्याच्याबरोबर तुम्ही जा. " इतकें बोलून झाल्यावर तो थोडा वेळ थांबला. नंतर त्यानें एकवार आजुबाजूला पाहिलें आणि जवळपास कोणी नाहीं असें पाहून तो हळूच म्हणाला, " कृष्णा, मी आतां पूजा आटोपल्यावर एक नवस केला आहे. "

" कशाबद्दल ? "

" नाहीं तुझ्या लक्ष्यांत आला ?—आपल्या मनासारखं झालं—भाऊसाहेबांनीं कोणताहि व्यत्यय न आणतां–आपल्या मनासारखं झालं म्हणजे आपण दोघं एका

घाटावर बसून पुनः श्रीसत्यनारायणाची जोडप्यानें पूजा करूं—कां बोलत कां नाहींस. तुला माझा हा नवस पसंत नाहीं वाटत ? "

" पसंत नाहीं कसा ? मी पण मघां तुम्ही पूजा करीत असतां असाच नवस बोललें आहें."

" खरें कीं काय ?—वाः मग तर खात्रीनें आपली इच्छा पूर्ण होईल. "

" होईल तो सुदिन ! " असें म्हणून कृष्णा आंत जाऊं लागली तेव्हां प्रभाकर तिला थांबवूं लागला." नको—आतां तुम्ही मजबरोबर बोलतां पण ती वत्सला मजकडे डोळे फाडफाडून पाहते."

" पण ती अशी कां पाहते तें तुला कळलं का ? "

" नाहीं.—तिचा स्वभावच तसा आहे."

" स्वभाव आहे, ती गोष्ट खरी परंतु तें एक मोठं प्रकरण आहे-तूं आतां जा. मग मी केव्हां तरी एकदां तुला तिचं सर्व कारस्थान सांगेन."

वत्सलेचें काय कारस्थान आहे, तें कळावें अशी कृष्णीची फार इच्छा होती, परंतु तिला नाइलाजास्तव आपली इच्छा दाबून आंत जावें लागलें. आपण इतका वेळ जवळ नव्हतों तेव्हां वत्सला आपणाविषयीं कांहीं तरी शंका कुशंका काढीत बसली असेल, असें तिला वाटलें. आणि ती आंत गेल्यावर तें तिच्या प्रत्ययासहि आलें. तिला आलेली पाहतांच वत्सला रागानें म्हणाली, " कुठें ग गेली होतीस कृष्णे इतका वेळ ? तुला घर आणि परघर अगदीं सारखं दिसतें ! परक्यांच्या घरांत इकडे तिकडे नाचायला तुला लाज नाहीं वाटत ? चहाटळ कुठली ? थांब, आतां घरीं गेल्यावर आत्याला सांगतें."

" यशवंत गेला म्हणून मी—"

" गेला तर काय झालं ? त्याला कुणी वाटेंत वाघ नाहीं खात ! "

इतक्यांत त्यांना जेवायाला बोलाविण्याकरितां कमला तेथें आली. वाचक हो ! ह्या मुलीचें जेवण होईपर्यंत आपण यशवंता बरोबर परत देशमुखवाड्यांत जाऊं या. ती काळोखी रात्र होती. यशवंत आंबराईंतून बाहेर पडला त्यावेळीं दहांचा सुमार झाला होता. मल्हारी हातांत पेटविलेली चुडी घेऊन पुढें चालत होता. थोडा रस्ता चालून

गेल्यावर यशवंत पुढें झाला आणि म्हणाला, " मल्हारी, दे ती चुडी मजजवळ. मी जाईन ह्या मागल्या वाटेनें.---तूं जा."

मल्हारीलाहि तेंच पाहिजे होतें. त्यानें गजराला देण्याकरितां पूजेचा प्रसाद बरोबर आणला होता. यशवंताला देशमुखवाडींत पोंचवून येतांना तो प्रसाद तिला द्यावा असा त्याचा विचार होता. परंतु यशवंतानें अर्ध्या वाटेंतच त्याची सुटका केल्यामुळें आपणास गजराच्या संगतींत थोडा वेळ जास्त घालवितां येईल, ह्या विचारानें त्याला आनंद झाला. त्यानें आपल्या हातांतील चूड यशवंताच्या हातीं दिली. आणि 'जातों' म्हणून तो मागें वळला. परंतु मागें न जातां थोडा वेळ तेथेंच थांबून यशवंत थोडा पुढें जातांच तोहि आपल्या इच्छित स्थलाकडे जाण्याकरितां यशवंताच्या मागून हळुहळू निघाला. आतां पुढें काय भयंकर प्रकार घडणार आहे, याची त्या दोघांना कल्पना देखील नव्हती. यशवंत आपल्या हातांतील चुडी गरगर फिरवीत रमत रमत चालला होता. हळुहळू तो शेत ओलांडून देशमुखवाडीच्या मागल्या बाजूला आला. मोठ्या सडकेनें वाडींत जावयास लांब पडत होतें म्हणून तो ह्या आडवाटेनें शेतांतून घुसला. तो समोरून कोणी येत आहे असें त्याला वाटलें. त्यानें चुडी वर करून किंचित्काळ न्याहाळून पाहिलें. थोड्या वेळानें ती व्यक्ति चुडीच्या प्रकाशांत येऊन स्पष्ट दिसतांच यशवंताच्या छातींत धस्स् झालें ! त्यानें चटकन् हातांतील चुडी तेथेंच टाकून पळण्याला सुरवात केली. त्या व्यक्तीला चुकवून आपण दरवाजांतून आंत जाऊं असें त्याला वाटलें होतें परंतु तें कांहीं त्याला साधलें नाहीं. दरवाजांतच त्या व्यक्तीनें त्याच्या दंडाला धरलें आणि सुरवातीलाच त्याच्या कानशिलांत भडकावून व दंडाला हिसकाहिसक करीत विचारलें, "मादरचोदा पळून जात होतास काय ? मी घरीं नाहीं असं पाहून तुला रात्रीं भटकायला फावलं वाटतं ? कुठें भटकत होतास इतक्या रात्रीं ? बोल—नवांच्या पुढें घराबाहेर राहूं नको म्हणून सांगितलं होतं ना ? बोल–बोल, काय करीत होतास बाहेर ? त्या प्रभ्यःबरोबर तुझीं कारस्थानं चाललीं आहेत काय ? "

वाचकहो ! ती व्यक्ति भाऊसाहेबच होती. त्यांच्या तोंडाच्या सपाट्याबरोबर त्यांचा हातहि मारखा चालू होता. एक, दोन, तीन फटके बसतांच यशवंताचें मस्तक तापलें. तो हालचाल करूं लागतांच भाऊसाहेबांनीं त्याला जोरानें ढकलून दिलें आणि चटकन्

आंत होऊन त्यांनीं दरवाजा लावून घेतला. यशवंतानें त्या रागाच्या आवेशांत दरवाजावर दोन चार लाथा मारल्या, परंतु त्याचा काय उपयोग होणार ! भाऊसाहेबांचा सूड उगवायला त्याला आतां मार्ग उरला नव्हता. तो इकडे तिकडे पाहूं लागला, तों जवळच पडलेली परंतु विझत आलेली चुडी त्याच्या दृष्टीस पडली. त्याबरोबर त्यानें ती उचलली आणि रागानें कुंपणावरून आंत फेंकून दिली. आतां पुढें काय करावें, ह्या विचारांत थोडा वेळ तेथेंच तो उभा राहिला. त्याचा श्वासोच्छ्वास फार जोरानें चालला होता. त्याचें सर्वांग थरथर कांपत होतें. भाऊसाहेब जर त्या सपाट्यांत त्याच्यापुढें असते, तर त्यानें त्यांच्या अंगावर हात टाकण्यास कधींहि कमी केलें नसतें, इतका तो संतापला होता.

अशा रीतीनें थोडा वेळ झाला नाहीं तोंच कुंपणावरून धुराचा लोट बाहेर आला. यशवंतानें रागारागानें वर पाहिलें. इतक्यांत लख्ख प्रकाश पडून कुंपणाच्या आंत असलेली गवताची गंजी भडकली !



# प्रकरण ३१ वें.



## यशवंत चोर !




आज सायंकाळच्या वेळीं मुलें घरीं जेवावयाचीं नसल्यामुळें दुर्गाबाईचा स्वयंपाकघरांतील व्यवहार लवकर आटोपला होता. ती मुलांची वाट पहात दिवाणखान्यांत सगुणाबाईजवळ बसली होती. भाऊसाहेब एकाएकीं मुंबईत कां गेले याविषयीं त्या दोघींनीं अनेक तर्कवितर्क चालविले होते. दुर्गाबाईला आपल्या भावाच्या कृष्णकारस्थानांचा कांहींएक मागमूस नव्हता. किंवा भाऊसाहेबांवर कांहीं संकट आलें आहे याची तिला कल्पनाहि नव्हती. ती आपल्या अधिकारांत चूर होती. आणि त्यांतच तिला मोठेपणा वाटत होता. परंतु सगुणाबाईची मात्र स्थिति तशी नव्हती. आपल्या पतीवर देशमुखवाडी हातची जाईल म्हणून एखादें संकट आलें आहे, असें जर तिला पूर्वीच कळलें असतें तरी ती किंचित्हि डगमगली नसती आणि त्याबद्दल तिला वाईटहि वाटलें नसतें. परंतु दोन दिवसांपूर्वी पतीचें भयंकर कारस्थान तिच्या लक्षांत आल्यापासून तिच्या मनाची अत्यंत शोचनीय स्थिति झाली होती. देशमुखवाडीच्या प्राप्तीकरितां आपला पति यशवंतच्या जिवावर उठला आहे, याची तिला जेव्हां जेव्हां आठवण होई, तेव्हां तेव्हां तिच्या हृदयाचा थरकांप होई. आतां ती आपल्या नणदेजवळ बसली होती, तथापि तिच्या मनांत तेच विचार घोळत होते.

दहा वाजून गेले. मुलें आतां येतील, मग येतील असें करतां करतां सगुणाबाईला कंटाळा आला. शेवटीं ती उठण्याच्या बेतांत आली, इतक्यांत माजघराचा दरवाजा उघडून भाऊसाहेब आंत आले. सगुणाबाई समोरच बसली असल्यामुळें ते आंत येतांच तिला प्रथम दिसले. परंतु दुर्गाबाईला मागें वळून पहावें लागलें. दोघींहि हळुहळू उठल्या परंतु उठतांना दुर्गाबाई म्हणाली, “ कायरे भाऊ, असा गेला होतास तरी कुठें निकडीनं ? ”

" गेलों होतों मसणांत ! "

स्वाभाविक विचारलेल्या प्रश्नाचें असें चमत्कारिक आणि वैतागलेल्या स्वरांत उत्तर ऐकून त्या दोघींना आश्चर्य वाटलें. त्या भाऊसाहेबांच्या तोंडाकडे पाहूं लागल्या, तेव्हां त्यांची चर्या रागावलेली परंतु प्रवासाच्या दगदगीमुळें काळवंडलेली दिसत होती. ते आंत येतांच दुर्गाबाईनें त्यांच्याकडे इतकें लक्षपूर्वक अवलोकन न करितां सहजीं तो प्रश्न केला होता. परंतु भाऊसाहेब आंत आले त्यावेळीं त्यांची मनःस्थिति कशी होती, याची तिला काय कल्पना ? त्या दोघीहि गप्प आहेत असें पाहून कपडे काढतां काढतां भाऊसाहेबांनीं रागांतच विचारलें, " येशा कुठें आहे ? "

हा प्रश्न ऐकतांच त्या दोघींत सगुणाबाई जास्त गडबडली. त्या दोघीहि गप्पच राहिल्या. आपल्या प्रश्नाला उत्तर नाहीं असें पाहून जरा चढत्या आवाजांत भाऊसाहेब पुनः म्हणाले, "काय–मी काय विचारतों ? तुमचे कान दडले काय ? येशा कुठें गेला? "

" मुलं सत्यनारायणाच्या पुजेकरितां प्रभाकराकडे आंबराईत गेली आहेत. " दुर्गाबाईनें हलकेंच उत्तर दिलें.

" कुठें गेलीं आहेत ?–प्रभाकराकडे !–कोणाच्या हुकूमानें ? "

आतां भयंकर गडगडाट होईल ह्या कल्पनेनें सगुणाबाईच्या हृदयांत धडकी बसली. परंतु गडगडाट होण्याऐवजीं त्या सर्वांच्या हृदयाचें एकदम पाणी करून सोडणारी एक आरोळी मात्र बाहेरून ऐकूं आली !

" आग ! आग ! ! धांवा–धांवा–! ! !"

धाडकन् दरवाजा उघडून रामजी एकदम आंत आला आणि ओरडून म्हणाला, " भाऊसाहेब, धांवा–धांवा, गंज्या पेटल्या, धान्याचे कणगे भडकले—"

त्याचें सर्व भाषण ऐकायला भाऊसाहेब येथें उभेच राहिले नाहींत. ते तडक दिवाणखान्यांतून माजघरांत घुसेल. त्यांच्या मागून दुर्गाबाई आणि सगुणाबाईही निघाल्या. मागल्या पडवींत येतांच भयंकर देखावा त्यांच्या दृष्टीस पडला. सर्व सांठविलेल्या गवताच्या व पेंढ्याच्या सहा गंज्या आणि धान्याचे भरलेले पांच कणगे धडाडून पेटलेले ! त्यांच्या ताडा माडा एवढ्या ज्वाला आकाशाला जावून भिडल्या आहेत की काय असें

दिसत होते. हां हां म्हणतां त्या ज्वालांनीं स्वपराक्रमाची खबर दूरवर पसरवून लोकांच्या झुंडीच्या झुंडी आपल्या दर्शनाकरितां धांवून आणल्या. तमासगिरांनीं तर सर्व वाड्यांत एकच कल्लोळ उडविला. देशमुखांचीं कुळें आग विझविण्याकरितां धडपड करीत होतीं. भाऊसाहेब घसा फोडून हुकूमावर हुकूम सोडीत होते. कोणाचा कोणाला पत्ता नव्हता. अशी अनायासें प्राप्त झालेली पर्वणी साधून तमासगिरांतील कित्येक उचले बेधडक वाड्यांत शिरून जें कांहीं हातीं लागेल तें बेलाशक काखेंस मारून आपला रस्ता सुधारीत होते.

त्या गर्दीतून प्रभाकर पुढें झाला आणि त्यानें इमारतीच्या बचावाचा उद्योग आरंभिला. आग आतां थोड्याच वेळांत पसरत जावून इमारत गांठेल हें पाहून प्रथम त्यानें तिकडे लक्ष पुरविलें. हा जर त्यानें प्रयत्न केला नसतां तर दुसऱ्या दिवशीं देशमुखवाडींत एक मोठा राखेचा ढीग दृष्टीस पडला असता. परंतु धन्य त्या प्रभाकराच्या धाडसाची !

"तेवढी चुडी जर यशवंतरावांनीं फेंकली नसती तर ही आग कशी लागली असती !" आपल्या हातांतील पाण्याची घागर कोठीवर चढलेल्या प्रभाकराच्या हातांत देतांना मल्हारी म्हणाला.

" काय–काय ? यशवंतानें चुडी फेंकली ? " प्रभाकरानें एकदम विचारलें.

" होय. भाऊसाहेबांनीं त्यांना मारलं तेव्हां–"

" कोण–कोण म्हणतोय् मी मारलं म्हणून ? " बाजूला असलेल्या भाऊसाहेबांनीं गर्जना करून विचारलें परंतु मल्हारीनें त्यांना उत्तर न देतां रिकामी घागर घेऊन तेथून पलायन केलें.

सर्व आग विझून सर्वत्र शांतता होईपर्यंत मध्यरात्र उलटून गेली. त्यावेळीं सर्वांचीं तोंडें जणूं काय त्या आगीनें शेकल्यामुळें अगदीं सुकून निस्तेज दिसत होतीं. मधून मधून ' यशवंतरावानें आग लाविली ! ' असें वाक्य जमलेल्या मंडळींतून ऐकूं येत होतें. हळुहळु गडबड कमी होतांच घरांत झालेली गडबड मंडळीच्या लक्षांत येऊन स्वयपाक घरांतील लहान लहान भांडीं, खुंटीवरील आणि वाळत घातलेले कपडे, त्याच प्रमाणें इतर चिल्लर वस्तु स्थानभ्रष्ट झालेल्या त्यांना दिसल्या. आतां एवढ्या जमावांत

चोर म्हणून कोणाचा हात धरावा हाच मोठा प्रश्न उरला! भाऊसाहेबांना हा प्रकार कळतांच त्यांचा क्रोधाग्नि मात्र न विझतां उलट जास्तच भडकला.

" ह्या चांडाळानें माझा सत्यानाश करण्याचा आज विचार केला होता काय? आतां गई करून उपयोगी नाहीं. उद्यां ह्याला कोतवाल चावडीच दाखविली पाहिजे. बेंड्या, कुठें आहेरे तो चांडाळ येश्या?"

सर्व घर शोधलें परंतु यशवंताचा पत्ता लागेना. तेव्हां मात्र भाऊसाहेब जास्त खवळून म्हणाले, " रामजी, जा, आतां जा आणि त्या प्रभ्याच्या घरीं येश्या असेल त्याला आतांच्या आतां येथें घेऊन ये."

असा हुकूम सोडून भाऊसाहेब माडीवर गेले आणि पाहतात तों तिकडेहि सर्व गोंधळ! क्षणभर त्यांनीं मेजावरील आपल्या तिजोरीकडे पाहिलें. नंतर त्यांना काय वाटलें असेल तें असो, त्यांनीं चट्कन् आपल्या जानव्याच्या किल्लया काढून तिजोरी उघडली. आणि कांहीं वेळ सर्व खण नीट तपासून पाहिलें. क्षणभरानें त्यांची चर्या गंभीर दिसूं लागली. त्यांनीं पुनः पुनः एक एक खण बाहेर काढला शेवटीं नोटा आणि रोकड बाहेर काढून मोजण्यास सुरवात केली. इतक्यांत दुर्गाआत्या आणि तिच्या मागून रामजी वर आले.

" भाऊ, हा रामजी सांगतो कीं, यशवंत आंबराईंत नाहीं."

" नाहीं तर गेला कोठें?" भाऊसाहेब वसकन् ओरडून म्हणाले, "जा—त्या प्रभ्यानेंच त्याला घरांत लपवून ठेवलें असेल—जा. त्याला उचलून घेऊन ये—उभा काय राहिला आहेस जा—चालता हो—"

" पण भाऊ, तूं आतां ह्यावेळीं—तिजोरी उघडून काय करीत बसला आहेस?" क्षणभरानें दरवाजांतून दुर्गाबाईनें विचारलें

" करतोंय् माझं कपाळ!—आज कुणाचं थोबड पाहिलं होतं कळत नाहीं."

" आतां तें सर्व राहूंदे. आज तुला फार त्रास झाला आहे. आतां स्वस्थ झोंप. मग उद्यां कर काय करायचं असेल तं?"

" उद्यां काय कर! तिजोरींतील माडेतिनशांच्या नोटा मिळत नाहींत आणि उद्यां काय कर—त्या परवां प्रभ्यानें हप्त्याच्या भरल्या त्या—"

" काय–काय ? परवां–प्रभाकरानें–" दुर्गाबाई अडखळत बोलूं लागली.

" का तूं का अशी गडबडलीस ? "

" गडबडलें नाहीं. पण त्या दिवशीं आपला बंडू सांगत होता कीं, येथें प्रभाकर आणि यशवंत कायसं बोलत होते. "

" केव्हां ?—ह्या, ह्या माझ्या तिजोरीच्या खोलींत ? "

भाऊसाहेब उतावीळ होऊन विचारूं लागले तेव्हां त्या दिवशीं बाबूरावानें सांगितलेली सर्व हकीकत तिनें भाऊसाहेबांस सांगितली. तेव्हां भाऊसाहेब म्हणाले, " बस्स् ! आतां आलें माझ्या लक्षांत ! त्या नोटा येश्यानेंच लांबविल्या. त्या शिवाय हा वकील आणि ब्यारिस्टर येईल कसा ?–अरे चोरा, कृतघ्ना, तुला आतां चांगलाच पोंचवितों–थांब. " असें म्हणून भाऊसाहेबांनीं लवकर लवकर तिजोरी पुनः बंद करून आपल्या दुसऱ्या नोकराला मोठ्यानें हांक मारिली आणि " जा–आतांच्या आतां पोलिस पाटलाला बोलावतों असं सांग. आणि त्याला बरोबर घेऊन ये " असा हुकूम सोडला.

पोलिस पाटलाबरोबरच आंबराईंत पुनः गेलेला रामजी परत आला. त्यानें आपला निरोप कळवितांच भाऊसाहेब पाटलाकडे वळून म्हणाले, " पाटिल, आतां आग लागली होती, ती तुम्ही पाहिलीच आहे. आतां इतक्या रात्री मी तुम्हांला मुद्दाम बोलविलें याचें कारण माझ्या घरांत साडे तिनशें रुपयांची चोरी झाली आहे. ही चोरी करणारा आणि ही आग लावणारा हा एकच मनुष्य आहे. तुम्ही आतांच्या आतां ह्या गुन्हेगाराला पकडण्याची आणि आपल्या ताब्यांत घेण्याची व्यवस्था करा. मी उद्या स्वतः शहरांत जाऊन फौजदार साहेबांस भेटून फिर्याद नोंदवून येईन. "

" पण गुन्हेगार कोण आहे ? त्याचं नांव, गांव, चेहेरे पट्टी—"

" चेहेरेपट्टी कसली विचारतां ? गुन्हेगार कांहीं लांबचा नाहीं. आमचा येशाच गुन्हेगार आहे. "

" काय यशवंतराव देशमुख चोर ! आन् त्यांनीं आग लाविली ? "

" हो-हो, त्या चांडाळानेंच हें कृत्य केलं. मी आतां साक्षी पुरावा आणून हजर करतों, त्याची नको तुम्हाला काळजी. तुम्ही प्रथम त्याला स्वाधीन करून घ्या. तो तुम्हाला त्या प्रभ्याच्या घरीं लपविलेला सांपडेल. जा. "

पाटीलबुवा प्रथम आंबराईत जाऊन प्रभाकराला भेटला. परंतु तेथें यशवंत नव्हता. दोनदां नोकर येऊन गेल्यावर पुनः पाटील आला तेव्हां मात्र प्रभाकरानें विशेष चौकशी-ला सुरवात केली. वास्तविक त्या दिवशीं तो अगदीं दमला होता. सकाळपासून पूजेच्या तयारींत त्याला क्षणाचीहि विश्रांति मिळाली नव्हती. नंतर पूजा आटोपल्यावर मध्यरात्र पर्यंत आग विझविण्यांत त्याला सर्वांपेक्षां जास्त शारीरिक श्रम पडले होते. आतां दोन वाजून गेले होते. तेव्हां बिछान्यावर केव्हां एकदां आंग टाकतों, असें त्याला झालें होतें. एक दोनदां रामजी त्याच्याकडे यशवंताची चौकशी करण्या करितां आला परंतु त्यानें तिकडे विशेष लक्ष दिलें नाहीं. यशवंत घरांतच कुठें तरी भाऊसाहेबांच्या भीतीनें लपला असेल, असें त्याला वाटलें. परंतु पाटील येतांच कांहीं तरी विशेष प्रकार असावा असें त्याला वाटलें, आणि त्याप्रमाणें त्यानें चौकशी केली. तेव्हां आपण येण्याचें कारण पाटील बुवानें सांगितलें.

"यशवंतानें कुंपणावरून चुडी आंत फेंकली आणि त्यामुळें आग लागली ही गोष्ट खरी? " प्रभाकर म्हणाला, " तथापि ती आग त्यानें मुद्दाम लाविली नाही. भाऊसाहे-बांनीं त्याला मारलं म्हणून रागाच्या भरांत त्यानें चुडी फेंकली. "

" हें तुम्ही कशावरून सांगतां? " पाटलानें विचारलें.

"आमच्या मल्हारीनें तो सर्व प्रकार पाहिला आहे. आणि त्यानें मला सांगितलें. " प्रभाकरानें उत्तर दिलें आग विझवून घरीं आल्यावर त्यानें मल्हारीला विचारलें, तेव्हां त्यानें ती सर्व हकीकत प्रभाकराला सांगितली होती. यशवंतानें त्याच्याजवळून चुडी घेऊन तो पुढें गेल्यावर मल्हारी त्याच्या मागून गजराला प्रसाद देण्याकरितां जात असतां वाटेंतच भाऊसाहेब येतांना त्याच्या दृष्टीस पडले. तेव्हां तो काळोखांतच लपून उभा राहिला होता. त्यामुळें पुढें घडलेल्या प्रकाराला तो साक्षीदार होता. असो. पुढें प्रभाकर म्हणाला, " पाटील, तुम्ही हा चोरीचा आरोप यशवंतावर ठेवता, हा निखालस खोटा आहे. यशवंत प्राण गेला तरी चोरी करणार नाहीं अशी माझी खात्री आहे. "

" पण भाऊसाहेब साक्षीपुरावा देण्यास तयार आहेत ना ? आमचं काय ? आम्ही सांगितल्या कामाचे! पण आतां यशवंतरावांचा शोध करावा तरी कुठें? "

" तें मी काय सांगूं? आग लागली त्या गडबडींतहि तो कांहीं दृष्टीस पडला नाहीं."

यशवंत कुठें गेला असेल, याची त्या दोघांनाहि कल्पना होईना. मागें एकदां यशवंत सर्व रात्र देवडीवर राहून दुसऱ्या दिवशीं परत घरीं गेला होता, हें पाटलास माहित होतें. त्याप्रमाणें आजहि तो देवडीवर गेला असेल असें समजून पाटील तेथें गेला आणि रायबाजवळ चौकशी करूं लागला. आपण कशाकरितां आलों आहोंत, यशवंतरावावर भाऊसाहेबांनीं कोणकोणते आरोप ठेविले आहेत, ही सर्व पाटलानें सांगितलेली हकीकत मुकाट्यानें ऐकून घेतल्यावर म्हातारा रायबा रागानें खवळून म्हणाला, "पाटील, तुम्ही आमच्या यशवंतरावाला पकडण्याकरितां अशा अर्ध्या रात्रीचे बाहेर पडले आहांत काय? वाहवा: पाटील! काय तुमची अक्कल! यशवंतराव चोर आहे काय? आमच्या यशवंतराव देशमुखाला तुम्ही चोर ठरवितां काय? अहो, तो खरा खरा देशमुख आहे. त्याला चोर म्हणण्याचा भाऊसाहेबांना काय अधिकार आहे. साडे तिनशें नाहीं तर साडे तीन हजार जरी त्यानें नेले तरी त्या पैशाचा मालक तो आहे. आगींत नुकसान झालें तरी तें त्याचें आहे. तुम्ही मालकालाच चोर ठरवून कैद करायला निघाला काय? शाबास आहे तुमची पाटील?—जा, जा, आतां आणि मुकाट्यानें जाऊन झोंपा—"

पाटीलबुवा मुकाट्यानें उठून आपल्या घरच्या रस्त्याला लागला. रायबापुढें तोंड उघडण्याची त्याला छाती नव्हती. कारण त्याचा स्वभाव तो पूर्णपणें ओळखून होता. आपण जर आतां एखादा शब्द अधिक उणा उच्चारला तर तो म्हातारा रागाच्या भरांत आपलें तोंड देखील रंगविण्यास मागें पुढें पाहणार नाहीं हें तो चांगल्या रीतीनें जाणत होता. तो निघून गेल्यावर बराच वेळ रायबाची बडबड चालली होती. इकडे पाटलाची बराच वेळ वाट पाहून तो आतां येत नाहीं, असें पाहून भाऊसाहेब आपल्या शय्येवर पडले. परंतु कांहीं केल्या त्यांना निद्रा येईना. चोरी आणि आग लावणें असे हे दोन आरोप ठेऊन फौजदाराकडून यशवंताला दोन चार वर्षें एकदां अडकवून ठेवला म्हणजे मग आपण पुढली व्यवस्था करण्यास मोकळें होऊं हा एकच विचार त्यांच्या डोक्यांत होता. शेवटीं पहाट झाल्यावर ते आपल्या खोलींतून बाहेर आले. आज त्यांना पुष्कळ काम होतें. प्रथम खालीं जावून ते मागल्या पडवींत आले. तेथें त्यांना सर्वत्र ओसाड दिसूं लागलें. गवताच्या गंज्या आणि सांठविलेल्या धान्याचे कणगे जाऊन आतां तेथें राखेचा मोठा ढीग पडला होता. तें पाहून पुनः त्यांच्या रागाला उसळी आली. इतक्यांत पाटिलबुवा तेथें येऊन हजर झाले. यशवंताचा पत्ता लागला नाहीं असें त्यानें सांगतांच भाऊसाहेब हात

पाय आपटीत म्हणाले, " तुम्ही अगदीं कुचकामाचीं माणसें आहांत. आतां मी शहरांत जाऊन ह्या सर्व गोष्टींचा स्वतः बंदोबस्त करतो. तुम्हांला फौजदार साहेबांकडून योग्य दट्टया बसल्याशिवाय तुमच्याकडून हीं कामं चांगली व्हावयाचीं नाहींत. तो बोटाएवढा पोर येऊन तुम्हाला पकडवत नाहीं मग तुम्हीं मोठमोठे चोर आणि दरोडेखोर काय पकडणार ? जा—अझून तरी त्याचा शोध करा. तो जाईल कुठें ? येथेंच कुठें तरी दडून बसला असेल. "

पाटील पुनः आपल्या मोहिमेवर निघाले. ती राख भरून टाकवून सर्व जागा साफ होईपर्यंत अकरा वाजले. नंतर स्नान आटोपून जेवण होईपर्यंत भाऊसाहेबांना आणखी एक तास लागला. आतां त्यांनीं शहरांत जाण्याची तयारी चालविली. तें पाहून सगुणा-बाईची छाती धडधडूं लागली. आपल्या यशवंतावर काय घोरपड येईल, याची तिला कल्पनाहि होईना. रात्रीं आग लागलेली बातमी ऐकल्यापासून तिची कंबर अगदीं खचली होती. एकामागून एक हें येणारें खडतर प्रसंग ती कसें सहन करीत होती हें एक तिला किंवा ईश्वरालाच ठाऊक !



# प्रकरण ३२ वें.

## मानवी राक्षस.



आज इतके दिवस बाबूरावाच्या छातीवर ठाणें धरून बसलेली धोंड खालीं पडली! आपण केलेली चोरी आज बाहेर फुटली असून चोर म्हणून यशवंतावर सर्व आरोप आला हें पाहून त्याला आनंद झाला. आतां त्याला बरेंच हलकें वाटूं लागलें. त्यांतून आधल्या दिवसापासून त्याचा पत्ता नसल्यामुळें त्याच्यावरील वहीम दृढ झाला होता. आतां तो कितीहि ' नाहीं, नाहीं ' म्हणाला तरी चोरी त्याच्या पाठीशीं लागणार असें त्याला वाटूं लागलें. त्यांतून यशवंताला पकडण्याकरितां फौजदाराकडून ' वारंट ' सोडण्याकरितां भाऊसाहेब शहरांत गेले आहेत, हें ऐकून तर त्याचा आनंद पोटांत मावेना! सगुणाबाई आणि कृष्णा यांच्या मनाची स्थिति आम्ही काय वर्णन करणार! अगोदरच त्या दुःखी! त्यांतून हे एकावर एक वाढत्या प्रमाणांत बसणारे दुःखाचे आणि संकटाचे तडाखे! आग लागलेली बातमी ऐकतांच त्यांचीं तोंडें फिकीं पडलीं, तीं आतां भाऊसाहेब शहरांत फौजदाराकडे गेले आहेत ही बातमी ऐकून अगदीं काळीं ठिक्कर पडलीं. चोरीविषयीं बोलतांना दुर्गाआत्यानें एक दोनदां प्रभाकराच्याहि नांवाचा उच्चार केला होता. परंतु वत्सलेनें जेव्हां तें ऐकलें तेव्हां तिनें आपल्या आतेला मोडून काढलें. असो. अशा प्रकारची देशमुखवाडींतील मंडळीची मनःस्थिति होती.

भाऊसाहेब प्रथम शहरांत जाऊन फौजदाराला भेटले. तेथें त्यांनीं सुवर्ण प्रयोग करून सर्व गोष्टी आपल्या मनासारख्या करून घेतल्या. आणि ते फौजदार कचेरींतून बाहेर पडले नाहींत तोंच त्याच्यामागें यशवंताला पकडण्याकरितां ' वारंट ' घेऊन एक पोलिस पार्टी बाहेर पडली. ही एक गोष्ट आपल्या मनासारखी झालेली पाहून त्यांच्या मनाचें बरेंच समाधान झालें. ते तेथून आपल्या वकिलाच्या घरीं आले. अद्यापि विश्वंभर वकील साहेब मुंबईहून आले नव्हते. परंतु इतक्यांत त्यांचा येण्याचा वेळ झाला होता म्हणून

ते तेथेंच बसून राहिले. पांचाच्या सुमारास विश्वंभरराव टांग्यांतून उतरले आणि ओटी-वरच भाऊसाहेबांना बसलेले पाहून त्यांनीं विचारलें, " का भाऊसाहेब, अद्यापि तुम्ही इकडेच ? मग काल एवढी घाई करून काय केलेंत ? जरा थांबला असतां तर नसतों का आपण दोघेहि बरोबरच आलों ? "

" थांबलों असतों तर येथें जग उलथं पालथं झालं असतं ! येथें काय घोंटाळा झाला आहे तो तुम्ही ऐकाल तर थक्क होऊन जाल. "

" काय काय ? त्या वकिलानें कांहीं केली कीं काय गडबड ? "

" छे हो ! त्याही पेक्षां फार भयंकर गोष्टी झाल्या आहेत. "

विश्वंभरराव कपडे काढून भाऊसाहेबांच्या शेजारीं बसले तेव्हां त्यांनीं एकामागून एक सर्व गोष्टी सांगितल्या. आणि शेवटीं ते म्हणाले, " आतां मी नुकताच फौजदाराला भेटून आलों. त्यानें वारंट तर सोडलें आहे. आतां फौजदारानें त्याला पकडलें म्हणजे मग पुढें काय करायचें तें विचारण्याकरितां तुमच्याकडे आलों आहें " असें म्हणून ते विश्वंभररावाच्या तोंडाकडे पहात राहिले.

" भाऊसाहेब, तुमच्या घरीं घडलेल्या सर्व गोष्टी मला कळल्या आणि तुम्ही फौज-दाराकडून वारंट मिळविलं तेंहि माझ्या लक्षांत आलं. परंतु मी तुम्हाला असं विचारतों कीं, ह्या दोन दिवसांत घडलेल्या गोष्टीमुळें तुम्ही मनांत जी भीति धरून मला मुंबईंत भेटलां ती तुमची भीति दूर झाली काय ? "

" आतां त्या भीतीचें कारण काय ! एकदां त्या वारंटानें येश्या सांपडला कीं त्याला दोनचार वर्षें अडकविण्याची खटपट करायची म्हणजे झालं !"

" तुम्हाला त्याला अडकवितां येणार नाहीं, इतकेंच नव्हे तर त्याला पकडतां सुद्धां येणार नाहीं, हा मी आतां वकील ह्या नात्यानें तुम्हाला सल्ला देतों. "

" म्हणजे ! " तोंड वांसून भाऊसाहेबांनीं एकदम विचारिलें, "पकडतां सुद्धां का येणार नाहीं ? त्यानें धडधडीत आग लाविली आणि तिजोरींतील नोटा चोरल्या—"

" होय पण त्यानें आग लावली ती कोणाच्या मालाला लाविली आणि नोटा चोरल्या त्या कोणाच्या नोटा ? "

" कोणाच्या म्हणजे ?— माझ्या. "

" तुम्ही पुष्कळ म्हणाल, पण कायद्यानें त्या तुमच्या म्हणून ठरतील तेव्हां ना ?"

" म्हणजे—म्हणजे. "

" म्हणजे त्याच्या वकिलानें तुम्हाला एक नोटीस दिली कीं, तुम्हाला आपलें चंबु गवाळें आटोपून देशमुखवाडी मुकाट्यानें सोडावी लागेल. तुमच्या वारंटाचा कांहींएक उपयोग नाहीं. कारण त्यानें रुपये घेतले असले तरी मालक तोच. आणि आग लाविली असली तरी नुकसानीचाहि मालक तोच !"

आतां मात्र पुनः सर्व पारडें फिरलें ! खरी वस्तुस्थिति भाऊसाहेबांच्या लक्षांत येतांच त्यांचा चेहरा पुनः उतरला. तें पाहून वकिलसाहेब म्हणाले, " समजलं आतां ! हें त्रांगड असं उलटं सुलटं आहे. म्हणून म्हणतों कीं, तुमचा हा प्रतिस्पर्धी जगांतून नाहींसा झाल्याशिवाय देशमुखवाडी कांहीं सरळ मार्गानें तुम्हाला पचणार नाहीं. "

" मग आतां पुढें काय करावं ? कांहीं तरी सुचवा बुवा ! मी तर आतां अगदीं गोंधळून गेलों आहें. " असें म्हणून त्यांनीं आपल्या कपाळावर हात दिला आणि उद्वेगजनक स्वरांत ते पुढें म्हणाले, " विश्वंभरराव, कांहीं युक्ति काढा. मी तुम्हांला शेवटपर्यंत विसरणार नाहीं यांची खात्री असूं द्या ! "

" तें मी समजलों हो ! पण आतां युक्ति काय काढणार ? आपलं मुंबईंत जें ठरलं आहे तसंच झालं पाहिजे. "

" होय. झालं पाहिजे खरं ! पण तें होणार कसं ? दुसऱ्या कोणाचं साह्य घ्यावें तर ही गोष्ट घटकर्णी होणार ! "

" अहे', पिशवी मोकळी सोडली म्हणजे त्या षट्कर्णाला कायमचा बुच बसतो. "

पुनः कांहीं वेळपर्यंत त्या दोघांच्या कान गोष्टी झाल्यावर भाऊसाहेब घरीं जाण्यास उठले.

" पण भाऊसाहेब, तुम्ही आतां परत जाणार कसे ? गाडी नाहीं वाटतं आणली ? "

" आणली होती. पण तुह्माला यावयास किती वेळ होईल याचा अजमास नसल्यामुळें गाडी खाणीवर घेऊन जाण्यास सांगितलं आहे. मी तेथपर्यंत पायीं जाऊन मग पुढे गाडीनें जाईन. " असें म्हणून भाऊसाहेब आपल्या वकील साहेबांस नमस्कार करून बाहेर पडले, त्यावेळीं संध्याकाळ होऊन काळोख पडला होता. भाऊसाहेब हळु हळु

अर्ध्या तासानें गेटावर आले परंतु तेथे त्यांना कोणीच दिसेना. खाणीवरील मजूर सुद्धां केव्हांच आपल्या घरीं गेले होते. आणि गाडीहि तेथें नव्हती. तें पाहून त्यांना फार राग आला. रामजीला त्यांनीं ' गाडी गेटावर नेऊन सोड मी मागून येतों. ' असें सांगितलें होतें परंतु त्याच्या ऐकण्यांत चूक होऊन त्यानें ' गाडी घरीं नेऊन सोड—' असें ऐकलें. भाऊसाहेबांनीं रागानें हात पाय आपटले. परंतु त्या ओसाड ठिकाणीं त्यांच्या रागाला कोण भीक घालणार ? शेवटीं त्या रागांत पाय आपटीतच त्यांना रस्ता तुडवावा लागला.

वाटेनें चालत असतां नानाप्रकारचे विचार भाऊसाहेबांच्या मनांत येत होते. वारंट मिळाल्यावर आपण आतां निर्भय झालों असें त्यांना वाटलें होतें, परंतु वकिलाची भेट झाल्यावर आपली सर्व चिंता आणि संकटें आहेत त्याच प्रमाणांत आहेत असें पाहून संतापानें त्यांचें डोकें अगदीं भडकून गेलें. क्षणांत त्यांच्या मनांत एखादा भयंकर विचार आला म्हणजे ते जोराजोरानें चालूं लागत. परंतु आपण योजलेलें कार्य उघडकीला आलें तर ? हा विचार त्यांच्या डोक्यांत येतांच त्यांचे पाय लटपटून त्यांची चालण्याची गति मंदावत असे. अशा रीतीनें कमी अधिक गतीनें मार्ग क्रमण करीत असतां आपल्या पुढें कांहीं अंतरावर कोणीतरी जात आहे असें त्यांच्या लक्षांत आलें. त्यावेळीं रात्र पडली असल्यामुळें पुढें चालणारा मनुष्य आहे किंवा स्त्री आहे, हें ओळखतां येणें कठीण होतें. तथापि कोणी जरी असलें तरी अशा काळोखाच्या वेळीं त्याची आपणास घरीं जाण्यापर्यंत संगत होईल असें वाटून त्यांनीं ' कोण आहे ? ' असा प्रश्न केला. तेव्हां पुढें जाणारी व्यक्ति थोडावेळ थांबल्या सारखा भास होऊन ' कोण आहे ?—थांबा. आपण बरोबरच एकमेकाच्या संगतीनें जावूं. ' असें मागून भाऊसाहेबांनीं म्हणतांच ती व्यक्ति चट्कन् बाजूच्या शेतांत वळली आणि दिसेनाशी झाली.

भाऊसाहेब क्षणभर तेथेंच उभे राहिले. आपणास पहातांच ती व्यक्ति पळाली का ? हा विचार त्यांच्या मनांत येऊन त्यांना संशय आला. तो यशवंत असेल काय ! अशी शंका उद्भवतांच त्यांच्या मनांत भयंकर विचार आला. अशा काळोखाच्या वेळीं एकांत समयीं तो जर आपल्या हातीं सांपडला, तर तर— तर !— असा राक्षसी विचार मनांत येतांच त्यांचें सर्वांग थरारलें. परंतु लगेंच त्यांचें मन घट्ट झालें. आपणच हें काम केल्यास दुसऱ्याचें साह्य घ्यावयास नको आणि इतकेंच नव्हे तर ही गोष्ट घट्कणीं

होईल अशी भीतीहि बाळगण्यास नको, ह्या विचारांनीं नवीन उत्साह उत्पन्न होऊन ते शेतांत वळले. त्याबरोबर निवडुंगाच्या आड लपलेली ती व्यक्ति पळूं लागली. परंतु दुर्दैव ओढवून त्या व्यक्तीचें धोतर निवडुंगांत अडकून भाऊसाहेबांच्या पुढेंच त्या व्यक्तीनें लोटांगण घातलें, आणि भयभीत होऊन एक आर्त स्वरांत किंकाळी फोडली !

" कोण येऱ्या !– बरा सांपडलास + + ! "

ती दुर्दैवी व्यक्ति यशवंतच होती ! आधल्या दिवशीं रात्रीं प्रभाकराकडून घरीं येत असतां त्याला भाऊसाहेब भेटले आणि त्यांनीं त्याच्यावर हात टाकला,ही हकीकत वाचकांनीं मागच्या प्रकरणांत वाचली आहे. पुढें रागानें बेफाम होऊन पेटलेली चुडी फेंकल्या-मुळें आग भडकलेली पाहून भीतीनें तो तेथून पळाला. तो पुढें पळे आणि मागें वळून पाही. आग तर प्रत्येक क्षणाला जास्त जास्त भडकत चालली होती. त्या आगीच्या भयंकर ज्वाला पाहून त्याला अतिशय भीति वाटूं लागली. आतां सर्व देशमुखवाडीला आग लागेल, आणि त्यांत आपली मंडळी जळून मरतील हा विचार त्याच्या मनांत येतांच त्याचे हात पाय गळले. आतां पुनः मागें जाऊन आग विझविण्याचा–निदान आगींत सांपडलेल्या आपल्या आवडत्या माणसांचा जीव तरी वांचवावा असा विचार त्याच्या मनांत येई तोंच रक्तासारखे लाल डोळे फाडफाडून आपणांकडे पहात असलेली भाऊसाहेबांची मूर्ति त्याच्या डोळ्यापुढें दिसूं लागे. त्याबरोबर तो पुनः भीतीनें पळूं लागे. धांवतां धांवतां त्याचे पाय दुखूं लागले. पुष्कळ धांवल्यावर आजूबाजूचा ओळखीचा प्रदेश पाहतांच आपण इतक्या लवकर खाणीवर पळत आलों हें पाहून क्षणभर त्याचें त्यालाच आश्चर्य वाटलें. इतक्यांत त्याच्या मनांत एक कल्पना आली. त्याबरोबर ओढा ओलांडून पलीकडे मजुराच्या असलेल्या झोपड्यांकडे जावयास तो निघाला. दोन तीन झोपड्या सोडून तो एका मधल्याच झोपडी जवळ उभा राहून ' काळ्या–काळ्या ! ' म्हणून हळूहळू हाका मारूं लागला. प्रथम चार सहा हाकांना उत्तर आलें नाहीं, नंतर दरवाजा उघडून काळ्या बाहेर आला.

" कोन हाये ? "

" काळ्या, मी–यशवंत. "

" हां–कोन ?–धनीसाब ! आन् अशा माध्यान्रात्रीं कुनींकडं ? "

" काळ्या, आंत चल. माझें एक काम आहे–करशील ? "

"हें काय धनीसाब विचारतां ? ह्यो माझा प्रान नव्हता आपला ?" असें म्हणून ते दोघेहि आंत गेले. तेव्हां काळ्यानें आपल्या बायकोला उठविलें. आणि तेथेंच घोंगडी पसरली. परंतु त्यावर न बसतां यशवंतानें थोडक्यांत आपल्या हातून आग कशी लागली तें वर्तमान त्याला सांगितलें आणि शेवटीं तो म्हणाला "मी येथें आहे, हें कोणालाहि कळूं देऊं नकोस. आणि आतां सर्व मजुरांना उठवून आग विझविण्याकरितां धांवा. ती पहा, येथून देखील साफ दिसते. पहा कशी भडकली आहे ती !" असें म्हणून त्यानें दरवाजाजवळ येऊन आकाशांत दूरवर दिसण्याऱ्या ज्वाला त्याला दाखविल्या.

तें पाहतांच काळ्यानें एक भयसूचक किंकाळी फोडली. त्याबरोबर आजुबाजूच्या झोपड्यांचे दरवाजे खडाखड उघडून मजूर बाहेर आले. तेव्हां 'धांवा—देशमुखवाडीला आग लागली.' असें त्यानें म्हणतांच मजुरांनीं देशमुखवाडीच्या दिशेला धांवण्यास सुरुवात केली. आपल्या मालकाचें घर जळत आहे असें कळतांच अंगांत कुडता किंवा डोक्याला फडका गुंडाळण्याकरितांहि ती मंडळी मागें फिरली नाहीं !

दोन तासांनीं आग विझवून मजूर परत येऊं लागले. तोंपर्यंत यशवंत काळ्याच्या झोपडीच्या दरवाज्याजवळ बसून होता. आपल्या रागानें काय काय प्रताप दाखविले, हें जाणण्यास तो अत्यंत उत्सुक झाला होता. आग लवकर विझावी म्हणून तो मनांत. त्यामनांत एकसारखें ईशनाम स्मरण करीत होता. शेवटीं काळ्या आला. त्यानें आगीची सर्व हकीकत त्याला सांगितली आणि भाऊसाहेबांनीं पाटलाला बोलावून सोडलेला हुकूमहि सांगितला, तेव्हां यशवंत म्हणाला "काळ्या, मी कांहीं चोरी केली नाहीं. हा मात्र माझ्यावर उगाच खोटा आरोप आहे. बाकी आग मात्र माझ्या मूर्खपणामुळें लागली ही गोष्ट खरी. पण काळ्या, मी आतां काय करूं रे ?"

"आतां धनीसाब, तुम्ही हकडंच दडूनशानी बसा. मग उद्यां कडं आपण काय तें ठरवूं !"

दुसऱ्या दिवशी सकाळीं काळ्यानें बाजारांत जावून थोडी जिलबी आणि दूध आणून यशवंताला दिलें. सर्व दिवस तो झोपडींतच बसून राहिला होता. दोनप्रहरीं खाणविरून काळ्या मुद्दाम घरीं आला आणि 'भाऊसाहेब फौजदाराकडे शहरांत गेलें आहेत.' असें त्यानें यशवंताला सांगितलें. तें ऐकून त्याला अधिकच भीति वाटूं लागली. त्यानें पुष्कळ वेळ विचारांत घालविला. आतां पुढें काय करावें हेंच त्याला सुचेना. घटकेंत त्याला वाटे

कीं, प्रभाकराला जावून भेटावें, म्हणजे तो कांहीं तरी आपणास मार्ग सुचवील. पुनः वाटे कीं, असेच देशमुखवाडींत जावून भाऊसाहेबांच्या पुढें उभें राहावें आणि सर्व खरी खरी घडलेली गोष्ट सांगावी. पुनः त्याला वाटे कीं, येथून परत न जातां कुठें तरी देशांतर करावें; असे अनेक विचार त्याच्या मनांत येत परंतु एकाहि गोष्टीचा निश्चय होईना. अशा विचाराखाली संध्याकाळ झाली. खाणीं वरील मजूर आपलीं कामें आटोपून परत घरीं आले. काळ्याहि परत आला. तेव्हां यशवंत त्याला म्हणाला, " काळ्या, आतां मी जातो. मी जर येथें आणखी राहिलों, तर उगाच तुझ्यावर कांहीं तरी संकट मात्र येईल. मी येथें रात्रभर होतों, असें मात्र कोणाला कळूं देऊं नकोस. "

" पन धनीसाब, तुम्ही आतां कुनीकडं जाणार ? "

" तें कांहीं माझें ठरलें नाहीं. एकदां वाटतें कीं, प्रभाकराला जावून भेटावें म्हणजे तो कांहीं तरी योग्य मार्ग सुचवील. "

" व्हय व्हय, परभाकररावाशीच भेटा. ह्यो इचार ठीक हाये. "

चांगला काळोख पडल्यावर यशवंत तथून निघाला. वाटेंत त्याच्या मनांत हजारों तर्क वितर्कांची गर्दी उडाली. तो हळूहळू चालला असतां आपल्या मागून कोणी तरी येत असावें, असें त्याला प्रथम वाटलें. तो कोणीतरी अनोळखी मनुष्य असेल, असें समजून तिकडे दुर्लक्ष करून तो आपल्या मार्गानें सरळ चालला होता. हळुहळू पाठीमागून येणारा मनुष्य जवळ जवळ येऊं लागला. शेवटीं तो बराच जवळ आल्यावर ' कोण आहे ? ' असा मागल्या मनुष्यानें विचारलेला प्रश्न त्याच्या कानीं आला. तो आवाज ऐकतांच त्याच्या छातींत एकदम धस्स् झालें ! भाऊसाहेबांच्या आवाजासारखा तो आवाज होता म्हणून खात्री करून घेण्याकरितां यशवंत तथेंच क्षणभर उभा राहिला. तोंच मागून दुसरा प्रश्न आला. आतां तर त्याची पूर्ण खात्री झाली. त्याची छाती धडाडून हात पाय लटपटूं लागले. मोठ्या संकटानें तो बाजूच्या शेतांत वळून निवडुंगाच्या आड लपला. परंतु दुर्दैव बिचाऱ्याचें ? भाऊसाहेब तेथेहि त्याचा माग काढीत आले. ते शेतांत वळलेले पाहतांच आतां ह्या मानवी राक्षसाच्या हातून जीव वचाविण्याकरितां पळाल्याशिवाय दुसरा मार्ग नाहीं, असें पाहून यशवंत आपल्या जागेवरून उठला आणि पळूं लागला. परंतु दुर्दैव कुठें त्याला पळूं देत होतें ? धोतर पायांत येऊन तो तेथेंच पडला, ती हकीकत वर दिलीच आहे.

" कोण येशा ?—बरा सांपडलास + + ? " असें म्हणून भाऊसाहेबांनीं एकदम त्याचा दंड पकडला. " चोरा, हरामखोरा तूं रात्रींपासून कुठें–होतास ?–बोल ? "

" भाऊसाहेब, मी चोर नाहीं—"

" तूं चोर नाहींस ? पाजी—हलकट, चोरी करून आग लावून पळालास आणि 'मी चोर नाहीं' म्हणून म्हणतोस ? लाज वाटतें तुला ? बोल, कुठें होतास तूं सर्व दिवस—?" असें म्हणून भाऊसाहेबांनीं त्याच्या दंडाला दोनचार हिसके देऊन ताड्कन त्याच्या एक तोंडांत मारिली.

" भाऊसाहेब, तुम्ही मला मारूं नका. मी चोरी केली नाहीं—शपथपूर्वक केली नाहीं "

" तूं केली नाहींस ?—तूं केलीस ? खोटें बोलतोस–" असें म्हणून भाऊसाहेबांच्या हाताचें यंत्र सुरू झालें. दोन तीन फटके खातांच यशवंतहि रागानें भानरहित झाला. त्यानें तितक्याच जोरानें भाऊसाहेबांच्या तोंडावर फटका मारला. आणि दोघांची लढाई जुंपली ! भाऊसाहेब सशक्त आणि मोठे असल्यामुळें ते निसरा पोर त्यांच्यापुढें कितीवेळ टिकाव धरणार ? तरी देखील त्यानें आठवण राहतील असें दोनचार फटके लगावलेच ! थोड्या वेळानें यशवंताच्या वर्मी एक फटका बसून तो बेशुद्ध होऊन खालीं पडला. तरी देखील शांत न होता भाऊसाहेबांनीं त्याला लाथांनीं तुडविलें. त्याचवेळीं बाजूला कांहीं खडबडल्याचा आवाज झाला. तो एकून भाऊसाहेब क्षणभर थांबले. पुनः सर्व सामसूम होतांच ' भास झाला !—हें असं अर्धवट टाकून नाहीं उपयोगाचं ? ' असें म्हणून ते इकडे तिकडे चांचपडूं लागले. जवळच एक मोठा धोंडा त्याच्या पायाला लागतांच तो त्यांनीं उचलला आणि जवळच असहाय्य स्थितींत बेशुद्ध पडलेल्या त्या निरपराधी पोरावर जोरानें फेंकला !

" देशमुखवाडी पाहिजे काय ?—मर—मर ! कोल्हीकुत्रींच आतां तुला फाडफाडून खातील ! " विकट हास्य करून तो मानवी राक्षस पुनः एक लाथ मारून तेथून मागें वळला !

भाऊसाहेब बरेंच दूर गेल्यावर त्यांच्या पावलांचा आवाज ऐकूं येईनासा झाल्यावर पलीकडच्या झुडपांतून एक व्यक्ति उडी मारून बाहेर आली आणि यशवंत पडला होता तेथें येऊन त्याला हातानें चाचपूं लागली. यशवंताचें सर्व शरीर थंडगार लागतांच त्या व्यक्तीच्या अंगावर रोमांच उभे राहिले. " आर्रर्र ! देवा—नारायणा ! काय हें

केलंस ? भाऊसाह्यबांनीं फाड्फाड् मारूनशानी यांचा जीव घेतला ! काय बघा हें वंगाळ शेत ! हीच नव्ह का ती जागा ? इथंच त्या परभाकररावाच्या दाजीबान्नी बैलानं शिंगानं फाडफाडून मारलं !–देवा देवा ! काय हा प्रसंग आनलास ?–पण आतां ह्या मुडद्यास काय करावं ?–गेला बिचारा यशवंतराव सुटला ? आतां संमद राज्य भाऊ. साह्यबाचं ? पन आतां काय करावं ?–" अशा रीतीनें पुढें काय करावें याचा विचार करीत आणि मधून मधून दुःखोद्गार काढीत ती व्यक्ति कांहीं वेळ तेथेंच उभी राहिली शेवटीं एक विचार ठरवून ती व्यक्ति तथून निघाली. वाटेनें धांवत, पळत आणि उड्या मारीत देशमुखवाडीच्या देवडीवर ती व्यक्ति येऊन ठेपली. त्या वेळीं काशी बाहेरच उभी होती. ती म्हणाली, " कायरे गवळ्या, कुणीकडे चाललास असा धापा टाकीत ? "

" चूप ! केवढ्यानी ओराडतीस ? रायबादादा कुनीकडं हाय ? "

त्याचा आवाज ऐकून म्हातारा रायबा बाहेर आला. त्याला पाहतांच हलक्या स्वरांत गवळ्या म्हणाला, " रायबादादा, घात झाला बघा ! भाऊसाहेबांनीं फाड्फाड् मारूशानी– दगूडबी डोक्यांत घालून त्याचा जीव घेतला–म्यां सवता बधितलं आन् काय सांगूं ? "

" कारे कोणाच जीव घेतला ? "

" त्यो नव्हका मुडदा पडला हाय निवडुंगांत त्याचा ! "

" पण तो कोणाचा मु दा पडला आहे ? "

" आपल्या यसवंतराव धनीसाह्यबांचा आन् काय ! "

" काय यशवंतरावांचा मुडदा ! "



## प्रकरण ३३ वें.



## आरोपांची परिस्फुटता.





रात्रीं नवांचा सुमार झाला होता. देशमुखांच्या घरीं दिवाणखान्यांत सर्व मंडळी एकत्र बसून चालू गोष्टींची चर्चा करीत होती. अद्यापि भाऊसाहेब घरीं परत आले नव्हते. सगुणाबाई आणि कृष्णी एका बाजूला सचिंत बसलीं होतीं. मधून मधून दुर्गाआत्या शंका कुशंका काढून सगुणाबाईबरोबर बोलत होती. बाबुराव मात्र कृष्णीला एखादा प्रश्न विचारून यशवंताच्या पळून जाण्यावर टवाळकी करीत होता आणि वत्सला दांत काढून हांसत होती. आधल्या दिवशीं प्रभाकराच्या घरीं पूजेला ती मंडळी गेली असतां कृष्णीचा तिला जितका संताप आला होता, त्याची आतां ती अशारीतीनें तिला हिणावून फेड करून घेत होती. तिला दोन चारदां ' वत्से, इतकं हांसणं चांगलं नाहीं. ' असें म्हणून दाबण्याचा सगुणाबाईनें प्रयत्न केला; परंतु तिनें त्याकडे लक्षच दिलें नाहीं.

" वत्से, तुला माहित नाहीं ?—" कृष्णीकडे डोळे मिचकावीत पहात बाबुराव बोलत होता, " आपल्या यशवंतरावाचे चुलते थोरले यशवंतराव जसे आपल्या आजोबांच्या वेळीं पळून गेले, तसेच हे त्यांचे पुतणे काल पळून गेले आहेत; परंतु ह्या आणि त्या यशवंतरावांत फरक आहे बरं ? ते यशवंतराव तसेच उठून घरांतून पळून गेले पण हे यशवंतराव घरांतून नोटा चोरून आणि आग लावून पळून गेले. "

" बरं बरं बंडू ! पुष्कळ झालं ! किती चहाटळपणा लावला आहेस मघांपासून ! " शेवटीं राहवेना तेव्हां किंचित् रागांतच सगुणाबाई बोलली.

" मी कायग चहाटळपणा करतों आई ? येऱ्या नोटा चोरून आणि आग लावून नाहीं का पळाला ? "

दरवाजा वाजला त्याबरोबर दिवाणखान्यांत एकदम शांतता झाली. इंदूनें धांवत जाऊन दरवाजाची कडी काढतांच एकदम दरवाजा उघडून भाऊसाहेब आंत आले. त्यांच्या तोंडावर दिव्याचा उजेड पडतांच त्यांची भेसूर चर्या स्पष्ट दिसली. त्यांच्या गालावर एक मोठा ओरखडा उठला होता. तसेंच त्यांचा आंगरखा एकदोन ठिकाणीं फाटला असून कपडे व धोतर धुळीनें खराब झालें होतें.

" अगबाई ! भाऊ, तुमच्या गालाला काय झालं ? " इंदूनें त्यांच्या तोंडाकडे पहात आश्चर्यानें एकदम विचारलें. परंतु भाऊसाहेबांनीं तिच्या प्रश्नाला उत्तर न देतां बाबुरावाकडे पाहून रागानें सांगितलें, " बंड्या, जा त्या रामज्याला इकडे बोलावून आण. गाढवानें मला विचारल्याशिवाय गाडी घरीं आणली. आणि मला इतक्या लांबून काळोखांतून रखडत यावं लागलं. "

" मग कुठें वाटेंत ठेंच लागून पडलास कीं काय ? " दुर्गाआत्या म्हणाली, " हो— तसंच वाटतं ! हें पहा, तुझ्या गालाला लागलं आहे, हा आंगरखा फाटला आहे, हें धोतर धुळीनें खराब झालं आहे. "

ऐनवेळीं बहिणीच्या प्रश्नानें भाऊसाहेबांना अगदीं सोळा आणे सबब सुचली, गाडी नसल्यामुळें आपण काळोखांतून पायीं येत असतां वाटेंत एका ठिकाणीं ठेंचाळून पडलों आणि त्यामुळें हा सर्व प्रकार झाला, अशी त्यांनीं त्यावेळीं संपादणी केली. आणि ती संपादणी वेळ मारून नेण्यास प्रसंगाला धरून होती, त्यामुळें कोणालाच संशय आला नाहीं. इतक्यांत रामजीला घेऊन बाबुराव आला. तेव्हां भाऊसाहेब त्याला रागानें पुष्कळ बोलले. वास्तविक ते पायीं आल्यामुळेंच त्यांचा प्रतिस्पर्धी त्यांना वाटेंत भेटून सर्व गोष्टी त्यांच्या मनासारख्या झाल्या होत्या. असो. पुढें भाऊसाहेबांनीं कपडे काढून हातपाय धुतले. जेवण होत असतां वाढतां वाढतां दुर्गाबाईनें यशवंता-विषयीं त्यांना विचारलें. तेव्हां गुरगुरत ' फौजदाराला भेटून फिर्याद नोंदविली आहे. आतां तो मिळेल तेव्हां पुढल्या गोष्टी !' असें त्यांनीं उत्तर दिलें. आणि जेवण आटोपून माडीचा रस्ता धरला.

रात्र फार झाली होती. देशमुखवाडींत सर्वत्र सामसूम झालेली दिसत होती. आघल्या रात्रीं आगीनें कहर उडविल्यामुळें सर्वांना ती रात्र जागून काढावी लागली होती. त्या

झोंपेची बाकी ती मंडळी आज सव्याज वसूल करीत आहेत, असें दिवाणखान्यांतून ऐकूं येणाऱ्या घोरण्याच्या ध्वनिवरून स्पष्ट होत होतें. परंतु सर्वांच्या नशिबीं अशी सुखनिद्रा कोठून असणार ? त्या मंडळींपैकीं तिघेजण आपल्या बिछान्यावर तळमळत पडले होते. भाऊसाहेबांनीं आपल्या खोलींत जातांच दरवाजा बंद करून घेतला. आज आपण एक मोठी कामगिरी केली—आपला मोठा शत्रु आज नाहींसा झाला—आपण आजपासून खरे देशमुख होऊन पूर्ण सुखी झालों, अशा प्रकारची ते आपल्या मनाची समजूत करीत होते. परंतु त्या खट्याळ मनाची कांहीं केल्यानेंहि समजूतच पटत नव्हती. आतां आपण सकाळीं उठल्यावर आपणास कोणती बातमी ऐकावयास मिळेल ?—शेतांत यशवंत मेलेला पडला असून त्याचा रात्री कोणी तरी खून केला ही बातमी आपण ऐकूं अशी त्यांची पूर्ण खात्री होती. मग आपण अशी अशी संपादणी करूं; इत्यादि अनेक विचार त्यांच्या मनांत येत होते. परंतु त्या प्रत्येक विचाराला त्यांची छाती वाढत्या प्रमाणावर धाड्धाड् करीत होती. ते आपल्या बिछान्यावर पडले परंतु त्यांच्या मनाला शांति मिळेना; सारखी तळमळ सुरू होती. सगुणाबाई आणि कृष्णी यांच्याहि मनाची तळमळ चालली होती. एकून ह्या तिघांना सर्व रात्र झोंप नव्हती.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठतांच ' आतां आपणास यशवंताच्या खुनाची बातमी ' कळेल असें त्यांना वाटत होतें. आणि त्यामुळें ते भांबावल्यासारखे झाले होते. घटकेंत ते वर जात, तर घटकेंत वाड्यांत जात; घटकेंत एखाद्या नोकराला हाका मारीत तर घटकेंत एखाद्या नोकरावर ओरडत सुटत, असा प्रकार चालला होता. शेवटीं दहा वाजले, तेव्हां मात्र त्यांना काळजी वाटूं लागली. आपण केलेलें भविष्य चुकलें असून रात्रीं केलेले सर्व श्रम फुकट गेले असावेत अशी शंका त्यांच्या मनांत येऊं लागली. आणि अशा घोंटाळलेल्या मनाच्या स्थितींत त्यांनीं आपलें स्नान आणि भोजन आटोपलें. आपला रात्रींचा प्रयत्न जर फुकट गेला असेल तर आतां हरप्रयत्न करून यशवंताला पकडण्याची शक्य तितकी खटपट केली पाहिजे, असा निश्चय करून ते पुनः शहरांत जाण्याकरितां निघाले.

भाऊसाहेब गाडींत बसतांना त्यांचा चेहरा स्पष्टपणें सगुणाबाईच्या दृष्टीस पडला. त्यावेळीं ती आपल्या खिडकींत उभी होती. आज सकाळपासून भाऊसाहेबांनीं तिशीं

चुकवाचुकव चालविली होती. आपल्या पत्नीच्या समोर जाण्याचें धैर्यच त्यांना झालें नव्हतें. आतां जेव्हां पतीचा चेहरा तिच्या दृष्टीस पडला, तेव्हां त्यांच्या गालावर उठलेला ओरखडा दृष्टीस पडतांच एकदम एक विलक्षण विचार तिच्या मनांत आला. आणि तिच्या छातींत चर्रर झालें ! ' खूनाला वाचा फुटते ' असें जें म्हणतात तें खरेंआहे काय ? आणि हें म्हणणें खरें असेल तर पतीच्या मुखावरील ओरखड्यानें तिला मूकसंदेश दिला काय ? होय. तो मूक संदेशच होता. केवळ ठेंच लागून पडल्यामुळें आपल्या पतीचे कपडे फाटून गालावर एवढा मोठा ओरखडा आला असेल याच्या शक्याशक्यतेचा विचार करितां आधल्या दिवशीं रात्रीं कांहीं तरी विशेष प्रकार घडला असावा असें तिला वाटूं लागलें. तिला आतां यशवंताच्या जीविताविषयीं काळजी उत्पन्न झाली. आज तिला एक घांसभरहि अन्न खाववलें नाहीं. राहून राहून यशवंताची मूर्ति तिच्या डोळ्यांपुढें येऊन उभी रहात होती. सकाळपासून तिनें आपलें औषधही वेळेवर घेतलें नाहीं. ह्या अशा दुःखानें आणि काळजीनें झिजून मरण्यापेक्षां ईश्वरानें आपणास एकदम मरण द्यावें असेंहि तिला वाटूं लागलें. अशा रीतीनें ती आपल्या विचारांत मग्न होऊन बसली असतां दुर्गाआत्या आपलें स्वयंपाक घरांतील सर्व काम आटोपून तिच्या खोलींत आली. आणि ती ' औषध वगैरे घेतलें काय ? ' म्हणून चौकशी करणार इतक्यांत बाहेरच्या बाजूनें खिडकींतून कोणी आंत डोकावल्याचा तिला भास झाला. तेव्हां ती चटकन् खिडकीजवळ गेली.

" कोणरे गवळ्या, तूं कांरे ? कां असा लपतोस कां ? "

" न्हायी, लपूं कशापाई ! "

" मग कशाला आला होतास ? "

" बाईसायबास्नी सांगाया आलों व्हतों. "

" काय सांगायला आला होतास ? "

" काई न्हायी—काई न्हायी—" असें म्हणून तो जाऊं लागला तेव्हां सगुणाबाईनें त्याला हांक मारिली आणि विचारलें, तेव्हां तो म्हणाला, " बाईसाहेब आलों व्हतों तुम्हास्नीं सांगाया कीं, तथं शेतांत मुडदा न्हायी म्हनूनशानी ! "

" मुडदा !—मुडदा कुणाचा ? " एकदम आश्चर्यानें सगुणाबाईनें विचारलें.

" त्यो नव्ह का यशवंतरावांचा मुडदा व्हता ! "

" यशवंतरावाचा मुडदा होता ! म्हणजे ?–अरे गवळया, तूं हें काय बडबडतोस ? "

" आतां काय सांगावं बाईसाब ! रात्रीं नव्ह का दगूड हाणूनशानी त्यांचा मुडदा पाडला ? "

" कुणी ? कुणी दगड हाणला ? "

" भाऊसाहेबांनीं—"

गवळ्यानें उच्चारलेला दुसरा शब्द सगुणाबाईनें ऐकलासुद्धां नाहीं. ती धाडकन् मागें गादीवर बेशुद्ध पडली. तें पाहतांच गवळ्याची गाळण उडाली. त्यानें चटकन् खिडकीवरून उडी टाकिली आणि तेथून पलायन केलें. दुर्गाआत्याचीहि धांदल व उडाली. तिनें प्रथम ' कृष्णे–कृष्णे ' म्हणून मोठ मोठ्यानें हाका मारिल्या. ती ओरड ऐकून सर्व मुलें आणि नोकर चाकर तेथें जमा झाले. त्याच वेळीं कर्मधर्मसंयोगानें यशवंताची चौकशी करण्याकरितां प्रभाकर तेथें आला. त्यानें हा प्रकार पाहून प्रथम एका नोकराला शास्त्रीबुवांना आणण्याकरितां रवाना केलें. तोंपर्यंत सगुणाबाईची अशी स्थिति होण्याचें कारण त्यानें दुर्गा आत्याला विचारलें. तेव्हां गवळ्यानें सांगितलेली बातमी तिनें सांगितली. ती ऐकून प्रभाकर मोठ्या विचारांत पडला. त्यानें बराच वेळ विचार केला. अशी गोष्ट थट्टेदाखल गवळ्या सांगेल असें संभवेना. ह्या गोष्टींत खात्रीनें कांहीं तरी सत्यांश आहे असेंच त्याला वाटूं लागलें. भाऊसाहेबांनीं यशवंताचा खून केला असला तर मग त्याच्या प्रेताची त्यांनीं कशी विल्हेवाट लाविली असेल, हा एक प्रश्न बाकी होताच ! असे त्याच्या मनांत नानाप्रकारचे विचार येत असतां त्याचें शरीर कांहीं स्वस्थ बसलें नव्हतें. सगुणाबाईला शुद्धीवर आणण्याकरितां सारखे उपचार चालू होतेच. थंडपाणी शिंपडणें, कांदा हुंगविणें, त्याचा रस नाकांत घालणें इत्यादि अनेक उपचार झाले तरीहि ती शुद्धीवर येईना शेवटीं शास्त्रीबुवा आले. त्यांनीं प्रथम साधेच उपचार करून पाहिले. परंतु सगुणाबाई शुद्धीवर येण्याचें चिन्ह दिसेना. तेव्हां मात्र मंडळी विचारांत पडली. कृष्णी तर रडूं लागली. आपल्या भावजयीची अशी कठिण अवस्था पाहून दुर्गाआत्यानें खाणीवर भाऊसाहेबांना बोलाविण्याकरितां एक मनुष्य पिटाळला. इकडे साध्या उपचारांनीं कांहीं वळत नाहीं, असें पाहून शास्त्रीबुवांनीं तिच्या डोळ्यांत

अंजनाचा प्रयोग केला. तो मात्र परिणामकारक झाला. कारण सगुणाबाईनें तात्काळ आपले डोळे उघडले. प्रथम तिनें दीर्घ श्वास सोडून आजुबाजूला पाहिलें. आणि " यश-वंत–यशवंताला खरंच का इ–इ–इकडून मारलं ? " असा अडखळत प्रश्न केला.

परंतु त्या प्रश्नाचें कोण उत्तर देणार ? इतक्यांत भाऊसाहेबहि आले. ते 'काय आहे ?' ' काय आहे ? ' म्हणून प्रश्न करतात तोंच त्यांची दृष्टि बाजूला असलेल्या प्रभाकराकडे गेली. त्याबरोबर ते कपाळाला आठ्या घालून म्हणाले. तुला माझ्या घरांत येण्याची काय जरूरी ? हा काय चवाठा आहे वाटतं ? चोर + + + ! चोरी करून पुनः इकडे यायला तुला शरम नाहीं वाटत ! चल, निघ माझ्या घरांतून– "

भाऊसाहेबांचें भाषण ऐकून प्रभाकर विस्मयचकित होऊन गोंधळून गेला. आपणावर हा चोरीचा आरोप केलेला ऐकून तो अगदीं काळा ठिक्कर पडला. सर्वजण त्याच्याकडे आश्चर्यानें टकमक पाहूं लागले. तें पाहून आतां आपण येथून जावें हेंच चांगलें असा विचार करून तो बाहेर पडला. परंतु बाहेरच्या सज्जावर येतांच त्याच्या मनांत दुसरा एक विचार येऊन तो तेथेंच उभा राहिला. भाऊसाहेबांनीं आपणावर चोरीचा आरोप ठेविला आहे, त्याची शहानिशा करून घेतल्याशिवाय येथून जाणें ह्मणजे जनदृष्टीनें आपण आरोप कबूल करणें असें त्याला वाटलें. तो बराच वेळ तेथें उभा राहिला. शेवटीं शास्त्रीबुवा आणि भाऊसाहेब बोलत बोलत बाहेर आले.

" तूं अद्यापि येथेंच आहेस काय ? पहा–पुनः सांगतों, तूं मला आतां जास्त चिडवूं नकोस. मुकाट्यानें येथून चालता हो–"

" भाऊसाहेब, मी येथें आतां जास्त वेळ राहूं इच्छितच नाहीं. पण तुह्मीं मजवर चोरीचा आरोप ठेविला आहे त्याचा अर्थ काय ? "

" त्याचा अर्थ फार मोठा आहे, समजलास ? तुझीं कारस्थानं मला सर्व कळतात—"

" भाऊसाहेब, आपण काय बोलतां याचा विचार केला आहे काय ? "

" अरे हो हो ! केला–केला विचार ! त्या आगलाव्या येस्यानें त्या दिवशीं माझ्या तिजोरींतील साडे तिनशें रुपये लांबविले, त्याला तुझीच मदत आहे अशी माझी चांगली खात्री झाली आहे समजलास ? "

" भाऊसाहेब, हें आपलं भाषण—"

" आतां तूं जातोस कीं तुला धक्की मारून बाहेर काढूं ! "

गोष्ट निकरावर येऊं पहात आहे असें पाहून शास्त्रीबुवा पुढें झाले, आणि त्यांनीं प्रभाकराचा हात धरून त्यास सज्जाच्या खालीं नेलें. देशमुखवाडींतून बाहेर पडेपर्यंत शास्त्रीबुवा बोलले नाहींत. त्यांनीं प्रभाकराला शांत होऊं दिलें. नंतर ते ह्मणाले, " प्रभाकर, भाऊसाहेबांनीं हा आरोप तुझ्यावर ठेविला आहे, यांत त्यांचा कांहीं तरी हेतु असावा, असें मला वाटतें. त्यांनीं कांहीं तरी एक मोठा बेत रचला असून त्याची ही तयारी असावी अशी मला शंका येते. आज दोन दिवस झाले, यशवंत कुठें नाहींसा झाला आहे, तेव्हां—"

" नाहींसा कसला ! त्याचा तर खून झाला, असं मला आतां—"

" काय खून ! यशवंताचा खून झाला ! कोणी केला ? "

" भाऊसाहेबांनीं !—काल रात्रीं भाऊसाहेबांनीं त्याचा खून केला, असं गवळ्यानें सांगितलं आणि ती बातमी ऐकतांच ताईसाहेब बेशुद्ध झाल्या. "

" असें काय ? आतां आलं लक्षांत ! पण गवळ्यानें सांगितलेली ही बातमी खरी कशावरून ? त्यानें खून करतांना स्वतः पाहिलं काय ? आणि खून झाला असता तर तो अद्यापि छपून राहिला असता काय ? "

" त्यामुळेंच थोडी शंका येते. "

" पण प्रभाकर शंकाहि घेण्याचें कांहीं कारण नाहीं. कारण खून झाला असल्यास त्या प्रेताची व्यवस्था कशी करावी हें भाऊसाहेबास कोणीं सांगितलं पाहिजे असं नाहीं. पण हें पहा, दुसऱ्याच्या सांगण्यावर विश्वास ठेवण्यापेक्षां ह्या गवळ्याला गांठून आपणच त्याला समक्ष सर्व विचारून घेतलं पाहिजे. म्हणजे इतर गोष्टीबरोबर हा नवीन उद्भवलेला चोरीचा प्रकारहि आपणास कळेल. आतां स्वस्थ बसून नाहीं उपयोग ! यशवंत नाहींसा होऊन आज दोन दिवस झाले आहेत. गवळ्या म्हणतो तसा जर कांहीं वेडावाकडा प्रकार झाला नसला, तर तो कुठें आहे, याचा आपणास शोध केला पाहिजे. मी थोड्या दिवसावर त्याची प्रकृति पाहिली आहे, त्यावरून विचार केला तरी देखील त्याच्या जीविताविषयीं भीति आहेच !"

" मग आतां मी लागतोंच त्या उद्योगाला ! प्रथम ह्या गवळ्याला गांठतों. आणि खरी काय बातमी आहे, ती पण तुह्मांला येऊन सांगतों. नंतर आपण काय तें ठरवूं. "

शास्त्रीबुवांना सोडल्यावर प्रभाकरानें गवळ्याचा पुष्कळ शोध केला. परंतु त्याचा कांहींच पत्ता लागला नाहीं. उलट ज्या बातमीमुळें सगुणाबाई बेशुद्ध झाली, ती बातमी गवळ्याकडून इतर बऱ्याच लोकांना कळली आहे, असें त्याच्या लक्षांत आलें. सर्व गांवानें प्रथम पासूनच गवळ्याला वेडा म्हणून ठरविलेला! तेव्हां त्याच्या बोलण्यावर मंडळींनींहि तितकाच विश्वास ठेविला होता. तथापि त्यानें 'भाऊसाहेबांनीं दगडानें यशवंताचें डोकें फोडून त्याचा खून केला!' ही सांगितलेली बातमी सर्व गांवभर पसरली. भाऊसाहेबांचा सर्वांना वचक असल्यामुळें लोक उघडपणें जरी ह्या गोष्टीची चर्चा करीत नव्हते, तरी आपापसांत त्यांच्या गोष्टी चालल्याच होत्या. प्रभाकरानें पांच पंचवीस ठिकाणीं वर चाललेल्या गोष्टी ऐकल्या. परंतु त्याच्या दुसऱ्या प्रश्नाचें मात्र त्याला कुणीच समाधानकारक उत्तर दिलें नाहीं. खून झाला म्हणावा तर प्रेताची काय व्यवस्था झाली ? हें एक गूढ बाकी राहिलेंच !

रात्रीं आठांच्या सुमारास प्रभाकर घरीं आला. आंबराईंतदेखील खुनाची गोष्ट सर्वांना कळली होती. त्यानें घरीं आल्यावर खुनाच्या हकीकती बरोबर आपणावर भाऊसाहेबांनीं चोरीचा ठेवलेला आरोप आईला आणि आकाला सांगितला. तेव्हां ही नवीन उपस्थित झालेली भानगड ऐकून घरांतल्या मंडळींनादेखील विचार पडला. शेवटीं आपले हितचिंतक मुकुंदशेट यांच्या कानावर सर्व गोष्टी घालून त्यांचा सल्ला घ्यावा असें त्यांनीं ठरविलें.



# प्रकरण ३४ वें.



## एका गोष्टीचा उलगडा झाला.





सर्व गांवांत खुनाची बातमी पसरली होती. आणि खुद्द देशमुखवाडींतहि नोकर चाकरांत गुणगुण चाललेली ऐकूं आली. दुसऱ्या दिवशीं भाऊसाहेब उठले तेव्हां पहिली गोष्ट त्यांना कळली, ती ही कीं, 'आपण केलेल्या खुनामुळें सर्व गांवांत एकच चळवळ उडाली आहे.' ही गोष्ट इतक्या गुपचूपरीतीनें झाली असतां ती बाहेर फुटली कशी ? याचें त्यांना फार आश्चर्य वाटलें. त्यांच्या मनाची चलबिचल सुरू झाली. घटकेंत त्यांना समाधान झाल्यासारखें दिसे तर घटकेंत भीतीची छाया त्यांच्या तोंडावर दिसे. आतां पुढें काय करावें ह्या विचारांत ते असतांना दरवाजा उघडून सगुणाबाई हळु हळू त्यांच्या जवळ आली. बिचारीला सर्व रात्र झोंप कशी ती बिलकूल लागली नाहीं. आधल्या दिवशीं तिची स्थिति कशी झाली होती ती वाचकांना माहिती आहेच. तिनें सर्व रात्र विचार केला शेवटीं पतीला समक्ष विचारून आपण ऐकलेल्या गोष्टींत कितपत सत्यांश आहे याची शहानिशी करून घ्यावी, अशा विचारानें ती, चालवत नव्हतें तरी आतां माडीवर आली होती. तिला पाहतांच, ती कशाकरितां आली आहे हें भाऊसाहेबांनीं तात्काळ जाणलें. परंतु आपल्या मुखावर किंचित्‌हि फेरबदल होऊं न देतां ते म्हणाले, " कां—तूं कशाला वर आलीस? मी आतां खालींच येणार होतों. "

" मी ऐकलेली गोष्ट खरी का? "

" कसली गोष्ट तूं ऐकलीस? गांवांत वाटेल त्या गप्पा पसरतात. आणि त्या ऐकून जर तुझी प्रकृति अशी घटके घटकेला बिघडूं लागली, तर मग तुला जपावें तरी कसें माणसानें? काय बरं काल तूं गोंधळ केला होतास? "

" पण तुह्मी यशवंताचा खरोखरीच खून केला नाहीं ना ? "

ह्या एकदम तोंडावर विचारलेला प्रश्न ऐकून भाऊसाहेब गडबडले. त्यांना तात्काळ त्याचें उत्तर देववेना. परंतु उत्तर दिल्याशिवाय गत्यंतर नाहीं, असें पाहून ते म्हणाले, " ह्या भलत्याच गोष्टी तूं ऐकून घेतल्यास कशा, याचेंच मला प्रथम आश्चर्य वाटतें. आपल्या नवऱ्याविरुद्ध अशा गोष्टी बोलणाराचे तूंच प्रथम दांत पाडायला पाहिजे होतें, तें राहिलं एका बाजूला आणि भलत्याच गोष्टींविषयीं डोक्यांत राख घालून उगाच आपल्या मागें तूं काळजी लावून घेत आहेस. अशा भलत्याच आणि असंभवनीय गोष्टी ऐकून तुह्मा त्यावर विश्वास कसा बसतो हेंच मला कळत नाहीं. मी यशवंताला बोलेन, मारीन पण त्याचा खून करीन असें तुला वाटतें तरी कसें ? तो जरा द्वाड आहे, अल्लड आहे तेव्हां त्याला बोललंच पाहिजे. त्याशिवाय तो कसा सुधारणार ? अग, त्याला अशी दहशत घातल्या शिवाय कसं होईल. काल त्यानें गंज्या पेटविल्या. अशावेळीं जर त्याला पोलीसची भीति घातली नाहीं, तर उद्यां तो भलंतच कांहीं तरी करील. पण तें आतां जाऊं दे. तुला ही गोष्ट प्रथम कोणी सांगितली तें मला कळूंदे. म्हणजे मी त्याचा मुळांतच बंदोबस्त करून टाकतों. "

ह्या मायावी भाषणानें सगुणाबाईचा ग्रह तात्काळ बदलला. तिच्या मनाचें बरेंच समाधान झाल्यासारखें तिच्या चर्येवरून दिसलें. यशवंताच्या खुनाविषयीं कळलेली बातमी केवळ गप्प आहे असें तिला आतां वाटूं लागलें. गवळ्याच्या बोलण्यावर आपण विश्वास ठेऊन आपल्या पूज्य पतीविषयीं शंका घेतली म्हणून तिला आतां पश्चात्तापहि झाला. ती म्हणाली, " काय मी वेडी ! त्या पोराच्या भाषणावर विश्वासून मी व्यर्थ इतका काळ चिंतेंत काढला ! "

" कोण तो पोर ? " आपल्या संपादणीचा योग्य व अनुकूल परिणाम झालेला पाहून भाऊसाहेबांचीहि चर्या बदलली.

" तो गवळ्या ! "

" असं का ? त्या गवळ्यानें येऊन का तुह्माला ही गप्प सांगितली ? काय मूर्ख पोर आहे ! बोलून चालून वेडाच तो ! " असें ह्मणून जास्त न बोलतां भाऊसाहेब खालीं आले आणि आपला प्रातर्विधि आटोपण्याच्या उद्योगाला लागले. आतां प्रथम शहरांत

जाऊन फौजदाराकडून ह्या गवळ्याला पकडण्याची–निदान त्याचें तोंड बंद करण्याची कांहीं तरी व्यवस्था केली पाहिजे असा त्यांनीं बेत केला. गवळ्यानें ज्या अर्थी 'आपण खून केला' ही बातमी पसरविली आहे त्या अर्थी तो त्यावेळीं तेथेंच कुठें तरी जवळ पास असला पाहिजे असें त्यांना वाटलें. आपलें कृत्य जर त्यानें पाहिलें असेल तर त्याचें तोंड आतां गप्प केल्याशिवाय मार्ग नाहीं. नाहीं तर साक्षीदार ह्या नात्यानें पुढें येऊन त्याच्यापासून आपणास त्रास होईल, अशीहि एक प्रकारची त्यांना भीति उत्पन्न झाली. त्यांनीं आपलें जेवण आटोपून खाणीवर न जातां एकदम शहराचा मार्ग धरिला. गांवांत जशी खुनी ह्मणून आपल्या नांवाची दवंडी पिटली आहे व लोक परस्परांत कुजबुजतात त्याप्रमाणें शहरांत कांहीं प्रकार असेल अशी त्यांना कल्पनाहि नव्हती. ते गाडींतून उतरून फौजदार साहेबांच्या घरांत गेले. त्यावेळीं नुकतेंच जेवण करून हुका ओढीत फौजदारसाहेबांची स्वारी आराम करीत होती. भाऊसाहेबांनीं दरवाजांत येतांच विचारलें, "काय फौजदारसाहेब, तुमचा कैदी मिळाला कीं नाहीं?"

"नाहीं. पण भाऊसाहेब, तुम्ही आतां आलांत हें फार चांगलं झालं. मला आपणाशीं कांहीं बोलावयाचें आहे. गांवांत अशी एक बातमी पसरली आहे कीं, तुम्ही ज्या मुलावर फिर्याद नोंदविली आहे, त्या मुलाला कांहीं जड जोखीम झालें आहे. तुम्हाला ह्या बाबतींत कांहीं माहिती आहे काय?–निदान कांहीं कळलें आहे काय?"

"छे–नाहीं. त्याला काय जडजोखीम व्हायचं?"

"काय व्हायचं तेंच तर मी तुह्माला विचारतों. पण गांवांत अशी दाट वदंता आहे कीं, परवां रात्रीं तुमची व त्या मुलाची गांठ पडली होती–आणि तुम्ही त्याला–"

"अगदीं खोटी गोष्ट!"

"खोटी गोष्ट असेल तर उत्तमच! परंतु आपली व त्या मुलाची गांठ पडली त्यावेळीं त्या ठिकाणीं तिसरा एक मनुष्य हजर होता; आणि त्यानें—"

"ही तर गोष्ट अगदींच–साफ खोटी! त्यावेळीं आमच्या दोघांशिवाय तेथें तिसरा–" इतकेंच बोलून भाऊसाहेबांनीं चटकन् आपली जीभ चावली. फौजदारानें आपल्या कौशल्यानें बोलतां बोलतां भाऊसाहेबांस चकविलें. आपली गोळी बरोबर लागू पडलेली पाहून फौजदारलाहि जोर आला. त्यानें किंचित् खाकरत अधिकाराच्या स्वरांत म्हटलें,

" हें पहा भाऊसाहेब, तुम्ही आतां कितीहि संपादणी केली तरी त्याचा कांहीं एक उपयोग व्हावयाचा नाहीं. तुम्हाला आतां हें प्रकरण फार जड जाईल. मी आज ह्या सर्व गोष्टीचा नीट तपास करून ही केस हातीं घेणार आहें. ह्या प्रकरणांत तुम्ही खुनी म्हणून तुम्हाला मला कायद्याप्रमाणें पकडावें लागेल."

ही फौजदारसाहेबांची भाषा ऐकून भाऊसाहेबांची स्वारी गडबडली. आपण आपल्या पत्नीजवळ उलटें-सुलटें करून खरी गोष्ट बिलकूल कळूं न देतां जसा विजय संपादन केला तसाच येथेंहि करूं आणि त्या पोराला—गवळ्याला उलट अडकवून टाकूं अशी त्यांची खात्री होती परंतु आतां सर्वच पारडें फिरलें ! दोन दिवसापूर्वी फौजदार भाऊसाहेबांचा ओशाळा होता परंतु आज तो ती मागची सर्व गोष्ट विसरला. आतां त्याच्या हातांत शिकार आली. ती आपल्या फायद्यांत पाडून घेण्याच्या उद्देशानें पण आपल्या अधिकाराची जाणीव ठेवून तो म्हणाला, " भाऊसाहेब, आतां तुम्ही आपल्या तोंडानें कबूल झालल्या गोष्टीला मी स्वतः साक्षीदार आहें. तुम्ही आतां मुकाट्यानें त्या दिवशीं घडलेली सर्व हकीकत मला सहीनिशीं लिहून द्या, आणि त्या मुलावर ठेवलेला आरोप काढून घ्या. न्यायाच्या कामांत मला फार चौकस आणि सावध राहिलं पाहिजे. आतां ह्या नवीन उपस्थित झालेल्या खटल्यांत सरकार फिर्यादी आणि आपण आरोपी—गुन्हेगार म्हणजे खुनी आहांत !"

" पण तुमच्या जवळ ही फिर्याद नोंदण्याकरितां कोण आलं आहे ? मी तो गवळ्या पोर पुढें न येईल अशी व्यवस्था करतों—"

" आतां तुम्ही जास्त न बोलाल तितकें चांगलें. कारण तुमचा एक एक शब्द तुह्माला संकटांत घालण्यास कारण होईल. " मिशावरून हात फिरवीत फौजदार म्हणाला.

भाऊसाहेब आतां अगदींच गडबडले. फौजदाराचा प्रत्येक शब्द आतां त्यांना भीति उत्पन्न करीत होता. ते कचरत म्हणाले, " पण फौजदारसाहेब, तुम्ही ही नवीन भानगड कशाला उपस्थित करतां ? मी त्याला मारलं ही गोष्ट मी कबूल करतों पण त्याचा खून मात्र मी केला नाहीं. परंतु तें कांहीं जरी झालं असलं तरी फौजदारसाहेब, तुम्ही मला संभाळून घेतलं पाहिजे. " असें ह्मणून भाऊसाहेबांनीं फौजदाराचा हात आपल्या हातांत घेऊन दाबला.

" छे भाऊसाहेब, तुह्मी ही अशी भलतीच भीड घालूं नका. हें न्यायाचें काम आहे. ही लहानसहान गोष्ट नाहीं. पुढें मागें नबाब साहेबांच्या कानावर गेली तर मी गरीब मनुष्य उगाच मधल्यामध्यें मरून जाईन."

थोडेसें वळतें असें पाहतांच भाऊसाहेबांनीं आणखी दोन वळसे देण्याचा विचार केला आणि त्याप्रमाणें तो साध्यहि झाला. हळु हळू फौजदारानें एक हजार रुपयांचें गिऱ्हाईक तयार केलें. रुपये सायंकाळीं आणून दिल्यावर आपण गवळ्याला गांवाबाहेर हांकून देऊं असें शेवटीं फौजदारानें कबूल केल्यावर भाऊसाहेब तेथून उठले. आणि ' जिवावरचें शेंपटीवर गेलें ' असें समजून गेटावर आले. त्याचवेळीं प्रभाकरही आपल्या साहाय्यकर्त्याला—मुकुंदशेटजींना भेटण्याकरितां शहरांत गेला होता. त्यानें सर्व हकीकत त्यांना सांगितल्यावर त्यांच्या बऱ्याच गोष्टी झाल्या. यशवंताविषयीं आस्थेनें शोध करणार कोणीच नसल्यामुळें प्रभाकराला तें काम आपल्या अंगावर घ्यावें लागलें. त्याचा शोध लागेपर्यंत तुला कांहीं एक करतां येत नाहीं असें मुकुंदशेटनीं त्याला सांगितलें. पुढें संध्याकाळच्या सुमारास त्यांचा निरोप घेऊन प्रभाकर घरीं येण्यास निघाला. यशवंताचा आपणास शोध कसा लागेल ह्या विचारांत तो चालला असतां दैवयोगानें शेतांतून गुरांच्या मागून पळत असलेला गवळ्या त्याच्या दृष्टीस पडला. तेव्हां त्यानें त्याला हांक मारिली. प्रथम गवळ्या पुढें येईना. परंतु हाका मारणारी व्यक्ति आपणास त्रास देणारी नाहीं अशी त्याची खात्री झाल्यावर तो पुढें आला. गांवांत खूनाच्या पसरलेल्या बातमीचा उत्पादक तोच आहे, हें प्रभाकराला माहित होतें. तेव्हां प्रथमपासून त्यानें काय काय गोष्टी घडल्या त्या विचारून घेतल्या, आणि शेवटीं विचारलें, " मग तूं पुढें काय केलेंस ? " तेव्हां त्यानें सांगितलें कीं, ' यशवंताला आपण तेथेंच टाकून प्रथम रायबाकडे गेलों व त्याला सर्व हकीकत सांगितली. मग तेथून पुनः शेतांत जावें असा विचार होता. परंतु भीति वाटूं लागल्यामुळें आपण परत न जातां घरीं गेलों. दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठतांच प्रथम शेतांत गेलों. परंतु त्या ठिकाणीं यशवंताचें प्रेत नव्हतें. तें रात्रींच कोणीतरी नेलें असावें असें आपणास वाटलें ' ही पुढली हकीकत ऐकून रायबाकडे जावून चौकशी केली असतां आपणास जास्त माहिती मिळेल असा विचार करून प्रभाकर घरीं आला.

रात्रीं आठ वाजून गेले होते. काशी नुकतीच बाहेरून येऊन आपल्या घरांत गेली होती. अलीकडे दोन दिवस आपला बाप—रायबा आजारी म्हणून ती वाड्यांत कामाला जात

नव्हती. रोज अष्टौप्रहर देवडीवर बसणारा रायबा दोन दिवस झाले घरांतून बाहेर पडला नव्हता. त्याला काय होत होतें तें कोणालाच माहिती नव्हतें. नाहीं म्हणायला काशी दिवसांतून दोन चारदां शास्त्रीबुवाकडे जावून औषधमात्र घेऊन येत होती. आतां ती नुकतीच शास्त्रीबुवाकडूनच आली होती. तिनें आंत आल्यावर पुनः दरवाजा बंद करून घेतला. थोडावेळ झाल्यावर दरवाजा खडबड वाजूं लागला. त्यावेळीं रायबा वरच्या कोठींत होता. बाहेरचा दरवाजा वाजलेला ऐकतांच तो खालीं आला आणि भींतीजवळ पसरलेल्या घोंगडीवर अंगावरून पांघरूण घेऊन निजला. काशी जवळच उभी होती. तिच्याकडे पाहून त्यानें खूण केली तेव्हां पुढें होऊन तिनें दरवाजा उघडला. परंतु दरवाजा उघडित असतां तिची छाती धडधडत होती आणि हात कांपत होते. अशी भीति तिला का वाटत होती, त्याचें कारण तिचें तिलाच ठाऊक! तिनें दरवाजा उघडतांच सुभानजीपाटील तिच्या दृष्टीस पडला.

" काय काशी, रायबा आहेका घरांत ? "

" आहे. पण आज दोन दिवस त्याच्या जिवाला बरें नाहीं. "

" काय होतं त्याला ? " असें म्हणून सुभानजी पुढें झाला. " काय रायबा, काय खबर आहे ? "

" आतां आह्मां म्हाताऱ्यांची खबर कसली ! एक दिवस चांगली, एक दिवस वाईट असं हें आतां चालायचं ! "

" हे थंडीवाऱ्याचे दिवस तेव्हां हें असं चालायचंच खरं ! पण रायबा, मी एका कामाकरितां आलों आहें. त्या दिवशीं रात्रीं गवळ्या येथें येऊन काय सांगत होता ? "

" केव्हां ? "

" त्या दिवशीं हो ! भाऊसाहेबांनीं यशवंताला मारलं त्या दिवशीं ! "

" कांहीं नाहीं बुवा ! तो काय मला सांगणार ? "

" सांगणार काय तें मी काय सांगूं ? पण सांगितलं काय तें सांगा ? तो प्रथम येथें आला—"

" तो असंच कांहीं सांगत होता कीं, भाऊसाहेबांनीं यशवंतरावाला मारलं. पण मी तिकडे लक्षच दिलें नाहीं. म्हटलं हें त्यांचं रोजचेंच चाललं आहे. शिवाय त्या दिवशीं माझी तब्यतहि बरी नव्हती. "

" मग तुम्हांला ह्या बाबतींत कांहीं जास्त माहित नाहीं तर ? "

" मला काय जास्त माहित असणार ! उलट मीच तुम्हाला आतां विचारणार होतों. "

सुभानजी पाटील उठला. त्याची अगदीं निराशा झाली. आपणास रायबाकडून कांहीं तरी बातमी कळेल असें त्याला प्रथम वाटलें होतें. त्याला प्रभाकरानें मुद्दाम चौकशी करितां पाठविलें होतें. तो स्वतःच रायबाला विचारण्याकरितां येणार होता; परंतु आधल्या दिवशीं भाऊसाहेबांनीं त्याच्यावर भलताच आरोप ठेविल्यापासून देशमुखवाडी जवळ जाण्यासहि त्याचें मन घेईना. म्हणून त्यानें सुभानजीला बोलावून त्याच्याकडे ती कामगिरी सोंपविली होती. तो आतां जेवण आटोपून सुभानजीची वाट पहात बसला होता. इतक्यांत भाऊसाहेबांच्या खाणीवरील कारकून हरिभाऊ आला. त्याला पाहतांच प्रभाकराला अत्यंत आश्चर्य वाटलें. कारण तो कधींहि येणारा नसून त्याचें आणि प्रभाकराचें नमस्कार चमत्काराशिवाय विशेष संघटनहि नव्हतें. अशा काळोख्या रात्रीं गेटावरून इतक्या लांब तो आला आहे, त्याअर्थी आपण जी गोष्ट कळावी म्हणून अपेक्षा करीत आहोंत तीच गोष्ट तो सांगण्याकरितां आला असावा असेंहि त्याला वाटलें.

" प्रभाकरराव, जेवण वगैरे झालं का ? " नमस्कार करून आपल्या खिशांतून एक पत्र काढीत हरिभाऊ म्हणाला, " मी आज आपणाकडे मुद्दाम आलों आहें. हें पत्र वाचा मग मी आपणास सर्व हकीकत सांगतों. "

बहुतकरून यशवंताचेंच पत्र आलें असावें असें वाटून तें हातांत घेतांना त्याचा हात किंचित् कंपायमान झाला. त्यानें तें पत्र उघडलें. आणि वाचण्यास सुरवात केली. जसजसा तो तें पत्र वाचूं लागला, तसतशी त्याची चर्या गंभीर दिसूं लागली. तें पत्र येणें प्रमाणें होतें—

" मित्रवर्य रा. बाबुराव यांस—न. वि. वि—

" आपणास हें पत्र कोणत्या हातानें लिहूं ? माझ्या सर्व आशा पार रसातळाला गेल्या. आपण पाठविलेले साडेतीनशें रुपये सर्व खर्च झाले. असें म्हणण्यापेक्षां मंडळींनीं मला फसवून त्यांची विल्हेवाट लाविली. आमचा अद्यापि खेळ झाला नाहींच. पण उलट माझ्यावर शेंपन्नास रुपये कर्ज मात्र झालें. मंडळींनीं आपला पगार, खाणावळीचे पैसे कांहीं कपडे यांतच त्या रकमेचा व्यय करून टाकिला आणि आतां आह्मां दोघांतिघांशिवाय सर्व मंडळी निघून गेली. त्यामुळें मी मोठ्या विचारांत आहे. आतां काय करावें हें सुचत नाहीं. मला ह्या नाटकाचा आतां वीट आला आहे. काय करूं हेंच कळत नाहीं. घरीं

येण्यास मला आतां तोंड नाहीं. आपण एकवेळ आपल्या ह्या गरीब मित्राला कांहीं मदत कराल तर अगणित उपकार होतील. मुंबईत एक संगीत नाटक मंडळी निघाली आहे. त्यांना स्त्रीपार्टी पाहिजे आहेत. मी आजच त्यांना एक पत्र लिहिलें आहे. तेथें मला नोकरी लागली तर मी आपले पैसे हळु हळू फेडून टाकीन. पत्राचें उत्तर पाठवावें. कळावें.

आपला संकटांत सांपडलेला मित्र—मधुकर. ”

पत्र वाचून झाल्यावर प्रभाकरानें हरिभाऊस विचारलें, “ हें पत्र तुह्मांला कसें व कोठून मिळालें ? ”

“ परवां—आग लागली त्याच दिवशीं दुपारीं गेटावर मी काम करीत होतों. बाबुरावहि कांहीं लिहीत होते. परंतु त्या दिवशीं त्यांचें लक्ष कामाकडे नव्हतें. ते मधून मधून कांहीं पत्रें खिशांतून काढीत, वाचीत आणि पुनः खिशांत ठेवीत; असा त्यांचा क्रम चालला होता. माझें त्यांच्याकडे चांगलें लक्ष होतें. मी एकदोनदां त्यांना विचारलें, तेव्हां ते म्हणाले, “तुला काय इतकी पंचाईत ! तूं मुकाट्यानें आपलें काम कर ! ” मग मी त्यांच्याशीं बोललोच नाहीं. पण त्या गडबडींत हें एक पत्र खालीं पडलें तें त्यांच्या लक्ष्यांत आलें नाहीं. मी तें पाहिलें परंतु मुद्दामच त्यांना बोललों नाहीं. कारण त्या पत्रांत काय आहे, हें जाणण्याची मला जिज्ञासा झाली होती. थोड्या वेळानें ते उठून खाणीवर गेले. तेव्हां मी तें पत्र उघडून वाचलें. प्रथम हें पत्र बाबुरावास परत द्यावें असा विचार माझ्या मनांत आला. परंतु पुनः मी विचार केला कीं, हें पत्र मधुकरानें पुण्याहून लिहिलें आहे, तेव्हां तें तुह्मांला दाखवून तुमच्यां विचारानें पुढें काय तें करावें. आज दोन दिवस मी तुह्माला भेटण्याकरितां येण्याचा विचार करतों पण ही यशवंतरावांची भानगड मध्येंच उपस्थित झाल्यामुळें भाऊसाहेब गेटावर येत नाहींत. त्यामुळें मला जाग्यावरून हालतां येईना. शेवटीं आतां निश्चयच करून आलों आहें. आतां आपण सांगाल त्याप्रमाणें करीन. तुमची इच्छा असेल तर मी वाटेल ती सबब सांगून हें पत्र उद्यां बाबुरावास देईन. ”

“ नको. हें पत्र आतां मजजवळच राहूं द्या. मला ह्या पत्राचा फार उपयोग होईल. ” असें म्हणून प्रभाकरानें विषय बदलला. तो म्हणाला, “ पण काय हो हरिभाऊ, आपल्या यशवंताविषयीं तुह्माला कांहीं कळलं आहे काय ? ”

“ नाहीं. कांहीं भलत्यासलत्या गांवांत पिकलेल्या कंड्या मात्र ऐकतों. ”

अशा रीतीनें त्यांच्या गोष्टी चालल्या असतां सुभानजी पाटील आला. तेव्हां हरिभाऊ जाण्याकरितां उठला. जातां जातांना प्रभाकर त्याला म्हणाला, "हरिभाऊ, ह्या पत्रा-संबंधानें कुठेंहि चकार शब्द बोलूं नका. मी एक दोन दिवसांत तुम्हांला भेटून पुढें काय करायचें तें सांगेन." इतकें बोलून प्रभाकरानें त्याला आंबराईच्या दरवाजापर्यंत जाऊं दिलें नंतर तो सुभानजीला म्हणाला, "पाटील, एका गोष्टीचा तर शोध लागला. हें वाचा—"

पाटलानें तें पत्र वाचलें परंतु त्याला त्या पत्राचा बोध झाला नाहीं. तथापि प्रभाकरानें किंचित् सूचना करतांच सर्व गोष्टी त्याच्या एकदम लक्षांत आल्या. बराच वेळ त्यांच्या गोष्टी झाल्यावर रायबाकडून यशवंताबद्दल कांहींच बातमी कळली नाहीं, असें त्यानें सांगितलें. तें ऐकून प्रभाकराचीहि निराशा झाली.

सुभानजी घरीं गेल्यावर प्रभाकरानें आपणावर भाऊसाहेबांनीं चोरीचा आरोप घेतला आहे, ती चोरी कोणीं केली व त्या पैशाचा विनियोग कोणीं केला इत्यादि सर्व हकी-कत राधाआका आणि आई यांना सांगितला. तेव्हां सावित्रीबाई म्हणाली, "प्रभाकर, त्या कार्ट्याला तूं पै देखील पाठवूं नकोस.! मागूं दे त्याला आतां अशीच भीक!"

इकडे हरिभाऊ आंबराईतून बाहेर पडला. आणि ठेचा खात हळुहळू जाऊं लागला. ती काळोखी रात्र होती. त्यांतून दोन्ही बाजूंनीं वृक्ष असल्यामुळें जास्तच काळोख पडला होता. तशा काळ्याकुट्ट अंधारांतून तो थोडा पुढें चालून गेल्यावर समोरून कोणी तरी येत असावें असें त्याला वाटलें. ती येणारी व्यक्ति कोण असावी असा तो विचार करतो तोंच त्याला बांगड्यांचा आवाज ऐकूं आला. तेव्हां तो हळूच खांकरला. आणि हळुहळू पुढें जाऊं लागला. तेव्हां त्या स्त्रीनें 'कोण—प्रभाकरराव का?' असा प्रश्न केला. परंतु त्या प्रश्नाला उत्तर न देतां तो पुनः खांकरला. त्यावेळीं त्याच्या मनांत एक भलताच संशय आला. हें कांहीं तरी प्रेमरहस्य असावें असें वाटून तो तेथेंच उभा राहिला. तेव्हां ती स्त्री अगदीं जवळ येऊन म्हणाली, "का—बोलायचं नाहीं वाटतं? काल गजरानें पत्र दिलं ना?"

हरिभाऊ कांहींच बोलला नाहीं. तें पाहून ती स्त्री पुढें होऊन त्याचा हात धरून म्हणाली, "असा एखाद्याचा अंत पाहणं चांगलं का? पण—" इतक्यांत [illegible] कांहीं

संशय आला. त्याबरोबर तिनें चटकन् त्याचा हात सोडला आणि " तुम्ही–तुम्ही कोण ? " असें तिनें कातर स्वरांत विचारलें.

" मी तुमचा हरिभाऊ. "

" अगबाई—! "

" अशा भिऊं नका वत्सलाबाई. पण तुम्ही इतक्या रात्रीं कुठें जात होतां ? "

" मी–मी–" वत्सला गोंधळली. " मी जात होतें–मी मी जात होतें प्रभा–त्या यशवंतची चौकशी करण्याकरितां. पण तुम्ही ही गोष्ट नाहींना कुणाला सांगणार ? तुम्हाला माझी शपथ आहे. "

हरिभाऊ ' नाहीं ' म्हणतांच वत्सला मागें फिरली. तिच्याकडे पहात आणि नुकत्याच घडलेल्या गोष्टीचा विचार करीत तोहि आपल्या मार्गाला लागला.



# प्रकरण ३५ वें.



## नोटीस दिली.





दिवसा मागून दिवस लोटूं लागले. यशवंताची कांहींच खबर कळेना. बातमी पसरल्याप्रमाणें खरोखरीच त्याचा खून झाला, किंवा तो जिवंत आहे अशी निश्चयात्मक कोणतीच बातमी कळेना. त्याचे कपडे, त्याच्या आवडीच्या वस्तु जागच्या जागींच धूळ खात पडल्या होत्या. त्याकडे दृष्टि जातांच किंवा त्या दृष्टीस पडतांच सगुणाबाईच्या नेत्रांतून खळकन् अश्रु वाहूं लागत. पतीच्या बोलण्यावर विश्वास ठेऊन ती आपल्या मनाचें समाधान करण्याचा पुष्कळ प्रयत्न करीत असे. पण गवळ्यानें त्याच्या खुनाची भयंकर बातमी सांगितली त्यावेळीं तिच्या मनाला बसलेला धक्का अद्यापि कायमच होता. गावांतील लोक आणि वाड्यांतील नोकरचाकर यशवंताविषयीं अनेक कुतर्क काढीत. कोणी म्हणे, ‘ भाऊसाहेबांनीं त्याचा खून केल्यावर त्याला तेथेंच पुरून टाकलें. ’ कोणी म्हणे, ‘ तो चोरी करून पळून गेला. ’

परंतु यशवंत कुठें आहे ! त्याच्या काळजीनें बिचाऱ्या सगुणाबाईची आणि कृष्णीची किती शोचनीय अवस्था झाली होती ! दुःख किंवा शोक करणें झाल्यास त्यांचीहि त्यांना घरांत चोरी ! ज्या वेळीं त्या दोघींना एकांत मिळत असे त्य वेळीं त्या एकमेकींच्या गळ्यांत गळा घालून मुळुमुळूं रडत असत. प्रभाकराकडून यशवंताचा शोध करवावा अशी सगुणाबाईची फार इच्छा ! परंतु प्रभाकराची तरी भेट होणार कशी ? कारण अलीकडे त्यानें देशमुखवाडीच्या आसपासहि येण्याचें अगदीं वर्ज केलें होतें. कृष्णीला अंबराईंत पाठवावें तर कोणी पाहील ही भीति. अशा भीतींत, दुःखांत आणि चिंतेंत दिवसा मागून दिवस लोटूं लागले. शेवटीं आज तिनें काळोख पडल्यावर कृष्णीला आंबराईंत पाठविण्याचा निश्चय केला आणि तिनेंहि जाण्याचें धैर्य केलें. असा त्यांचा बेत चालला

असतां पोष्टाचा शिपाई भाऊसाहेबांच्या नांवाचीं कांहीं पत्रें घेऊन आला. त्यानें दोन चार पत्रें काढून भाऊसाहेबांच्या नांवाचें एक रजिस्टर पत्र पुढें केलें. कृष्णीनें पुढें होऊन तीं पत्रें घेतलीं, तेव्हां शिपाई म्हणाला, " हें एक रजिस्टर पत्र आहे, त्याच्या पावतीवर भाऊसाहेबांची सही पाहिजे. "

कृष्णी तीं पत्रें घेऊन आंत गेली. त्यावेळीं भाऊसाहेब स्नानाच्या गडबडींत होते. कृष्णीनें पत्रें पुढें करतांच ते एकदम रागावून म्हणाले, " इथें कशाला आणलींस तीं पत्रें ! मी स्नान करतों तें तुला दिसत नाहीं ? मूर्ख नाहीं तर जा—माझ्या खोलींत नेऊन ठेव. "

" पण हें एक रजिस्टर पत्र आहे. त्याच्या पावतीवर सही पाहिजे. " हळूच भीत भीत कृष्णी म्हणाली.

रजिस्टर पत्र आहे, असें ऐकतांच भाऊसाहेब थंड झाले. आणि आपलें स्नानाचें पाणी थंड होऊं नये ह्मणून तें उपसूं नकोस असें नोकराला सांगून ते बाहेर आले. आपणास रजिस्टर पत्र कोणाचें आलें असेल याचा विचार करीत त्यांनीं पावतीवर सही केली आणि पत्रावर लिहिलेल्या पत्त्यावर नजर टाकली. तें पत्र त्यांना बळवंतराव ह्या नांवानें आलें होतें. अलीकडे कित्येक वर्षें त्यांचें खरें ' बळवंतराव ' हें नांव लोपल्यासारखें झालें होतें. कारण त्यांचा सर्व पत्रव्यवहार ' भाऊसाहेब देखमुख ' ह्याच नांवानें चालत असे. त्यामुळें पत्रावरील नांव वाचून ते क्षणभर विचारांत पडले. आपणास नांवानें रजिस्टर पत्र पाठविणारा कोण असावा, याचा विचार करीत त्यांनीं पत्र फोडलें. आणि मजकुरावरून आपली दृष्टि फिरविली. त्यावेळीं त्यांची मुद्रा पाहण्यासारखी होती. कपाळाला आंठ्या, डोळे मोठे केलेले आणि ओंठ दातांत चावून धरलेले, अशी त्यांची मुद्रा रागीट दिसूं लागली. ते स्वतः बरोबर कांहीं पुटपुटूं लागले. हा सर्व प्रकार सगुणाबाई खोलीच्या दरवाजांतून पहात होती. ती पुढें होऊन भीत भीत म्हणाली, " कोणाचं एवढं पत्र आलं आहे ? "

" तुझ्या लाडक्या येशाचं ! तुला वाटलं मी त्याचा खून केला पण कर आतां खात्री ! पहा कसा सर्पासारखा उलटला–" असें म्हणून त्यांनीं तें पत्र सगुणाबाईच्या अंगावर फेंकलें. " आतां स्वस्थ बसून उपयोगाचं नाहीं, मलाहि आतां वकिलाची सल्ला

घेतली पाहिजे." असें म्हणून ते हातपाय आपटीत स्नानाकरितां निघून गेले. सगुणाबाईनें तें पत्र उचललें. पण तें पत्र नसून नोटीस होती व ती पुण्याहून दीक्षित वकिलाकडून भाऊसाहेबांना आली होती. सगुणाबाईनें खालीं लिहिल्याप्रमाणें ती नोटीस वाचली--

न. वि. वि. आमचे अशील रा. रा. **यशवंतराव देशमुख** यांच्या सांगण्यावरून आम्ही आपणास ही नोटीस देत आहोंत. आपण कै. **दादासाहेब देशमुख** यांच्या मागें देशमुखवाडीच्या वतनाचा, त्यांच्या सर्व स्थावर जंगम जिंदगीचा आजपर्यंत उपभोग घेत आला आहांत परंतु आतां लवकरच आमचे अशील रा. रा. **यशवंतराव देशमुख, कै. दादासाहेब देशमुखांच्या** वतनाचे आणि त्याच्या सर्व स्थावर जंगम जिंदगींचे खरे मालक त्याचा ताबा घेण्याकरितां लवकरच येथें येणार आहेत.करितां ऐन वेळीं आपली गडबड उडूं नये व हिशोब वगैरे करण्यास योग्य वेळ मिळावा म्हणून ही एक महिन्याची नोटीस पाठविली आहे, कळावें.

आपला नम्र,
दीक्षित वकील.

ही नोटीस वाचून आपल्या पतीवर कोणतें संकट येऊं पहात आहे याची किंचित्‌हि. कल्पना न होतां सगुणाबाईच्या मनांत पहिला विचार आला तो हा कीं, यशवंत जिवंत असून तो सध्यां पुण्यास आहे. ह्या विचारानें ती आनंदित होऊन बाजूला उभी असलेल्या कृष्णीला म्हणाली, "कृष्णा, आपला यशवंत पुण्यास गेला. हें पहा त्यानेंच पत्र लिहविलें आहे. कुठेंहि का असेना, पण सुखी असला म्हणजे झालें!"

भाऊसाहेबांनीं घाईनें भोजन उरकून शहरांत जाण्याची तयारी चालविली. अलीकडे फुलशहरांत त्यांची रोज एक खेप होऊं लागली होती. नाहींतर महिना महिना त्यांना शहरांत जाण्याचा प्रसंग येत नसे. आणि यदाकदाचित् प्रसंग पडला तरी ते टाळाटाळ करीत असत. परंतु आतां मात्र त्यांच्यावर प्रसंगच असे चमत्कारिक होते कीं, टाळाटाळ करून चालण्यासारखें नव्हतें. आतां घरांतून बाहेर पडतांना त्यांनीं कृष्णीला हांक मारून तिच्या जवळून पत्र मागून घेतलें. ते गाडींत बसतांच रामजीनें गाडी चालू केली. आणि त्याबरोबर त्यांचे विचारहि सुरू झाले. 'त्या दिवशीं आपणास उत्तम संधी मिळाली होती तिचा आपण कसून फायदा घेतला नाहीं' म्हणून आतां त्यांचें मन त्यांना खाऊं लागलें. यशवंताला आपण मारल्यानंतर तो खालीं पडला, तेव्हां आपण एक धोंडा उचलून त्याच्या कपाळांत मारला. पण त्यानें त्याचा कपाळमोक्ष केला कीं

नाहीं हें न पाहतां आपण निघून आलों, त्यामुळेंच हा सर्व घोंटाळा झाला. नाहींतर आज आपणास वकिलाकडून नोटीस देण्यांत तो जिवंत तरी राहिला असता कोठून ? '

भाऊसाहेब आले त्यावेळीं वकील साहेब घरींच होते. भाऊसाहेब आंत येतांच वकिलसाहेबांनीं विचारलें, "काय भाऊसाहेब काय हा गोंधळ उडविला आहांत ? जो तो तुमच्या नांवानें शंख करतो आहे, तुम्हीं खून केला, ह्याशिवाय गांवांत दुसरी चर्चाच नाहीं. पण भाऊसाहेब जग कांहींहि म्हणो पण तुमची छाती खरी ! तुम्ही म्हणूनच तें काम पार पाडलंत ! "

"विश्वंभरराव, तुम्ही आहांत कोणत्या भ्रमांत ?–जग काय म्हणतं, माझी छाती कसली आणि तुम्ही बोलतां काय ? अहो, हा सर्व तुह्मांला भ्रम झाला आहे. हें पहा–वाचा, म्हणजे कळेल काय गोंधळ आहे तो ! " असें म्हणून त्यांनीं खिशांतील रजिस्टर पत्र काढून त्यांच्या हातांत दिलें. विश्वंभररावांनीं तें पत्र वाचतांच एकदम म्हटलें, "का— मी म्हटलं त्या गोष्टीची आली ना प्रतीति ! म्हणून म्हणत होतों कीं, त्याला आपल्या मार्गांतून दूर करा. पण नाहीं–तुम्हीं तें ऐकलें नाहीं. पण आतां बोलून काय उपयोग ? हें आतां सुरळीत न्यायाप्रमाणें होणार. त्यानें ही आतां नोटीस दिली आहे, त्याप्रमाणें तो येथें येऊन हक्कानें सर्वांचा ताबा घेईल आणि तुम्हाला मुकाट्यानें देशमुखवाडी सोडावी लागणार. "

हें आपल्या वकिलाचें भाषण ऐकून भाऊसाहेबांचे हातपाय अगदींच गळाले. ते म्हणाले, " विश्वंभरराव, ह्याला कांहीं तोड नाहीं का ? मी तर मोठ्या आशेनें तुमच्याकडे आलों पण तुम्ही तर माझे हातपाय अगदींच मोडून टाकलेत. आज इतकीं वर्षें मी हाडांचीं काडें आणि रक्ताचं पाणी करून शेवटीं असा परिणाम व्हावा काय ? विश्वंभरराव, काढा कांहीं तरी युक्ति काढा ! अहो, आज इतकीं वर्षें मी देशमुख म्हणून ह्या वतनाचा उपभोग घेतला आणि आतां तें सोडायचं, त्यापेक्षां मरण काय वाईट ! "

विश्वंभररावांनीं बराच वेळ विचार केल्यावर डोकें खाजवीत गंभीरचर्या करून म्हटलें, " भाऊसाहेब, आहे ह्या गोष्टीला एक उपाय पण—"

" पण आणि परंतु करीत नका राहूं आतां विश्वंभरराव ! काय असेल तें आतां स्पष्ट होऊं द्या. हा अगदीं आणीबाणीचा वेळ आहे. गोष्ट आतां निकरावर येऊन ठेपली

आहे. आतां कोणत्याहि गोष्टीला क्षमा म्हणून नाहींच ! बोला–काय उपाय आहे, असें आतां अडखळूं नका."

"अडखळत नाहीं. पण उपाय फार जोखमाचा आहे."

"हरकत नाहीं. बोला–आपण येशाविषयीं जो विचार केला होता त्यापेक्षां आणखी जोखमाचा आहे काय ? आणि असला तरी बोला."

क्षणभर विचार करून वकिलसाहेब म्हणाले, "हें पहा भाऊसाहेब, जोखमाचा म्हणजे असा कीं, तुम्हांला ही देशमुखवाडी पचविणें असेल तर एक खोटं उईल तयार केलं पाहिजे."

"इतकंच ना ? पण त्यांत काय मोठंसं ?"

"असं कसं म्हणतां ? अहो, त्या वेळचं उईल तयार केलं पाहिजे, साक्षीदार तयार केले पाहिजेत, त्यांच्या सह्या मिळविल्या पाहिजेत आणि मग—"

"मग काय ? येऊन जाऊन तुमच्या मेहनतीचाच प्रश्न ना ! त्याकरितां माझी पूर्ण तयारी आहे. जसें आपलें हें खोटें उईल, तसेंच साक्षीदारहि खोटेच तयार करा म्हणजे झालं ! मी तुम्हाला ह्या कामाबद्दल तीन शून्याचा एक पुरा आंकडा देईन मग तर झालं ना ?"

"बस्स–एकच आंकडा ? त्या दिवशीं कांहीं एक न करतां त्या फौजदाराला तुम्ही एकदम एक हजाराची रक्कम कबूल केली आणि हें काम म्हणजे–"

"पण तुम्हाला कोणीं सांगितलं ?"

"कोणीं सांगितलं ! अहो, आम्ही बोलून चालून वकिल–पाताळयंत्री लोक ! आम्हाला जर ह्या अशा शुल्लक गोष्टी कळाल्या नाहींत तर मग त्या कळाव्या तरी कोणाला?"

"पण मी कांहीं अद्यापि त्याला एक पैहि दिली नाहीं. आणि आतां त्याला देण्याची तरी काय जरूरी आहे ?"

शेवटीं पांच हजार रुपये ठरले. त्या दिवशीं यशवंताची आणि आपली झटपट झाली, तींतून तो निसटला तो थेट पुण्यास गेला आणि जातांना त्यानें आपल्या तिजोरींतून जे पैसे चोरले त्याचा त्याला आतां ही नोटीस वगैरे देण्यांत उपयोग होत आहे असें

भाऊसाहेबांच्या मनांत अनेक विचार आले. आणि ते विचार त्यांनीं आपल्या वकिलाजवळ बोलूनही दाखविले. शेवटीं नवीन कार्याची आंखणी करून ते खाणीवर गेले.

त्या दिवशीं सायंकाळीं प्रभाकर आपल्या शेतांतून परत आल्यावर कमळानें त्याच्या नांवाचें पुण्याहून आलेलें एक पत्र दिलें. तें पत्र आपण पाठविलेल्या पत्राचें उत्तर आहे असें तो तेव्हांच समजला. त्यानें थोड्या दिवसा पूर्वीं हरिभाऊकडून बाबुरावांच्या नांवानें मधुकराचें पत्र मिळाल्यावर माधवरावास एक पत्र लिहून 'हल्लीं मधुकर काय करतो ?' इत्यादि माहिती काढून उत्तर लिहिण्यास सांगितलें होतें. त्याच पत्राचें उत्तर हें आहे असें समजून त्यानें तें जेवण झाल्यावर स्वस्थ चित्तानें वाचण्याचा विचार केला. तथापि जेवण होत असतां पत्रांत काय मजकूर असेल याचा त्याच्या मनांत विचार चालूच होता. तो रात्रीं जेवण्याकरितां बसला म्हणजे सावित्रीबाई त्याच्या जवळच बसत असे. आणि त्यावेळीं त्यांच्या सुखासमाधानाच्या गोष्टी चालत असत. केव्हां आंबराईबद्दल, तर केव्हां नवीन घेतलेल्या शेताविषयीं तर कधीं देशमुखवाडीच्या गोष्टी बोलत बोलत त्या लहानशा आनंदी कुटुंबाचें एकत्र जेवण होत असे. अलीकडे यशवंत हा त्यांचा बोलण्याचा विषय होता. अशा रीतीनें त्यांचे जेवतांना निरनिराळे विषय निघत असत परंतु चुकूनहि मधुकराविषयीं कोणी गोष्ट काढीत नसत. असो. जेवण झाल्यावर प्रभाकर माडीवर आला आणि त्यानें पुण्याहून आलेलें पत्र फोडलें. तें पत्र बरेंच मोठें होतें. त्यानें एकदां तें पत्र वाचलें. परंतु त्या पत्रांतील मजकुराचा त्याला चांगलासा अर्थ कळला नाहीं. म्हणून त्यानें तें पत्र पुनः वाचलें. बराच वेळ तो त्या पत्राचा विचार करीत होता. अशा रीतीनें एक तास तो तें पत्र हातांत घेऊन विचार करीत होता. इतक्यांत खालून सावित्रीबाईनें त्याला हांक मारिली. तेव्हां त्यानें तें पत्र खिशांत ठेवून तो खालीं जाऊं लागला परंतु सावित्रीबाईच वर येत असलेली पाहून तो पुनः मागें फिरला. सावित्रीबाईच्या मागून राधाआकाहि वर आली. नंतर कमळा आणि कृष्णा ह्या दोघीजणी वर आल्या. इतक्या रात्रीं कृष्णीला एकटीच आपल्या घरीं आलेली पाहून त्याला आश्चर्य वाटलें.

" प्रभाकर, ही कृष्णा सगुणाबाईचा निरोप घेऊन आली आहे. " सावित्रीबाई तिच्या पाठीवर हात ठेऊन म्हणाली " ये कृष्णा, अशी लाजूं नकोस. काय पोरीची ही दशा झाली पहा ! "

" दशा नाहीं होईल तर काय ? " राधाआका म्हणाली, " तो ब्रह्मराक्षस पाठीस लागला आहे तेव्हां दशा नाहीं होणार तर काय होईल. बिचाऱ्या त्या सगुणाबाईचं मागच्या जन्मीचं काय पाप उभं राहिलं म्हणून तिला हा असा राक्षस नवरा मिळाला. तीच म्हणून हें इतकं दुःख काढते. "

स्वतःविषयीं सहानुभूतीचे शब्द ऐकून कृष्णीच्या डोळ्यांत पाणी आलें. परंतु तिनें तें चटकन् पुसलें. तिला आज सकाळीं ठरल्याप्रमाणें सगुणाबाईनें मुद्दाम आंबराईंत प्रभाकराजवळ पाठविलें होतें. आणि ती मोठें धैर्य करून आली होती. परंतु इतक्या मंडळींत प्रभाकराबरोबर बोलण्यास तिला नैसर्गिक संकोच वाटूं लागला. तिच्याजवळच कमळा उभी होती. तिच्याकडे पाहून ती हळूंच म्हणाली, " कमळा, मला लवकर गेलं पाहिजे. मी ताईच्या नकळत आलें आहे. "

" आणि बळवंतराव नाहीं वाटतं घरांत ?" आकानें विचारलें.

" ते आज लवकर निजले, म्हणून मला यायला मिळालं. आत्या खिडकींत माझी वाट पहात असेल. "

" वरं तुला ताईसाहेबांनीं का पाठविलं ?" तिचें नांव न घेतां प्रभाकरानें विचारलें. परंतु कृष्णा उत्तर न देतां खालीं मान घालूनच उभी राहिली. तेव्हां सावित्रीबाई म्हणाली, " आज त्यांच्या घरीं यशवंताचें पत्र आलें आहे—"

" काय ?–मग यशवंताचा लागला का पत्ता ? कुठें आहे तो ? "

" पुण्यास ! तेथून त्यानें वकिलाकडून भाऊंना एक नोटीस—" प्रभाकरानें उत्कंठेनें विचारलेल्या प्रश्नाला कृष्णा साहजिकच उत्तर देऊं लागली परंतु तिनें अर्धें देखील वाक्य उच्चारलें नाहीं तोंच प्रभाकर म्हणाला, " मग ती खोटी गोष्ट ! ती नोटीस यशवंताकडून आलेली नाहीं. आणि यशवंतहि तेथें नाहीं. "

" कशावरून ? "

"ह्या पत्रावरून." असें म्हणून प्रभाकरानें आपल्या खिशांतून माधवरावाकडून आलेलें पत्र काढून तें तिच्या पुढें केलें आणि " हें घे–वाच, म्हणजे कळेल. " असें म्हटलें. कृष्णीनें तें पुढें केलेलें पत्र घेतलें परंतु प्रभाकरानें वाचण्याची केलेली आज्ञा

तिला विनयामुळें मान्य करवेना. इतका वेळ त्या दोघांत] झालेलीं स्वाभाविक प्रश्नउत्तरें सावित्रीबाई आणि आका यांनीं मुकाट्यानें ऐकलीं. परंतु आतां कृष्णा कां थांबली, हें त्यांच्या लक्षांत आलें तेव्हां सावित्रीबाई म्हणाली, " वाच–वाच कृष्णा. तुला वाचतां येतें ना !"

" स्नेहांकित—" पुनः कृष्णा अडखळली ! तिनें एकदम वाचण्यास सुरवात केली. खरी पण मध्येंच तिला प्रभाकराच्या नांवानें अडविलें. वास्तविक ती वेळ थट्टेची नव्हती. तथापि कृष्णीचा विनय, मर्यादा आणि त्यांतूनहि दिसून येणारा तिचा धीटपणा पाहून त्या दोघींना आनंद झाला. आका म्हणाली " वाच–बाळ, ऐकूं दे एकदां काय आहे त्या पत्रांत तें ? "

" प्रेमपूर्वक न. वि. वि. आपलें कृपापत्र पावलें " कृष्णा वाचूं लागली "चि. मधुकराबद्दल तुम्हांला कळलेली हकीकत खरी आहे. त्याला त्याच्या मित्र मंडळीनीं साफ फसविलें आहे. सध्यां तो अडचणींत आहे. पण मला भेटण्याचें टाळतो. गेल्या पंधरा दिवसांत मला त्याचा शोध घेण्यास सवड नव्हती त्याचें कारण मी पुढें लिहितों. येथें प्रो. छत्रे यांची सरकस आली आहे, ती पहाण्याकरितां आमचे नानासाहेब आणि मी गेलों होतों. नानासाहेबांची आणि प्रो. छत्रे यांची ओळख असल्यामुळें आम्ही पुढल्या बॉक्समध्यें बसलों होतों. अर्धी सर्कस झाल्यावर एक नाठाळ घोडा सर्कलमध्यें आला. तो मनाप्रमाणें रंगण घेईना असें पाहून प्रोफेसरांनीं त्याला आपल्या हातांतील लांब चाबकाचा तडाखा दिला. तरी तो नीट वळेना तेव्हां त्यानें जोरानें चाबूक मारला. त्यावेळीं तो घोडा अगदीं माझ्याजवळ होता त्यामुळें त्या चाबकाचा फटका घोड्याला बसून त्याचें टोंक माझ्या तोंडावर लागलें व पुढील गांठ बरोबर डाव्या डोळ्यावर बसली. तो फटका बसतांच माझा डोळा फुटला असेंच मला वाटलें तेव्हां प्रोफेसरसाहेब मजजवळ येऊन माझी क्षमा मागूं लागले. नानासाहेबांनीं कांहीं विशेष नाहीं म्हणून वेळ मारून नेली. पण मला मात्र अत्यंत वेदना होत होत्या. मोठ्या संकटानें मी सर्कस आटोपेपर्यंत बसलों. आणि जेव्हां सर्कस आटोपली तेव्हां प्रोफेसरसाहेब पुनः येऊन माझी चौकशी करूं लागले. त्यांनीं माझा डोळा पाहिला तो लाल रक्तासारखा झाला होता. पुढें दुसऱ्या दिवशीं दुपारीं ते पुनः माझी चौकशी करण्याकरितां आले. त्यावेळीं त्यांच्या बरोबर एक गृहस्थ आले होते. ह्या गृहस्थाची आणि त्यांची लखनौला गांठ पडली. ह्या गृहस्थाचें नांव गांव मला अद्यापि कळलें नाहीं. तथापि तो दक्षिणी असून

वयानें पन्नाशीच्या आंत बाहेर असावा. तो अंगानें फारच सशक्त असून उत्तम गवई आहे. प्रोफेसरसाहेबांस अशा गुणी जनांची आवड असल्यामुळें त्यांच्या आग्रहास्तव तो त्यांच्याबरोबर पुण्यास आला आहे. असो.

" ते येऊन बसले आणि माझ्या डोळ्याची चौकशी करीत असतां तुमचें पत्र मला आलें. तेव्हां नानासाहेबांनीं ' पत्र कोठून आलें ? ' म्हणून विचारलें. मी ' जंजिऱ्याहून ' म्हणून उत्तर दिलें. जंजिऱ्याचें नांव ऐकतांच प्रोफेसरसाहेबांबरोबर आलेला गृहस्थ एकदम चपापला. पुढें थोडा वेळ गोष्टी झाल्यावर नानासाहेब पाहुण्यांकरितां चहा आणि फराळाची तयारी करण्याकरितां आंत गेले. तेव्हां ते गृहस्थ मला विचारूं लागले, कायहो माधवराव, जंजिऱ्यास तुमचे कोणी नातेवाईक आहेत काय ? ' तेव्हां मीं नाहीं म्हणून आपलें नांव सांगितलें व आपली ओळख कशी झाली तेंहि सांगितलें. तेव्हां ते गृहस्थ गंभीर मुद्रा करून बराच वेळ विचारांत गढलेले दिसले. मग त्यांनीं तुमच्या-शिवाय जंजिऱ्यांतील इतर कोणाची माहिती मला आहे काय म्हणून विचारिलें. तेव्हां मीं भाऊसाहेब देशमुखांची मला माहिती असल्याचें सांगितलें. अशा रीतीनें फराळ होई-पर्यंत आम्ही गोष्टी बोलत होतों. मी भाऊसाहेबांची बरीच माहिती त्यांना सांगितली. यशवंतरावांची गोष्ट ऐकून त्यांना फार वाईट वाटलें. आणि कोणाहि मनुष्याला ती हकीकत ऐकून वाईट वाटेल. नंतर ' मी उद्यां येईन तेव्हां आपण बोलूं ' असें म्हणून ते गेलें आणि कबूल केल्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं आले. त्यावेळीं आपण मला देशमुखां-विषयीं जी माहिती सांगितली होती, ती सर्व म्हणजे देशमुखांचें वडील चिरंजीव यश-वंतराव नांवाचे होतें. ते डोकें फिरवून घरांतून निघून गेले, पुढें भाऊसाहेबांस देशमुखांनीं घरजांवई केले, त्यांचा दुसरा मुलगा गंगाधर पुण्यास औषधोपचाराकरितां होता तो निवर्तल्यावर त्याचीं मुलें-यशवंत आणि कृष्णा ही परत जंजिऱ्यास गेलीं. पुढें त्याचा छळ इत्यादि सर्व हकीकत मीं त्यांना सांगितली आणि शेवटीं मी तेथें आलों अस-तांना यशवंतरावाच्या वतीनें भांडण्याकरितां मी वकील आलों आहें असें भाऊसाहेबांस समजतांच त्यांची भीतीनें कशी गाळण उडाली तेंहि सांगितलें. तेव्हां ते म्हणाले. " अशी जर खरी वस्तुस्थिति आहे तर मग तुम्ही एखादा वकील गांठून त्याच्याकडून भाऊसाहेबांना नोटीस द्यावयास पाहिजे होती. " असें म्हणून ते नानासाहेबांना म्हणाले,

" कायहो नानासाहेब, तुम्ही वकीलच आहांत आणि आतां तुम्ही ही सर्व हकीकत ऐकलीच आहे. तेव्हां आतां मी तुम्हाला असें विचारतों कीं, माझ्यासारखा एखादा मनुष्य पुढें होऊन त्या यशवंताच्या वतीनें भाऊसाहेबांना वकिलाची नोटीस दिली तर चालेल कीं नाहीं ? " आमचे नानासाहेब 'होय' म्हणून म्हणतांच ' लिहा तर एक नोटीस. तुमचा जो कांहीं खर्च होईल तो मी देतों. ' असें ते म्हणाले. अशारीतीनें ह्या गोष्टीचा बराच खल झाल्यावर त्यांच्या आणि नानासाहेबांच्या पुढें खासगी भेटी होऊं लागल्या. शेवटीं त्यांचें काय तें ठरलें आणि आजच आमच्या नानासाहेबांनीं भाऊसाहेब देशमुखांना एक नोटीस लिहिली आहे. ही गोष्ट अगदीं खासगी आणि गुप्त आहे हें लक्षांत असूं द्या. हे गृहस्थ लवकरच जंजिऱ्यास स्वतः येणार आहेत. यशवंतरावाचे वाईट दिवस संपले म्हणूनच ह्या गृहस्थाला करुणा येऊन ते पुढें झाले आहेत. ते तेथें आल्यावर आपणहि त्यांना योग्य ती मदत करालच ! असो. पत्र फार वाढलें. माझा डोळा आतां बरा आहे. अझून पाणी वाहतें. आपल्या मधुकराचा शोध करून विशेष हकीकत पुढल्या पत्रांत लिहीन. आपल्या मातुश्रीस आणि आकास माझे दंडवत सांगावें. चि. कमळास आशीर्वाद. रा. यशवंतरावास नमस्कार. कळावें, लोभ असावा ही विनंति.

आपला—माधव. "

कृष्णीनें हें लांबलकच पत्र एका दमांत वाचलें. सर्व मंडळी मुकाट्यानें ऐकत होती. कृष्णीची मात्र हें पत्र वाचून अगदीं निराशा झाली. तिनें पत्र बंद करून पुढें केलें. तें घेत असतां प्रभाकर म्हणाला, " ह्या पत्रावरून सकाळीं भाऊसाहेबांना आलेलें पत्र कोणीं लिहिलें आहे तें तुझ्या लक्षांत येईलच ? "

" मग यशवंत कुठें गेला ? " निराशेनें अगदीं काकुळतीस येऊन कृष्णीनें विचारलें.

" तोच आतां मोठा प्रश्न आहे ! मीं त्याचा शोध चालविला आहे. पण आतां उद्यांपासून अगदीं कसून शोधाला सुरवात करतों म्हणून तूं ताईसाहेबांना सांग."

कृष्णी क्षणभर गप्प राहिली आणि म्हणाली, " मी आतां जातें. "

" चल—मी तुला वाडीच्या फाटकापर्यंत पोंचविण्याकरितां येतों—" असें म्हणून प्रभाकरानें आपली टोपी घातली. कृष्णीनें सावित्रीबाई आणि आका यांचा निरोप घेतला. तेव्हां त्यांनीं तिच्या पाठीवर हात फिरवून तिला धीर दिला. नंतर ती प्रभा-

क्राबरोबर जाण्यास निघाली. आंबराईत येतांच तिला एक मोठा हुंदका आला. इतका वेळ मंडळी होती म्हणून तिनें आपलें सर्व दुःख मोठ्या कष्टानें दाबून ठेवलें होतें. परंतु बाहेर पडतांच तिला राहवेना.

" कृष्णा, तूं अशी वेड्यासारखी रडतेस काय ? अशा वेळीं धैर्यच धरलं पाहिजे." प्रभाकर म्हणाला.

" किती-किती धैर्य धरायचं ! माझा भाऊ-माझा यशवंत कुठें आहे ! " असें म्हणून ती जास्त जोरानें हुंदके देऊं लागली. तेव्हां प्रभाकरानें तिच्या खांद्यावर हात ठेऊन तिला जवळ केलें आणि आपल्या धोतरानें तिचे डोळे पुसले. क्षणभर तिच्या म्लान झालेल्या वदनाकडे प्रेमपूर्ण दृष्टीनें पहात तो म्हणाला, "कृष्णा, मला वाटेल तें जरी करावं लागलं तरी मी करीन आणि आपल्या यशवंताचा शोध लावीन. माझ्यावर तुझा विश्वास आहे ना ? "

ती प्रभाकराला अधिक चिकटून हळूंच " होय. " म्हणाली. तिचा सर्व विश्वास त्याच्यावर होता. त्याच्या एका शब्दानें तिला अत्यंत धैर्य आलें. तिची थोड्या वेळा॰ पूर्वीं निराशा झाली होती पण आतां तिला आशा वाटूं लागली. आपल्या यशवंता-विषयीं पसरलेली बातमी खोटी ठरून तो पुण्यांत आहे असें सकाळच्या पत्रावरून त्यांना कळतांच किती तरी समाधान झालें होतें. पण आतां प्रभाकराला आलेलें पत्र वाचून तिची निराशा झाली होती. तथापि त्याच्या एकाच शब्दानें पुनः तिला धैर्यवान बन-विलें. हळुहळू तीं दोघें देशमुखवाडीच्या मागील दरवाजाजवळ आलीं. तेव्हां कृष्णा म्हणाली, " तुम्ही आतां जा. मी जाईन. "

पुनः तिला धीराचे दोन शब्द बोलून ती दरवाजांतून आंत गेल्यावर प्रभाकर मागें फिरला. आतां यशवंताचा शोध लावणें अत्यंत जरूरीचें आहे, असें त्याला वाटूं लागलें. माधवरावाच्या लिहिण्याप्रमाणें त्याचे दुर्दिन संपले म्हणूनच त्या कनवाळु गृहस्थाला त्याचा हक्क शाबीत करण्याची प्रेरणा झाली आहे, तेव्हां आतां आपणास शक्य असेल तितकी त्यांस मदत करणें आपलें कर्तव्य आहे, अशा विचारांत तो हळुहळू परत जात असतां मागून कोणी तरी ' सूं सूं ' करीत आपणास हांका मारीत आहे असें त्याला

वाटलें. त्यानें मागें वळून पाहिलें परंतु काळोखामुळें त्याला कांहींच दिसलें नाहीं. तो तेथेंच उभा राहिला. तेव्हां एक व्यक्ति हळुहळू पुढें आली.

" कोण आहे ? "

" मी वत्सला. पण आतां तुम्ही त्या कृष्णीला घेऊन आलांत ना ? मी मेली इतकी तळमळतें पण माझ्याकडे नाहींना आपलं कांहीं लक्ष ! "

' मी वत्सला ' असें तिनें सांगतांच प्रभाकर मोठ्या विचारांत पडला. तो तिला होतां होईल तितकें आपल्याकडून टाळीत असे. पण आज तिनें त्याला पाळतीवर राहून पकडलें. अलीकडे तिची वृत्ति किती चंचल झाली होती, त्याचें दिग्दर्शन गेल्या एका प्रकरणांत केलेंच आहे. इतके दिवस ती सर्व मंडळीबरोबर दिवाणखान्यांत झोंपत असे परंतु आग लागली त्या दिवसापासून ती माडीवर एकटीच झोंपूं लागली होती. तेथें झोंप येईपर्यंत बाबुरावानें आणलेल्या बाष्कळ कादंबऱ्या तिनें वाचाव्या. अलीकडे ती प्रभाकराची सारखी टेहळणी करीत असे. परंतु त्यानें देशमुखवाडीच्या बाजूला येण्याचें सोडलें असल्यामुळें तो तिला कोठून भेटणार ? शेवटीं तिचें बेफाम झालेलें मन भलतेंच धाडस करण्यास प्रवृत्त झालें. ती रात्रीं सर्व मंडळी निजल्यावर हळुच उठली आणि दरवाजा उघडून बाहेर आली. बरोबर तिनें प्रभाकराला लिहिलेलें एक पत्र घेतलें होतें त्या पत्रांत तिनें आपली सर्व विरहस्थिति लिहिली असून तें पत्र गजराला उठवून तिच्या बरोबर प्रभाकराकडे पाठवावें असा तिचा उद्देश होता. आधल्या दिवशींहि तिनें एक पत्र तिच्याजवळ दिलें होतें परंतु त्याचें काय झालें तें अद्यापि तिला कळलें नव्हतें म्हणून ती प्रथम गजराकडे गेली. तिला हळुहळू पुष्कळ हांका मारिल्या. परंतु कोणीच ओ देईना तेव्हां पुढें काय करावें असा तिला विचार पडला. शेवटीं आपण स्वतःच आंबराईंत जावें असें ठरवून ती निघाली. परंतु वाटेंतच हरिभाऊ भेटून तिची कशी गाळण उडाली ती हकीकत मागें येऊन गेलीच आहे. आज ती खिडकींत उभी असतां असतांना कृष्णाला मागील दारानें जातांना तिनें पाहिलें होतें. ती कुठें गेली होती हें कळावें म्हणून तीहि हळूंच खालीं आली आणि दरवाजाजवळ उभी राहिली. अर्ध्या तासानें कृष्णा आली. त्यावेळीं ती तिला दरवाजांतच बोलणार होती. परंतु तितक्यांत तिनें प्रभाकराचा आवाज ऐकला तेव्हां ती तशीच उभी राहिली. आणि कृष्णा आंत गेल्यावर हळूंच बाहेर पडली.

इतक्या रात्रीं वत्सला आपल्या मागें लपून लपून आलेली पाहून प्रभाकराला फार चमत्कारिक वाटलें. आतां तिची नीट कान उघाडणी केली नाहीं तर पुढें कांहीं तरी भलताच प्रकार होईल असें वाटून तो रागानेंच म्हणाला, " वत्सलाबाई, हें वर्तन तुम्हांला शोभत नाहीं. अशा रात्रीं तुम्ही एकट्याच घरांतून सर्वांच्या नकळत बाहेर–"

" मग तुम्ही त्या दिवशीं आलां का नाहीं ? "

" मी आलों नाहीं !–कुठें ? "

" त्या दिवशीं गजरानें तुम्हांला पत्र दिलं होतं ना ? "

" मला ?–नाहीं. पण वत्सलाबाई–"

" काय तरी मेली ही ! मी समजलें–"

" पण वत्सलाबाई, हें कांहीं चांगलं का ? तुमच्या कुलीनपणाला हें शोभतं का ? थांबा–अशा माझ्या अंगाला बिलगूं नका–"

" मी नाहीं–हें काय ? मी नाहीं आतां सोडणार ? "

आतां मात्र प्रभाकराला अत्यंत चीड आली. त्यानें तिला हिसका देऊन स्वतःला तिच्या बाहुपाशांतून सोडविलें आणि रागानें तो म्हणाला, " वत्सलाबाई मी तुम्हांला दोन प्रसंगीं समोपचारानें सांगितलें. आतां ही गोष्ट मर्यादेच्या पलीकडे गेली. आतां ही गोष्ट उद्यां भाऊसाहेबांच्या कानावर घालून मला नीट बंदोबस्त केला पाहिजे. आतां मुकाट्यानें जा. तुम्ही समजतां तशा प्रकारचा मनुष्य मी नाहीं. तुम्ही एक लाजलज्जा सोडिली पण मला तसं करतां येत नाहीं. अद्यापि कांहीं बिघडलं नाहीं. अद्यापि तुम्ही आपलं वर्तन सुधारा. " इतकें बोलून प्रभाकर तेथून निसटला. वत्सला एखाद्या नागिणीप्रमाणें सुस्कारे टाकीत त्याच्याकडे पहात राहिली.



# प्रकरण ३६ वें.

## शोध लागला.



प्रभाकरानें आंबराई गांठली खरी, परंतु तेथेंहि त्याला पुनः एक व्यत्यय आला. आंबराईच्या दरवाजांत काशी त्याची वाट पहात उभी होती. ती आंबराईत आली त्याचवेळीं प्रभाकर आणि कृष्णा दारांतून बाहेर पडतांना तिच्या दृष्टीस पडले. परंतु ती पुढें न होतां काळोखांतच लपून राहिली कारण ती ज्या कामाला आली होती तें काम फारच गुप्त होतें. आतां प्रभाकर आंत येतांच तिनें हळूंच ' प्रभाकरराव ! ' अशी हांक मारिली.

" कोण आहे ? "

" मी काशी. " ती पुढें होऊन म्हणाली, " मी मघांच इथं आलें पण तुम्ही बाहेर गेलां होतां. कृष्णाबाई तुमच्याबरोबर होत्या म्हणून मी बोललें नाहीं. हें घ्या. अगदीं ह्या कानाचा खडा ह्या कानाला लागूं देऊं नका." तिनें पुढें केलेली कागदाची घडी प्रभाकरानें घेतली. परंतु काळोख असल्यामुळें त्याला ती घरांत गेल्याशिवाय वाचतां येणें शक्य नव्हतें.

" कोणाची आणलीस ही चिठी ? त्या वत्सलेनें दिली होती कीं काय ? "

" नाहीं–नाहीं. तुम्ही वाचा म्हणजे कळेल."

लवकर लवकर तो घरीं आला. अद्यापि सावित्रीबाई आणि आका गोष्टी बोलत बसल्या होत्या. कमळाहि अजून झोंपली नव्हती. नुकतीच कृष्णा येऊन गेल्यामुळें त्यांच्या गोष्टीचा विषय तोच होता. प्रभाकर आंत येतांच त्यानें प्रथम दिव्याजवळ तो कागद धरला आणि वाचला. त्याबरोबर भीति, आनंद, आश्चर्य इत्यादि भावनांनीं युक्त ' काय ! ' हा शब्द त्याच्या मुखावाटे बाहेर पडला आणि त्या झटक्यांतच तो मागें फिरला. त्या पत्रांत काय होतें ?—

" आई, आका, मी आतां जाऊन येतों–"

" अरे पण थांब. ही काय गडबड आहे ऐकूं तरी दे ? सावित्रीबाईचा प्रश्न ऐकून दरवाजा बाहेर टाकलेलें पाऊल प्रभाकराला मागें घ्यावें लागलें. " अरे, एवढी रात्र झाली आतां तूं ह्या काळोखांतून जातोस तरी कुठें ? प्रभाकर मागें परतला आणि हळूच म्हणाला, " आई, हें पहा यशवंतनें पत्र पाठविलें आहे. " असें म्हणून त्यानें तें पत्र वाचलें, ' प्रभाकर, मी अगदीं शरपंजरीं पडलों आहें. मी जगेन अशी आतां आशा नाहीं. मी आतां मरणार पण एकदां मला अगदीं गुपचुप येऊन भेट.

पुनः आई किंवा आका यांना प्रश्न विचारण्यास त्यानें वेळसुद्धां मिळूं दिला नाहीं. तो तडक बाहेर पडला. काशी अद्यापि दरवाजाजवळच उभी होती तिला " चल–चल लवकर ! कुठें आहे यशवंत ? असें विचारीत तो झपझप चालला होता. काशीला ठेंचा खात धांवतच त्याच्या मागून जावें लागलें. थोड्या वेळांत ते दोघे देवडीवर आले तेव्हां काशीनें हळूच दरवाजावर थाप मारिली. रायबा त्यांची वाटच पहात होता. दरवाजा वाजतांच ' कोण आहे ? ' असा त्यानें हळूच आंतून प्रश्न केला. आणि प्रश्नाला उत्तर ' येऊन आपली मुलगीच आली आहे' अशी खात्री होतांच त्यानें दरवाजा उघडला. काशी आणि प्रभाकर आंत जातांच त्यानें पुनः दरवाजाला कडी लावून घेतली.

" कुठें आहे ? " इकडे तिकडे पहात प्रभाकरानें विचारलें.

" वर आहे. पण तो तापानें बडबड करतो. " हळूच जिना चढत असतां रायबानें उत्तर दिलें.

अरेरे ! अफाट जंगम आणि स्थावर जिनगीच्या मालकाची, देशमुखवाडीच्या खऱ्या वारसाची आणि देशमुखीच्या खऱ्या वतनदाराची ही काय शोचनीय अवस्था ? पोटमाळ्याच्या एका कोपऱ्यांत फाटक्या गोधडीवर यशवंत निजलेला पाहून प्रभाकराला एकदम भडभडून आलें. एका कोपऱ्यांत बारीक दिवा मिणमिणत होता. त्याचा अंधुक प्रकाश यशवंताच्या निस्तेज तोंडावर पडला होता. त्याचे डोळे खोल गेले होते. गालांना खाडा पडला होता. उजव्या गालावर मलमपट्टी केलेली दिसत होती. त्याचा एक हात पांघरुणा बाहेर जमिनीवर पडला होता. प्रभाकर त्या तापानें बेशुद्ध पडलेल्या यशवंताकडे

दयार्द्र दृष्टीनें पहात असतां रायबा हळूहळू बोलूं लागला, तो म्हणाला, " प्रभाकरराव, त्या दिवशीं त्या वेड्या गवळ्यानें येऊन मला सांगितलें मात्र ! तों मी म्हातारा मनुष्य तीरासारखा शेतांत धांवत गेलों. आणि एखाद्या भ्रमिष्टासारखा इकडे तिकडे शोधूं लागलों. किती वेळानें तरी मला यशवंतराव निवडुंगाच्या कांट्यांत बेशुद्ध पडलेला आढळला. त्याच्या खांद्याजवळ एक भला मोठा धोंडा पडलेला होता. तोच दगड त्या-त्या-चांडाळानें भाऊसाहेबानें त्याच्यावर हाणला होता. थोडक्यांत चुकलं नाहींतर मोठा अनर्थ झाला असता. तो दगड यशवंतरावाच्या खांद्यावर जरा बाजूला पडला. ती पहा गालाला खोक पडली आहे ! आणि खांदाहि दुखावला आहे. " असें म्हणून त्यानें हळूच यशवंताच्या अंगावरील पांघरूण दूर केलें आणि त्याच्या खांद्याची जखम बांधलेली त्यानें दाखविली.

" मग मी त्याला हळूच उचलून खांद्यावर घेतलें आणि तडक घरीं आलों. " रायबा पुढें सांगूं लागला, " मला झाडपाल्याची माहिती आहे ती त्यावेळीं फार उपयोगी पडली. एक तास औषध-उपचार केल्यावर तो शुद्धीवर आला. मी त्याच्या जखमा मलमपट्टीनें बांधल्या. पण त्याला बोलवत नव्हतें. मज गरिबाजवळ इतक्या रात्रीचं काय मिळणार ? शेवटीं काशीला पाठवून मी गणबाकडून थोडं दूध आणविलं. आतां पुढें काय करावं ही मोठी चिंता माझ्यापुढें उभी राहिली. दुसऱ्या दिवशीं पाहतों तों त्याला पकडण्याची जिकडे तिकडे धामधूम चालली आहे. तेव्हांपासून मी आणि काशी अगदीं डोळ्यांत तेल घालून आहोंत. कोणालाहि आम्ही येथें अगदीं फिरकूं दिलें नाहीं. दुसऱ्या दिवसापासून त्याचा ताप भडकूं लागला. मग मी घाबरलों मला कांहीं सुचेना. शेवटीं मी आजारी आहें असा बहाणा करून काशीला शास्त्रीबुवांकडे पाठविलें आणि औषध आणलें. पण त्याचाहि कांहीं उपयोग होईना. शास्त्रीबुवांना येथें आणावं तर वाड्यांत संशय येईल ही धास्ती ! दुसरं कोणाला सांगावं तर गोष्ट षट्कर्णी होईल ही काळजी. अशा दुहेरी पेचांत मी सांपडलों. त्याला पेजपाणी करायलाहि मला सामर्थ्य नाहीं. प्रभाकरराव, काय करूं हो-हा माझा धनी दूध तुपाशिवाय असा हा जमिनीवर पडलेला पाहून माझ्या रक्ताचं पाणी पाणी होतं हो ? अरेरे ! देवा-नारायणा ! हाच कायरे तुझ्या घरचा न्याय ? " असें म्हणून त्या म्हाताऱ्याच्या डोळ्यांतून घळघळ अश्रू वाहूं लागले. त्याचा कंठ भरून आला. त्याला पुढें बोलवेना !

" पण आतां ही अशी ह्याची स्थिती केव्हांपासून झाली ? "

" आतां संध्याकाळपासून. आज सर्व दिवस त्याच्या शरिराची सारखी तळमळ चालू आहे. शेवटीं त्यानें काशीजवळ कागद मागून घेतला आणि तीं वेडीवांकडीं चार अक्षरें तुम्हाला लिहिलीं. आतां इतके दिवस कसेतरी निभावून गेले पण ह्यापुढें चिन्ह कांहीं ठीक दिसत नाहीं. "

प्रभाकरालाहि तसेंच वाटूं लागलें. आतां यशवंताला उत्तम वैद्याच्या किंवा डॉक्टराच्या मदतीची अत्यावश्यकता आहे हेंहि उघड दिसत होतें. उत्तम जागा, उत्तम पथ्य, उत्तम औषध आणि उत्तम शुश्रूषा असल्याशिवाय यशवंत आपल्या हातीं लागणार नाहीं असें त्याला वाटूं लागलें. परंतु हें सर्व व्हावें कसें ? त्याच्या डोक्यांत प्रश्नावर प्रश्न येऊं लागले. परंतु प्रत्येक प्रश्नाचें उत्तर ' अशक्य ' हेंच येऊं लागलें. शास्त्रीबुवांना येथें आणावें, तर तेंहि जोखमाचें ! त्यांतूनहि ते एकदां येऊन काम भागण्यासारखें नव्हतें. निदान दिवसांतून दोनदां तरी त्यांनीं रोग्याची प्रकृति स्वतः पाहिली पाहिजे. आणि अशारीतीनें शास्त्रीबुवा येथें येऊं लागल्यास वाच्यांत संशय येणार ! तेव्हां आतां काय करावें हें त्याला सुचेना. आपणास कांहीं युक्ति सुचेना म्हणून यशवंताला अशाच स्थितींत मरत पडूं द्यावयाचें कीं काय ? छे ! छे ! ! हा विचार मनांत येतांच प्रभाकराच्या सर्वांगाला कंप सुटला. त्यानें हळूंच खालीं बसून यशवंताचा नाजुक हात आपल्या हातांत घेतला आणि ' यशवंत— यशवंत ! ' अशा हांका मारिल्या परंतु यशवंताकडून त्याला उत्तर मिळालें नाहीं.

" प्रभाकरराव, आतां पुढें काय करावें मी तर अगदीं गोंधळून गेलों आहें. उद्यां जर कांहीं कमीजास्त प्रकार झाला तर–" रायबाला पुढें बोलवेना.

" मलाहि तीच भीती वाटत आहे. पण आतां आलेल्या प्रसंगाला धैर्यानें तोंड दिल्याशिवाय दुसरा उपाय नाहीं. आतां काय पाहिजे तें होवो. मी हा असाच आतां शास्त्रीबुवांकडे जाणार आणि मग त्यांच्या संमत्तीनें कायतें ठरवूं !" असें ह्मणून प्रभाकर उठला आणि खालीं आला. काशी दरवाजांतच पहारा करीत बसली होती. तिला, मीं आतां येतों असें सांगून तो बाहेर पडला. त्यावेळीं मध्यरात्र झाली होती. सर्वत्र काळा-कुट्ट अंधार पडला होता. असंख्य बरेवाईट विचार करीत तो केशवशास्त्र्यांच्या घरीं आला आणि दरवाजा ठोठावूं लागला. इतक्या रात्रीं दरवाजा वाजला ह्मणून शास्त्रिबुवांच्या घरच्या मंडळीस आश्चर्य वाटण्याचें कांहीं कारण नव्हतें. कारण कमी अधिक प्रकार

असला ह्मणजे रोग्यांच्या घरची मंडळी अशा अपरात्रीं देखील दरवाजा ठोठावण्यास येत असत. त्याच प्रमाणें आतांहि कोणी आला असेल असें सजूमन शास्त्रीबुवा स्वतः उठले आणि एका हातांत दिवा घेऊन त्यांनीं दरवाजा उघडला.

" काय प्रभाकर ? इतक्या रात्रीं ? कां रे बुवा ? कांहीं कमजास्त प्रकार आहे कीं काय ! तुझी आई-- "

" माझ्या घरची मंडळी सर्व ठीक आहेत." प्रभाकर शास्त्रीबुवांच्या अगदीं जवळ जाऊन हलकेंच ह्मणाला," पण शास्त्रीबुवा आतां तुमच्याकडे अगदीं निराळयाच कामाकरितां आलों आहें. काम फार धोक्याचें असून गुप्त आहे. हें वाचा--असें ह्मणून त्यानें यशवंतानें त्यांना लिहिलेली चिठी पुढें केली. ती वाचतांच शास्त्रीबुवांच्या मुखांतूनहि आश्चर्याचा उद्गार बाहेर पडला. नंतर प्रभाकरानें त्यांना सर्व हकीकत सांगितल्यावर क्षणभर विचार करून शास्त्रीबुवा घरांत गेले आणि आपल्या बटव्यांत औषधें भरूं लागले. इतक्यांत त्यांना कांहीं आठवण होऊन त्यांनीं आपल्या कुटुंबाला हाक मारिली आणि ताकाला घालून शिल्लक राहिलेलें थोडें दूध आहे काय ? ह्मणून चौकशी केली. दैवयोगानें घरांत दूध होतें. तें घेऊन ते प्रभाकराबरोबर घरांतून बाहेर पडले. रस्त्यानें चालत असतांना प्रभाकरानें आपणास पुण्याहून आलेल्या पत्राची सर्व हकीकत त्यांना सांगितली. शास्त्रीबुवा कांहीं एक न बोलतां ती हकीकत मुकाट्यानें ऐकून घेत होते. त्यांचें सर्व लक्ष यशवंताची अवस्था कशी असेल ह्या विचारांत गढलें होतें. लवकरच ते वाड्याजवळ आले. प्रभाकरानें दरवाजाला धक्का देतांच काशीनें आंतून कडी काढिली.

एक तास दीर्घ प्रयत्न केल्यावर यशवंतानें डोळे उघडले. आणि आजुबाजूला पाहिलें. प्रथम प्रभाकराकडे नंतर शास्त्रीबुवाकडे नंतर रायबाकडे पाहून त्यानें एक दीर्घ श्वास सोडला आणि अत्यंत अस्फुट शब्दांत म्हटलें, " प्रभाकर, मी आतां मरतों ! "

" छे छे ! यशवंत, असा घाबरतोस काय ? मी आतां आलों ना ? मी आतां तुला कधींहि मरूं देणार नाहीं. " असें म्हणून धीर देत देत शास्त्रीबुवांनीं त्याच्या कपाळावरून हात फिरविला. " यशवंत, आतां हें दूध घे. ह्या दुधांत मी एक रामबाण औषध घातलं आहे. तुला आतां चांगली झोंप लागेल. घे पाहूं हें दूध. "

मुकाट्यानें यशवंत तें दूध प्याला. पांच दहा मिनिटांतच औषधाचा त्याच्यावर परिणाम होऊन त्यानें पुनः डोळे मिटले. तें पाहून शास्त्रीबुवा हळूंच म्हणाले, " आतां

कांहीं हरकत नाहीं. पण ह्याला ह्या कोंडवाड्यांत जास्त वेळ ठेवतां उपयोगी नाहीं. ही जागा यशवंताला चांगली नाहीं. आणि त्याला येथून आणखी कांहीं दिवस बिलकूल हालवितां उपयोगी नाहीं. नाहीं तर सर्व श्रम फुकट जावून भलताच परिणाम व्हावयाचा! मग आतां कसं करायचं प्रभाकर? मला आणखी कांहीं दिवस दिवसांतून दोनदां तरी ह्याला येऊन स्वतः पाहिलं पाहिजे!"

"तें आतां आपण ठरवूं. पण यशवंताला पाहून तुम्हाला काय वाटतं तें प्रथम सांगा?"

"आतां सांगायचं काय? धोका आहे हें तर उघडच दिसतं. त्यांतूनहि त्याच्या आयुष्याची दोरी बळकट असली तर माझ्या हाताला खात्रीनें यश येईल. पण रायबा, तुझा ताप कसा आहे?" रायबाकडे पाहून शास्त्रीबुवांनीं विचारलें.

"मला कसला आला आहे ताप? मी तुमच्याकडून औषध मागवीत होतों तें यशवंत-रावाकरितांच!"

"काय यशवंताकरितां! काय वेडा आहेस तूं! अरे, त्याच वेळीं मला खरी हकीकत सांगितली असतीस तर आज यशवंताची अशी स्थिति खास होती ना?

"पण—पण—"

"समजलों! समजलों! तूं गेलास चांगल्या हेतूनें करायला. पण कित्येक वेळीं त्याचा परिणाम हा असा होतो. असो. तुझा त्यांत कांहींच दोष नाहीं. आपण सर्वजण यशवंताचे खरे खरे हितचिंतक आहोंत. बरं प्रभाकर चल आतां घरीं जाऊं!"

"मी आतां येथेंच बसतों—"

"कांहीं जरूरी नाहीं. तो आतां सहा आठ तासांशिवाय जागाच होणार नाहीं, अशी मी औषधयोजना केली आहे. त्याला आतां पूर्ण झोंप मिळाली पाहिजे. मी उद्यां सकाळीं येईन. आणि मग पुढें काय करायचं तें ठरवूं."

कदाचित् यशवंत उठल्यास काय करावयाचें तें रायबाला सांगून शास्त्रीबुवा आणि प्रभाकर बाहेर पडले. त्यावेळीं रात्रीचे दोन वाजून गेले होते. आंबराईपर्यंत येतांच त्यांनीं एक विचार ठरविला आणि त्याप्रमाणें ते दोघेहि आंबराईंत शिरले. सावित्रीबाई आणि आका अद्यापि प्रभाकराची वाट पहात बसल्या होत्या. सावित्रीबाईनें निजावें ह्मणून

आका कैद. वेळां बोलली. आणि त्याप्रमाणें तिनें निजण्याचाहि प्रयत्न केला परंतु तिला झोंप कांहीं येईना. प्रभाकर केव्हां येतो आणि यशवंताची बातमी केव्हां सांगतो असें त्या दोघींस होऊन गेलें होतें. कमळा मात्र केव्हांच निजली होती. परंतु प्रभाकर आणि शास्त्री बुवा येतांच दरवाजा वाजला त्यामुळें ती उठली आणि डोळे चोळीत आपल्या आईजवळ बसली.

शास्त्रीबुवांनींच प्रथम बोलण्यास सुरवात केली. सर्वजण चित्त देऊन ऐकत होतीं. शेवटीं शास्त्रीबुवा म्हणाले. " सावित्रीबाई, आपण ईश्वराला भिऊन वागणारीं माणसें आहोंत. तो न्यायी आहे. सत्याचा वाली आहे, त्याची लीला अगम्य आहे अशी तुम्हां आम्हाला वेळोवेळीं प्रतीति आली आहे, ह्या यशवंताच्या बाबतींत सर्व अन्याय होत आहे, त्यांचा अमानुष रीतीनें छळ होत आहे, ह्या सर्व गोष्टी आपण पहात आहोंत. त्या दोघां बहिणभावंडांविषयीं तुमच्या आमच्या मनांत पूर्ण सहानुभूति आहे आणि आपण त्यांचे सहाय्यकर्ते आहोंत. आज त्या पोरावर इतका भयंकर प्रसंग आला आहे कीं, आपण आज जर ह्यावेळीं पुढें झालों नाहीं, त्याला मदत केली नाहीं तर तो पोर कुत्र्याच्या मोलानें मरणार आहे. मी तर त्याला वांचविण्याचे शक्य ते प्रयत्न करणार. पण त्याला प्रेमाची शुश्रूषा, योग्य पथ्य आणि हवाशीर जागा या गोष्टींची आतां अत्यंत आवश्यकता आहे. प्रभाकराची इच्छा आहे कीं त्याला इकडे आणायचें. पण तुमचा विचार घेतल्या शिवाय— "

" आतां विचार कसला घेत बसला आहांत— " सावित्रीबाई एकदम म्हणाली, " एकदम त्याला इकडे घेऊनच यावयाचें होतें. "

" वाः इतकी आपली तयारी आहे हें पाहून तर मला अधिक बळ आलं. आतां मी खात्रीनें सांगतों कीं यशवंताला या दुखण्यांतूनहीं मी बरा करीन. मग आतां कसं काय ? त्याला केव्हां येथें आणायचं हें ठरवायचं ना ! तुमच्या माडीवरती पलीकडची खोली फार चांगली आहे. पण येथें आहे ही गोष्ट अगदीं गुप्तच राहिली पाहिजे. मी दिवसांतून वाटेल तेव्हां इकडे आलों तरी कोणाला शंका येण्याचें कारण नाहीं. पण कायहो सावित्रीबाई, तुमच्या मल्हारीचें कसें ? त्याची खात्री आहे का तुम्हाला ? "

" पण आणि परंतु नको ! तो आहे कुठें आतां ! बाहेर ओटीवरच निजला आहे ना ! "

" पण तुम्हीं यशवंताला आतां येथें आणणार कीं काय ! "

" नाहीं, मी उद्यां त्याची प्रकृति जाऊन पाहीन आणि मग येथें केव्हां आणायचें तें ठरवूं. आतां तर त्याची प्रकृति इतकी नाजुक झाली आहे कीं,—"

इतक्यांत प्रभाकरानें बाहेर निजलेल्या मल्हारीला उठवून आंत आणलें. इतक्या रात्रीं त्या सर्व मंडळींना एकत्र पाहून तो प्रथम अगदीं घाबरून गेला. त्याच्याकडे पाहून शास्त्रीबुवा म्हणाले, " मल्हारी, तुला एक काम सांगायचें आहे. काम फार जोखमाचें आहे, खासगी आहे, आणि फार गुप्त आहे. ह्या कानाची गोष्ट त्या कानाला कळतां उपयोगी नाहीं. तूं करशील काय ?—कां असा घोंटाळलास का ? अरे कोणाचा खून करायचा नाहीं कीं दरोडा घालायचा नाहीं. आणि कोणाच्या घरालाही आग पण लावावयाची नाहीं. काम इतकंच कीं, एक गोष्ट तुला सांगायची ती तूं अगदीं गुप्त ठेविली पाहिजे. आम्ही सांगूं तोंपर्यंत तुला बाहेर बोलतां उपयोगी नाहीं. बोल—आहे का ह्या गोष्टीला तुझी तयारी ? "

" हो—य. "

" असें डळमळीत नको. घे पाहूं तुझ्या खंडोबा मल्हारीची शपथ ! "

मल्हारीनें शपथ घेतल्यावर सावित्रीबाईनें विचारलें, " मग तुम्ही ही गोष्ट वाड्यांत सगुणाबाईंना किंवा कृष्णीला सुद्धां कळविणार नाहीं काय? संशया संशयानें तर त्या दोघी अगदीं टेकीस आल्या आहेत. "

" होय तोहि एक प्रश्नच आहे. मला वाटतें त्यांना दोघींना सांगावें. त्यांना आपणापेक्षां जास्त काळजी. तेव्हां त्यांच्याकडून ही गोष्ट फुटण्याची भीतीच नाहीं. "

शेवटीं सगुणाबाईला आणि कृष्णीला सांगण्याचें ठरलें. तें ऐकून प्रभाकरालाहि फार समाधान झालें. आपल्या प्रिय बंधूविषयीं कृष्णीच्या मनाला लागलेली तळमळ त्याला माहित होती तिला आपण यशवंताचा शोध लागला आहे व तो वाड्यांतच आहे हें सांगतांच किती आनंद होईल, याचें चित्र त्याच्या डोळ्यापुढें उभें राहतांच आनंद झाला.

---

# प्रकरण ३७ वें.

## ईश्वर झोंपला नाहीं.



विरही जनांच्या स्थितीचें वर्णन पुष्कळ कादंबरीकारांनीं आणि कवींनीं केलेलें आहे. आणि तसेंच वर्णन वत्सलेनें बऱ्याच कादंबऱ्यांतून वाचलें होतें, त्याची सत्यता तिला आज चांगल्याप्रकारें पटत होती. प्रभाकरानें तिला झिडकारून टाकल्यावर ती एखाद्या नागिणीसारखी सुस्कारे सोडीत थोडा वेळ त्या काळोखात उभी राहिली.तिचें डोकें भडकून गेलें. प्रभाकराला आपण सर्वस्व अर्पण करण्यास तयार असतांना त्यानें आपणास झिडकारलें हें पाहून तिच्या मनांत त्याचा सूड घेण्याचा विचार आला. आणि त्या विचारांत दांतओठ खात ती मागें परतली. ती अशा अपरात्रीं घरांतून बाहेर 'जा ये' करते अशी कोणाला शंका आली नाहीं. ती अशी बेफाम होण्याचें कारण तिच्यावर घरांतील मंडळीची नजर नव्हती हेंच होय.

ती आपल्या बिछान्यावर पडली होती. परंतु तिला झोंप लागेना. तिच्या भडकलेल्या मनाची आणि त्याबरोबरच शरीराचीहि सारखी तळमळ चालली होती. नानाप्रकारचे विचार तिच्या डोक्यांत येत होते. पहांटेचा सुमार झाला तरी देखील तिला झोंप लागली नाहीं, तिच्या मनाला स्वस्थता आली नाहीं किंवा तिच्या शरिराची तळमळ बंद झाली नाहीं. शेवटीं ती उठली आणि खिडकींत उभी राहिली. ह्यावेळीं तिच्या मनांत इतके वाईट विचार येत होते .कीं, ते सर्व येथें देणें म्हणजे मर्यादेला सोडून होईल. करितां त्यांचा येथें ऊहापोह न करतां आपण कथानकाकडे वळूं. वत्सला खिडकींत उभी राहिली त्यावेळीं कृष्णा मागच्या दरवाजा उघडून बाहेर जातांना तिच्या दृष्टीस पडली. तिचें सकाळीं उठतांच पहिलें काम म्हणजे भाऊसाहेबांच्या पूजेकरितां ताटव्यांतील फुलें वेंचून आणणें ! त्याप्रमाणें ती ताटव्यांत जाऊन फुलें वेंचीत असतां मागून 'कृष्णा' अशी ओळखीच्या आवाजांत हांक

मारलेली तिला ऐकूं आली. तिनें चटकन् मागें वळून पाहिलें. तेव्हां फाटकाजवळ प्रभाकर उभा असलेला तिच्या दृष्टीस पडला. त्याला पाहतांच तिच्या मुखावर आनंदाची छटा दृग्गोचर झाली. तथापि चिंतेनें आलेली निस्तेजता स्पष्ट दिसत होती. तिनें एकदां चोरासारखें इकडे तिकडे पाहून अद्यापि कोणी उठलें नाहीं अशी मनाची खात्री केली.

"कृष्णा, तूं जर असं करूं लागलीस तर कसं होणार ?" ती जवळ येतांच प्रभाकर ह्मणाला, "हें पहा, तुझे डोळेच सांगतात. तूं रात्रभर रडत होतीस कीं काय ? अशानें तूं स्वतःला अपाय मात्र करून घेणार !"

"ह्या यातना–हा संशय–" कृष्णीच्या नेत्रांतून खळकन् अश्रु आले, "असं वाटतं; आतांच्या आतां जावं आणि सर्व जगभर यशवंताचा शोध करावा."

"काय म्हणतेस ?–इतकी तुझी तयारी आहे ?–तुला जर यशवंताच्या शोधाकरितां जगभर हिंडायला पाठवायचं मग आमचा काय उपयोग ? बरं पण तें आतां जाऊं दे, कृष्णा, मी तुला यशवंताविषयीं कांहीं बातमी सांगितली तर तूं मला काय देशील ?"

"यशवंताची बातमी ! सांगा, सांगा ! त्याला पकडलं काय ? सांगा ?"

"नाहीं. त्याला पकडलं नाहीं पण आतां त्याला डोळ्यांत तेल घालून जपलं पाहिजे."

"मी जपेन पण सांगा ? तो कुठें आहे ? सांगा–पण तो बरा आहे ना ? सांगा–"

"तो फार फार आजारी आहे. त्याची अतिशय काळजी घेतली पाहिजे तर–"

"मला न्या तिकडे ! मला एकदां त्याला पाहूं द्या. न्या–मी तुमच्या पायां पडतें. मला दाखवा–"

"पण मी तुला आतां तेथें नेऊं कसं ? आतां सगळी मंडळी उठली असतील."

"नाहीं नाहीं. अद्यापि कोणीसुद्धां उठलं नाहीं. चला–कुठं आहे तो ? मी त्याला एकदां डोळे भरून पाहीन आणि तशीच चटकन् परत येईन. चला–चला–"

चोर चोरी करण्याकरितां जितक्या सावधपणानें जात असेल त्यापेक्षांहि अधिक काळजी घेऊन लपत लपत प्रभाकर आणि त्याच्या मागून कृष्णी देवडीवर आलीं. अद्यापि काशीनें दरवाजा उघडला नव्हता परंतु प्रभाकरानें हांक मारतांच दरवाजा उघडला. अगदीं हळू आणि भीत भीत कृष्णी आंत येत असतां काशीला प्रभाकरानें 'काय खबर आहे ?'

असा खुणेनें प्रश्न केला आणि तिनेंहि ' यशवंत अद्यापि गाढ झोंपला आहे. ' असें खुणेनेंच उत्तर दिलें. दोघेंहि वर गेलीं. यशवंत रात्रीं ज्या स्थितींत होता, त्याच स्थितींत आतां होता. परंतु शांत झोंपेमुळें त्याचा श्वासोच्छ्वास न अडखळतां सरळ पण हळू होत होता. तें पाहून प्रभाकर मागें वळून हळूच म्हणाला, " कृष्णा, ये आंत ये. तो झोंपला आहे. "

कृष्णी आंत गेली आणि यशवंताच्या घोंगडीजवळ त्याच्याकडे अश्रुयुक्त दृष्टीनें पहात क्षणभर स्तब्ध उभी राहिली. आपला भाऊ दृष्टीस पडतांच तिला प्रथम आनंद झाला. पण त्याची ती शोचनीय अवस्था पाहून तात्काळ तिला दुःखहि झालें, ती चटकन् खालीं बसली आणि ती आतां त्याच्या गळ्याला मिठी मारणार तोंच प्रभाकरानें तिला धरलें आणि हळूच म्हटलें " कृष्णा हें काय करतेस तूं ! त्याला उठवायचं नाहीं. शास्त्रीबुवांनीं त्याला मुद्दाम झोंपेचें औषध दिलें आहे. "

" मग आतां हा केव्हां उठेल ! "

"तें कांहीं सांगतां येत नाहीं. तरी अद्यापि एक दीड तास तरी लागेल. आणि हें पहा कृष्णा आतां शास्त्रीबुवा येतील. त्यांनीं जर मत दिलें तर मी आज रात्रीच यशवंताला आमच्या घरीं नेईन. कारण त्याची येथें फार आबाळ होते. गरीब बिचाऱ्या रायबाकडून त्याचें काय पथ्यपाणी होणार ! तरी देखील त्यानें इतके दिवस त्याला जिवापलिकडे सांभाळलें हेच त्याचे कितीतरी उपकार आहेत. शिवाय येथें 'कोणी पाहील काय ! कोणी येईल काय?' ही भीति ! आमच्या घरीं मात्र अशी भीति बाळगण्याचें कांहीं कारण नाहीं.

यशवंताबरोबर दोन शब्द बोलावे अशी कृष्णाची फार इच्छा होती. तो उठेपर्यंत थांबावें असा ती विचार करते न करते तोंच घरीं मंडळी उठली असतील ही भीति तिच्या मनांत उभी राहिली. आतां तिला तेथून गेल्याशिवाय गत्यंतरच नव्हतें. शेवटीं नाइलाजास्तव तिला उठावें लागलें तेव्हां प्रभाकर ह्मणाला " जा आतां तूं. नाहीं तर वाड्यांत मंडळी उठली असल्यास सर्वत्र गोंधळ होईल.

" पण ही गोष्ट मीं आत्याला सांगूं ना ? तिला फार बरं वाटेल ! "

प्रभाकरानें क्षणभर विचार करून ' होय ' म्हणून उत्तर देतांच तिला आत्यानंद झाला. आणि त्या आनंदांतच एक वेळ यशवंताला पाहून ती खालीं उतरली आणि चोरासारखी

लपत लपत घरीं आली. परंतु अद्यापि कोणीच उठलें नव्हतें. तें पाहून मात्र तिला वाईट वाटलें. आपण आणखी थोडा वेळ तेथें थांबून यशवंत जागा होण्याची वाट पाहिली असती तर बरें झालें असतें, असें तिला वाटलें परंतु लवकरच ' आपण तेथें फार वेळ थांबलों नाहीं, तें चांगलें केलें ' हें तिच्या प्रत्ययास आलें. कारण तितक्यांतच तिला दुर्गाताईनें आंतून हांक मारिली. तेव्हां लवकर लवकर फुलें वेंचून तीं परडींत भरलीं आणि ती आंत आली. परंतु दुर्गाताईनें तिला हांक मारिल्याप्रमाणें कांहीं विचारलें किंवा सांगितलें नाहीं. कृष्णाचें नांव तिच्या तोंडीं बसलें होतें. उठल्या सुटल्या ती कृष्णाला हांक मारित असे, त्याचप्रमाणें आतां देखील तिनें ही हांक मारिली होती. असो कृष्णाला त्या दिवशीं काम करण्यास एक प्रकारचा उत्साह वाटत होता. सगुणाबाई तोंड धूत असतांना तिनें यशवंताची सर्व खबर तिला सांगितली. वाचकहो ! ती हकीकत ऐकत असतां त्या चिंताग्नीनें होरपळून गेलेल्या साध्वीला किती आनंद झाला असेल बरें ! ती आनंदाच्या भरांत म्हणाली, " कृष्णा, चल, मी येतें—मला एकदां त्याला डोळे भरून पाहूं दे " परंतु उघड रीतीनें देवडीवर जाऊन यशवंताला पाहणें किती जोखमाचें आहे, ही कल्पना सगुणाबाईच्या मनांत येतांच तिचा निस्तेज चेहरा आंबट झाला ! थोड्यावेळांत ती म्हणाली, " कृष्णा आतां एक काम कर. तूं आतां ताईजवळून माझा शिरा आणि दूध आणशील तें जवळपास कोणी नाहीं असं पाहून गुपचिप यशवंताला नेऊन दे. "

कृष्णा होय म्हणाली. परंतु सर्वांची दृष्टि चुकवून तें आपणास कसें नेतां येईल याची तिला काळजी पडली. तिनें सगुणाबाईच्या सांगण्याप्रमाणें शिरा आणि दूध स्वयंपाक घरांतून आणून तर ठेवलें. परंतु पुढली क्रिया फार जोखमाची होती. तरी देखील इकडे तिकडे पाहून जवळपास कोणी नाहीं असें पाहून ते दोन्हीं जिन्नस तिनें आपल्या पदराखालीं लपवून घेतले आणि ती हळूंच दरवाजांतून बाहेर पडली. तिच्या मनांत भीति होतीच परंतु आतां आपणास यशवंताबरोबर दोन शब्द बोलण्यास मिळतील याबद्दल आनंदहि होत होता. ह्या आनंदांत ती जवळ जवळ मोठ्या दरवाजा जवळ गेली तोंच तिच्या कानावर भाऊसाहेबांची आरोळी येऊन आदळली !

" कृष्णे, उभी रहा ! "

जोरानें वारा सुटला असतां वेल जशी कांपते, त्याप्रमाणें कृष्णा थरथर कांपत तेथेंच उभी राहिली. ती दरवाजांतून बाहेर पडली त्यावेळीं भाऊसाहेब माडीवरील खिडकींत उभे राहून दांत घांशीत होते. कृष्णा पदराखालीं कांहीं तरी लपवून घेऊन जात आहे असें त्यांना वाटलें. ती इतक्या सकाळींच कुठें जात असेल याची त्यांना कल्पना होईना म्हणून त्यांनीं संशयनिवृत्ति करून घेण्याकरितां तिला हांक मारून उभें राहण्यास सांगितलें. ती उभी राहतांच ते खालीं उतरून तिच्याजवळ गेले आणि म्हणाले, " कृष्णे, कुठें चाललीस अशी चोरासारखी ?—काय आहे तें तुझ्या पदराखालीं ? पाहूं—काढ बाहेर ?—काय ? हा शिरा आणि दूध ! बोल—हें कुठें घेऊन चालली होतीस ? "

" रायबाकडे! " अडखळत कृष्णानें उत्तर दिलें.

" रायबाकडे ?—त्या थेरड्याकडे ! हा गरम गरम शिरा आणि दूध त्या थेरड्याला घेऊन जात होतीस ?—कोणी दिला हा तुला ? त्या दुर्गीनें दिला ?—"

" नाहीं. "

" मग कोणी ?—तुझ्या आतेनें ?—अस्सं ! मला वाटलंच तें ! मोठी धार्मिकच कीं नाहीं असा तुपाचा शिरा त्या दीड दमडीच्या थेरड्याला ! शरम नाहीं वाटत. अशानें सर्व घर धुवून टाकाल. चल नीघ—चल हो चालती घरांत ! चालली त्या थेरड्याला शिरा चायला! आणि त्या दुर्गीला सांग, उद्यांपासून शिरा करायचा नाहीं म्हणून ! जा—आणि पुनः जर तुला असें करतांना पाहिलं तर तंगडं मोडून टाकीन. लक्ष्यांत ठेव ! " इतकें बोलून भाऊसाहेब मागें वळणार तोंच समोरून येत असलेले शास्त्रीबुवा त्यांना दिसले, " का शास्त्रीबुवा, आज इतक्या सकाळींच कुठें ? कां हो, तुम्ही आमच्या कुटुंबाला पौष्टिक म्हणून शिरा खायला सांगितला कीं तो दुसऱ्याला धर्म करायला सांगितला ? ही पहा कार्टी, तो शिरा त्या थेरड्या रायबाला नेऊन देत आहे—"

हें भाऊसाहेबांचें भाषण ऐकून शास्त्रीबुवाहि प्रथम गोंधळले. परंतु लवकरच त्यांनीं सर्व बाजू सांवरून घेतली. ते म्हणाले, " तो आजारी आहे खरा ! काल त्याची मुलगी आली होती मजकडे औषधाला तेव्हां मी तिला सांगितलें कीं, उद्यां मी ताईसाहेबांची प्रकृती पाहण्याकरितां वाड्यांत येईन तेव्हां तुझ्या बापालाहि पाहीन. पण तुम्ही काय ? शिऱ्यासंबंधीं काय म्हणालांत भाऊसाहेब ? शिरा ताईसाहेबांनीं रायबाला दिला म्हणतां ? अहो,

त्यांचा स्वभावच आहे तसा दयाळु! आणि हें पहा भाऊसाहेब तुमच्या सारख्यांनीं आपल्या गरीब आश्रितांचा जर परामर्ष घेतला नाहीं तर मग कोण घेणार ?

" होय तें खरंच! असं रोज आश्रितांना शिरा न् पुरी देऊं लागलों कीं उद्यां नारळाची आई हातांत घ्यावी लागेल!"

शास्त्रीबुवांच्या मनांत भाऊसाहेबांना खरमरीत उत्तर द्यावें असें होतें. परंतु दूरवर दृष्टि देऊन ते गप्प राहिले. हळुहळू ते दोघेहि वाड्यांत आले. रायबाला शिरा पाठविल्याबद्दल सगुणाबाईची खरडपट्टी काढावी असें भाऊसाहेबांच्या मनांत होतें परंतु शास्त्रीबुवा जवळ असल्यामुळें ते त्यावेळीं कांहीं बोललें नाहींत तथापि दृष्टीनें आपण रागावलों आहोंत असें तिला सुचवून ते घरांत निघून गेले. तेव्हां शास्त्रीबुवांनीं विचारलें, " का– आतां कशी काय प्रकृति आहे ?"

" माझी प्रकृति बरी आहे हो! पण शास्त्रीबुवा, मी तुम्हाला कांहीं विचारूं का ?" सगुणाबाई अगदीं हळू म्हणाली " माझा यशवंत कसा आहे तुम्हीं काल त्याला पाहिलं ना! कांहीं भीति आहे का त्याच्या जिवाला ?"

" भीति आहे आणि नाहीं असें दोन्हीहि आहे. कारण असं पहा तो सध्या ज्या परिस्थितींत आहे ती सर्व परिस्थिति त्याला सर्वतोपरी प्रतिकूळ आहे. एक तर हा चोरीचा मामला 'कोणाला कळेल का' हा भीतीचा राक्षस आ पसरून उभा आहे. नाहीं त्या खोलींत उजेड, नाहीं त्या पोराला अंथरायला कीं पांघरायला! तसंच वेळेवर औषध नाहीं कीं पथ्यपाणी नाहीं. अशा स्थितींत रोगी जर–जर–"

" जर काय ?–बोला ?" अत्यंत उत्कंठेनें सगुणाबाईनें विचारलें.

" जर काय सांगूं ? अशा स्थितींत भलताच परिणाम व्हावयाचा हें ठरलंच आहे!"

" नाहीं–नाहीं. शास्त्रीबुवा, असं नका म्हणूं! तुम्ही त्याला वांचवा. मला एवढी भिक्षा घाला."

सगुणाबाईनें अत्यंत कळकळीनें आणि हताश होऊन उच्चारलेले शब्द ऐकून शास्त्रीबुवांनाहि वाईट वाटलें. ते म्हणाले, " मी शक्य तितके प्रयत्न करतोंच आहें. आणि पुढें ही करीन. पण ईश्वरानें मात्र त्याची आयुष्याची दोरी सबळ ठेवावी. मी आतां तिकडेच त्याला

पाहण्याकरितांच जात होतों. पण वाड्यांत भाऊसाहेबांना पाहतांच त्यांना संशय येऊं नये म्हणून येथें वळलों. आतां मी तिकडेच जाईन आणि तो कालच्यापेक्षां जरा बरा असला तर त्याला प्रभाकराच्या घरीं आंबराईंत नेण्याचा आम्ही विचार केला आहे. काल रात्रीं मी मुद्दाम तेथें जाऊन सावित्रीबाईंना भेटलों. ती मोठ्या आनंदानें माझ्या विचाराला कबूल झाली. "

" ईश्वर तिचें कल्याण करो ! " अंतःकरणापासून सगुणाबाई म्हणाली. इतक्यांत कृष्णा आंत आली तिचें तोंड अगदीं उतरलेलें होतें. तें पाहून सगुणाबाईनें विचारलें. " का बाळ, काय झालं ? दिलंस का नेऊन ? "

कृष्णाच्या डोळ्यांतून पाणी आलें. तिनें घडलेला सर्व प्रकार सांगितला. तेव्हां शास्त्रीबुवा म्हणाले, " द्या तो शिरा आणि दूध माझ्याजवळ. मी आतां तिकडेच जातों. "

शास्त्रीबुवांनीं त्या दोन्ही वस्तु घेऊन आपल्या उपरण्याखालीं झांकल्या आणि ते निघून गेले. सगुणाबाईला आणि कृष्णीला बरेंच समाधान झालें. अशा रीतीनें तो सकाळचा प्रहर निघून गेला. भाऊसाहेब आणि बाबुराव नेहमींप्रमाणें जेवून खाणीवर निघून गेले. परंतु त्यांची गाडी जातांना वत्सलेनें संधी साधून रामजीजवळ चिटी दिली आणि कोणालाही ती न कळतां हरिभाऊला देण्यास सांगितलें. दुपारच्या प्रहरीं सर्व काम आटोपल्यावर दुर्गाताईचा झोंपण्याचा परिपाठ असे. त्याप्रमाणें आजहि ती झोंपली. वत्सला माडीवर पुस्तक वाचित बसली होती. परंतु तिचें चित्त आज बरेंच चलबिचल झालेलें दिसत होतें. इंदू दिवाणखान्यांत खेळत होती. त्यामुळें सगुणाबाईनें योजलेल्या बेताला फार अडथळा येऊं लागला. शेवटीं तिनें इंदूला हांक मारून म्हटलें, " इंदू, माझं ऐकायचं नाहीं का तुला ? जा पाहूं तूं आणि कृष्णा वर. आणि तिकडे खेळत बसा. मला आतां थोडा वेळ स्वस्थ पडूं द्या. "

सुदैवानें इंदूबाळ उठली. नाहींतर ती हट्टी पोर जाग्यावरून हालायची सुद्धां नाहीं. ती उठतांच सगुणाबाईनें कृष्णीला डोळ्यानें खूण केली. तेव्हां ती इंदूचा हात धरून म्हणाली, " चल इंदू, आपण माडीवर जाऊं. मी तुला चूल मांडून देतें. मग तूं जेवण कर हं ! "

इंदूला घेऊन कृष्णा माडीवर गेल्यानंतर सगुणाबाई हळूच बाहेर पडली. वाड्यांत आग लागली त्या दिवशीं ती एकदां घराची पायरी उतरली होती. त्यानंतर घराच्या खालीं उतरण्याचा हा तिचा पहिलाच प्रसंग होता, ती आपल्या मानसिक आणि शारिक व्यथेनें अगदीं जर्जर झाली होती. चार पावलें चाललें कीं तिला घेरी येत असे अशी तिची स्थिति होती. पण आज तिला यशवंताची बातमी ऐकल्यापासून एक प्रकारचा उत्साह वाटत होता. ' तुम्ही काळजी करण्याचें सोडून द्या, म्हणजे आतां बऱ्या व्हाल' असें शास्त्रीबुवा तिला नेहमीं म्हणत असत. आणि तें तिला समजत नव्हतें असें नाहीं. पण तिच्या मागें लागलेलें काळजीचें पिशाच्च ' सोडतों ' म्हणून सुटण्यासारखें थोडेंच होतें. ! असो. ती हळूच देवडीवर आली. तिला पाहतांच काशीनें चटकन् दरवाजा उघडला. रायबा वर यशवंतजवळ बसला होता. सगुणाबाई वर गेली. एकदम उजेडांतून काळोखांत आल्यामुळें तिला आंतील देखावा एकदम दिसला नाहीं. क्षणभरानें त्या कोंदट हवेंत काळोखाच्या कोपऱ्यांत गोधडीवर पडलेला यशवंत तिच्या दृष्टीस पडला. ती वर येतांच ' या ताई साहेब. ' ' कोण आत्या ? ' ' यशवंत बाळा—माझ्या लाडक्या ! ' असें रायबा, यशवंत आणि ती स्वतः यांचे उद्गार एकाचवेळीं बाहेर पडले !

" लाडक्या, कायरे ही तुझी अवस्था ! " त्याच्या गळ्याला मिठी घालून कातर स्वरांत हुंदके देत सगुणाबाई ह्मणाली.

" आत्या, तूं आलीस ! अहाहा ! मला किती आनंद झाला ह्मणून सांगूं ! आत्या मी नाहींग ते रुपये चोरले ! मी अशी चोरी करीन असं तुला वाटतं ? पण मी चुडी फेंकली मग मी काय करूं आत्या ? मला—मला भाऊसाहेबांनीं मारलं हें पहा दगडा दगडांनीं मारलं ! पण आत्या मी आतां मरीन कांग ! मला वाटतं मी आतां मरणार !"

" नाहींरे नाहीं. माझ्या बाळा, तुला ईश्वरानें उदंड आयुष्य द्यावें. "

" नको—मी आतां मरीन तर बरं होईल. मला आतां आत्या हें नाहीं सहन होत. ही भीतीच माझा शेवट करील. पण आत्या, ह्या रायबाचे, त्याच्या काशीचे माझ्यावर किती किती उपकार झाले आहेत ह्मणून सांगूं ! त्यानें जर मला शेतांतून उचलून आणलं नसतं तर मी तिकडेच मरून गेलों असतों. आत्या, मी मेल्यावर तूं ह्या दोघांना विसरूं नको हं ?—नाहीं ना विसरणार आत्या ? सांग !"

" यशवंतराव, तुह्मी ही काय बडबड लाविली आहे !"

" रायबा, अरे मला बोलूं दे. आज माझी आत्या किती दिवसांनीं तरी भेटली आहे?"

सगुणाबाईला कांहींच बोलतां येईना. तो एकंदर देखावा आणि यशवंताची स्थिति पाहून तिचें अंतःकरण भरून आलें होतें. ती त्याच्या कपाळावर हात फिरवून बोलण्याचा प्रयत्न करीत होती. पण शब्दच बाहेर पडेना बऱ्याच वेळानें ती ह्मणाली. " रायबा, तुझे हे उपकार मी कधींहि विसरणार नाहीं. आजचा वेळ नाहीं पण मी तुझे उपकार—"

" हें काय भलतंच बोलतां ताईसाहेब ? मी आतां खातों हें कोणाचं ? एकदां आमचे हे धाकटे धनी बरे होऊन सर्व कांहीं यथास्थित व्हावं हीच माझी इच्छा आहे. "

" होईल, तसंहि होईल. ईश्वर कांहीं झोंपलेला नाहीं. "



# प्रकरण ३८ वें.

## वत्सलेचें उच्छृंखल मन.



ध्याकाळीं पुनः एकदां यशवंताची प्रकृति पाहिल्यावर त्याला आंबराईंत नेण्याची शास्त्रीबुवांनीं संमति दिली. तेव्हां प्रभाकर त्या उद्योगाला लागला. रात्रीं दहा वाजल्यावर सर्वत्र शांतता झाल्यानंतर मेण्यांतून त्याला घरीं आणावें असा त्यानें विचार ठरविला; परंतु तसें करणें धोक्याचें आहे असें त्याला नंतर वाटूं लागलें. मेण्याबरोबर भोई येतील, तेव्हां कदाचित् त्यांच्याकडून आपली गुप्त गोष्ट बाहेर फुटेल अशी त्याला भीति वाटली. शेवटीं त्यानें यशवंताला खुर्चीवर बसवून स्वतः आणि मल्हारी असे दोघे लागून ती खुर्ची उचलून आणावयाची असें त्यानें ठरविलें. संध्याकाळीं त्यानें आपल्या माडीवर पूर्वी ठरविलेली खोली स्वच्छ करून तेथें मल्हारी जवळून गादी घालून ठेविली परंतु तेथें आंथरूण घालतांना ' येथें गादी कुणाकरितां ? ' असा मल्हारीनें प्रश्न केला. तेव्हां प्रभाकर म्हणाला, ' काल रात्रीं तुझ्याकडून शास्त्रीबुवांनीं शपथ घेतली, ती ह्याच करितां ! आतां येथें जें तूं पाहशील, करशील, व ऐकशील त्यापैकीं एकहि गोष्ट बाहेर फुटतां कामा नये.''

रात्रीं जेवण वगैरे आटोपून शास्त्रीबुवा आले. आणि माडीवर कशी काय व्यवस्था केली आहे ती त्यांनीं पाहिली. त्यावेळीं कोपऱ्यांत बसून कमला समई साफ करीत होती. तें पाहून शास्त्रीबुवांनीं विचारलें. ''कमला, आतां रात्रीं तूं हें काय करतेस ?''

'' आईनें सांगितलं म्हणून ही समई साफ करून ठेवतें. आजारी माणसाला घासलेटच्या दिव्यापासून त्रास होतो म्हणून ही समई येथें लावायचीं.''

'' चांगलं ! चांगलं ! पण आतां हें पहा कमला, तुला आतां पुष्कळ काम करावं लागेल. यशवंत येथें आला म्हणजे त्याची शुश्रूषा तुलाच करावी लागेल. दुपारच्या

प्रहरां त्याच्याजवळ बसून त्याची तुला करमणूक केली पाहिजे. त्याचें औषधपाणी सर्व कांहीं तुलाच पाहावं लागेल. तुझ्या आईला आणि आकाला दिवसांतून पन्नासदां वरखालीं जाणें नाहीं होणार.''

" मग त्यांत काय आहे ? मी मोठ्या आनंदानें करीन. मला दादानें आणि आईनेंहि तसंच सांगितलं आहे. "

'आंखलेल्या कार्याची वेळ लवकर भरत असते' असें म्हणतात, त्याप्रमाणें दहांचा सुमार होतांच शास्त्रीबुवा, प्रभाकर आणि मल्हारी हें तिघे बरोबर खुर्ची घेऊन निघाले. यशवंत त्यांची वाट पहात होता. आज त्याला पुष्कळ बरें वाटत होतें. एखाद्या मुलाला यात्रेला न्यावयाचें ह्मणून कबूल केलें असतां तो जसा ठरलेल्या वेळेची उत्सुकतेनें वाट पहात बसतो, तशीच स्थिति यशवंताची झाली होती. शेवटीं ती मंडळी देवडीवर आल्यानंतर यशवंताला पाहतांच आपणाकडून शास्त्रीबुवांनीं शपथ कां घेतली त्याचें कारण मल्हारीच्या चटकन् लक्षांत आलें. त्यानें मोठ्या व्यवस्थेनें प्रभाकराच्या साहाय्यानें यशवंताला उचलून आंबराईंत आणलें. त्या थोड्याशा हालचालीमुळें यशवंताला बराच क्षीण आला, इतकी त्याची प्रकृति नाजुक झाली होती. अशा रीतीनें ती सर्व मंडळी यशवंताच्या तैनातींत गुंतली असतां हरिभाऊ आंबराईंत आला. मल्हारीनें तो आल्याबद्दल वरवर्दी पोंचवितांच प्रभाकर आणि शास्त्रीबुवा थोडे गोंधळले. आपण यशवंताला येथें आणलें ही बातमी त्याला कळली असून तो चौकशी करितां येथें आला आहे कीं काय अशी त्यांना शंका आली. परंतु शंका कुशंका काढीत बसण्यापेक्षां त्याला समक्ष जाऊन विचारावें ह्मणून प्रभाकर खालीं आला. त्याला पाहतांच हरिभाऊ म्हणाला, "प्रभाकरराव, आज मी पुनः इतक्या रात्रींचा येऊन तुम्हाला त्रास देत आहें म्हणून तुम्ही रागावूं नका. मी एक गरीब मनुष्य आहें. स्वकष्टानें मिळेल त्या मीठभाकरींत संतोष मानून रहावें, कोणाच्या भानगडींत पडूं नये आणि सरळ मार्ग सोडूं नये अशी माझी फार इच्छा पण मध्येंच ह्या अशा चमत्कारिक गोष्टी घडूं लागल्या तर मग आमचा गरिबांचा कसा निभाव लागावा ? "

" हरिभाऊ, तुम्ही हें काय बोलतां यांतील एका अक्षराचाहि मला बोध झाला नाहीं. तुह्मी गरीब अहांत, सरळ मार्गानें वागणारे आहांत, मिळेल त्या मीठ भाकरींत संतुष्ट राहणारे आहांत वगैरे वगैरे सर्व खरं पण चमत्कारिक गोष्टी काय घडल्या त्या तर कळूं द्या ?"

" हें घ्या-हें वाचा मग मी सांगतों. प्रभाकरराव, यांत माझा कांहीं दोष नाहीं. मी एक गरीब मनुष्य आहें. अशा भलत्याच भानगडींत पडण्याची माझी कधींहि इच्छा नाहीं. "

हरिभाऊ पत्र पुढें करून बोलतच होता. परंतु प्रभाकरानें त्याकडे लक्ष न देतां तें पत्र उघडलें आणि वाचण्यास सुरवात केली. पत्रांतील मजकूर येणेंप्रमाणें होता-

" परवां रात्रीं जो प्रकार घडला त्याविषयीं तुमच्या मनांत काय विचार आले असतील ते असोत. पण आज रात्रीं नऊ वाजतां मी आपली तेथेंच-त्या जागीं वाट पहातें. अवश्य यावें. फार फार अगत्याचें काम आहे. जरूर यावें. माझी शपथ आहे. **वत्सला.**"

" ही काय गडबड आहे ? वत्सलेनें हें तुम्हालाच पत्र लिहिलें काय ? आणि परवां काय प्रकार घडला ? " प्रभाकरानें आश्चर्यानें विचारलें.

" ही गडबड फार मोठी आहे. परवां म्हणजे त्या गोष्टीला आज आठ दहा दिवस झाले. प्रभाकरराव, मी आतां तुमच्याकडे आलों आहे तेव्हां आतां तुमच्यापासून कोणत्याच गोष्टी चोरून ठेवीत नाहीं. जशा त्या घडल्या तशा मी आपणास सांगतों. पण यांत माझा कांहीं एक दोष नाहीं. मी एक गरीब मनुष्य आहें.-"

" तें समजलों हो ! पण काय गडबड आहे तें मला ऐकूं द्या. उगाच पाल्हाळ नका लावूं. रात्र फार झाली आहे. "

" हें पहा, त्या दिवशीं मी तुमच्याकडे आलों होतों, तें तुम्हाला आठवत असेलच ! मी तुम्हाला बाबुरावांचें पत्र दिलें आणि येथून निघालों. बाहेर फार काळोख पडला होता. मी तसाच चाललों होतों. वाड्याजवळ गेलों तेव्हां समोरून कोणीतरी येत असावें असें मला वाटलं म्हणून मी तेथेंच उभा राहिलों. इतक्यांत तुम्हाला हळूंच हांका मारीत वत्सलाबाई तेथें आल्या-"

" मला हांका मारीत ? ! " आश्चर्यानें प्रभाकरानें विचारलें. तोंच आघल्या दिवशीं रात्रीं घडलेल्या प्रकाराची त्याला आठवण झाली. काल जसें वत्सलेनें आपणास रात्रीं रस्त्यांत येऊन गांठलें, तसाच हा प्रकार असावा असें त्याला वाटलें.

" होय. तुम्हांलाच हाक मारीत त्या मजजवळ आल्या. मी प्रथम गोंधळून गेलों. काय उत्तर द्यावें हेंच मला सुचलें नाहीं तेव्हां ' का-बोलायचं नाहीं वाटतं ! ' असं

म्हणत त्यांनीं माझा धरला. इतक्यांत त्यांना शंका येऊन 'तुम्ही कोण ?' म्हणून मला त्यांनीं प्रश्न केला. मी 'हरिभाऊ' म्हणून सांगतांच त्या दचकल्या आणि कांहीं एक न बोलतां झपाट्यानें तेथून निघून गेल्या. मग मी झालेल्या गोष्टीचा विचार करीत घरीं गेलों. माझ्या मनांत पुष्कळ गोष्टी घोळूं लागल्या. तुमचा आणि वत्सलाबाईचा संबंध—"

" हं—हरिभाऊ, असे भलत्याच दिशेला वहात जाऊं नका ! "

" नाहीं. प्रभाकरराव, मी अगदीं खरं खरं सांगतों. माझ्या मनांत तसे विचार आले खरे. एक दोन दिवस मी ह्या गोष्टीवर विचार केला आणि शेवटीं 'मोठ्या माणसांच्या गोष्टींत आपण मन घालूं नये ' असें ठरवून मी तो विचारच सोडून दिला. त्या दिवसापासून आज सकाळपर्यंत मी ती गोष्ट जवळ जवळ विसरलोंच होतों. पण सकाळीं भाऊसाहेब गेटावर आले, तेव्हां रामजीनें मला खूण करून बाहेर बोलाविलें. आणि हें पत्र दिलें. पुनः मी विचारांत पडलों. काय करावें तेंच मला कळेना. शेवटीं पत्रांत बोलाविल्याप्रमाणें वत्सलाबाईंना भेटावें असा मी बेत केला."

" मग भेटलांत का तिला ? काय सांगितलं तिनें ? "

" काय सांगूं तो पुढला प्रकार तुम्हांला प्रभाकरराव ? मला आतां असं वाटतं कीं, मी आज त्यांना भेटण्याकरितां आलों नसतों तर फार चांगलं झालं असतं ! "

" पण काय झालं तें तरी कळूं द्या ? "

" फार वाईट प्रकार घडला प्रभाकरराव ! मी आलों तेव्हां वत्सलाबाई वाड्याच्या मागें बागाच्या फाटकाजवळ माझी वाटच पहात लपून होत्या. मला पाहतांच त्यांनीं हळूंच फाटक उघडलें आणि 'पत्राचा राग नाहींना आला ?' असें प्रथम विचारून 'माझें एक काम आहे ? कराल का ?' असें मला त्यांनीं शपथेवर विचारलें. मी बराच वेळ उत्तर दिलें नाहीं. मग म्हणालों कीं, 'माझ्याकडून होण्यासारखें असल्यास अवश्य करीन ' तेव्हां त्यांनीं मला शपथ घ्यावयास सांगितली. शेवटीं मला 'हो नाहीं' करतांना शपथ घ्यावी लागली. मग मी त्यांना काय काम आहे असें विचारलें. परंतु त्यांनीं बराच वेळ उत्तर दिलें नाहीं. मग 'माझं काय काम आहे तें नाहीं का आपल्या लक्षांत येत ?' असें म्हणून त्यांनीं एकदम माझ्या गळ्याला मिठी मारिली ! प्रभाकरराव, तुम्हांला काय सांगूं ? त्यावेळीं मी इतका घाबरलों कीं, माझे हात पाय थरथर कापायला

लागले. मग मी मोठ्या संकटानें स्वतःची सुटका करून घेऊन तेथून निसटलों आणि ह्या इकडे आलों."

ह्या प्रकार ऐकून प्रभाकराची चर्या गंभीर दिसूं लागली. वत्सलेविषयीं त्यानें प्रथमच जी कल्पना केली होती, तीच शेवटीं खरी ठरलेली पाहून त्याला अत्यंत वाईट वाटलें. आतां लवकरच ह्या गोष्टीचा बंदोबस्त केला नाहीं तर पुढें परिणाम फार भयंकर होईल, हा विचार त्याच्या मनांत येऊन वत्सलेच्या भावी स्थितीचें भेसूर चित्र त्याच्या डोळ्यांपुढें उभें राहिलें. आपण झिडकारतांच तिच्या मनानें हरिभाऊकडे धांव घेतली. त्याचप्रमाणें आतां त्यानें झिडकारिलें आहे तेव्हां तिचें मन भलत्याच ठिकाणीं धांव घेऊं लागेल; आणि ह्या तिच्या कृतीमुळें देशमुखांच्या नांवाला कालिमा लागेल; अशी त्याला भीति वाटूं लागली. तो बराच वेळ विचारांत मग्न असलेला पाहून हरिभाऊलाहि चमत्कारिक वाटूं लागलें. आपण मोकळ्या मनानें सर्व गोष्टी प्रभाकराला सांगितल्या परंतु त्यानें ह्या सर्व गोष्टी भाऊसाहेबांच्या कानावर घातल्या तर आपणास आपल्या चाकरीला मुकावें लागेल अशी उलट त्याच्या मनाला दहशत बसली. तो म्हणाला, " प्रभाकरराव, मी शपथेवर सांगतों कीं, यांत माझा काडी इतकाहि दोष नाहीं. मला जर वत्सलाबाईचा उद्देश प्रथमच कळला असता तर मी आज आलोंच नसतों. मी गरीब पोटार्थी मनुष्य ! मी ह्या भानगडींत कशाला पडूं ? पण प्रसंगच पहा कसा चमत्कारिक आला आहे तो ! "

" बरं आतां हरिभाऊ, तुम्ही आतां असं करा. " विचार करीत प्रभाकर म्हणाला, " ह्या झालेल्या गोष्टीची तुह्मी ह्यापुढें जास्त वाच्यता करूं नका. मी आतां ह्या सर्व गोष्टींचा नीट विचार करून पुढें कसं काय वागायचं तें तुम्हाला एक दोन दिवसांत सांगतों. पण तोंपर्यंत तुम्ही पुनः वत्सलेला भेटूं नका. आणि यदाकदाचित् तिनें जर तुम्हाला पुनः एखादें पत्र लिहिलें तर प्रथम मला येऊन भेटा. "

त्याच्या म्हणण्याप्रमाणें करण्याचें कबूल करून हरिभाऊ निघून गेल्यावर प्रभाकर माडीवर गेला. तेथें यशवंताच्या बिछान्या समोवतीं एका बाजूला सावित्रीबाई, राधाआका आणि कमला बसलीं होतीं आणि दुसऱ्या बाजूला शास्त्रीबुवा आणि रायबा बसले होते. मल्हारी दरवाज्यांत उभा होता. प्रभाकर वर येतांत शास्त्रीबुवांनीं विचारलें " कायरे प्रभाकर, कां आला होता तो हरिभाऊ ? "

" कांहीं नाहीं उगाच ! त्या दिवशीं तें त्यानें पत्र दिलं त्याविषयीं पुढें कांहीं कमी जास्त प्रकार आहे काय ? अशी त्याची चौकशी करण्याकरितां तो आला होता. " अशा रीतीनें उत्तर देऊन प्रभाकरानें खरी गोष्ट त्या वेळीं लपवून ठेविली.

" प्रभाकर, आतां मला किती–किती तरी बरं वाटतं म्हणून सांगूं ? " यशवंत खोल आवाजांत परंतु आनंदांत म्हणाला, " माझ्यावर तुमचे सर्वांचे किती तरी उपकार आहेत."

" यशवंत, असं फक्त बोलून किती उपकार झाले आहेत ते आम्हाला कळायचे नाहींत. " शास्त्रीबुवा हास्य मुद्रा करून म्हणाले, "ह्या उपकारांची मोजणी झाली पाहिजे तर आतां तूं उद्यांपासून असं कर. ही कमळा तुझ्या तैनातीला दिली आहे. ती तुझें पथ्य–पाणी–औषध वगैरे सर्व कांहीं पाहणार आहे. शिवाय दुपारच्या प्रहरीं कांहीं रामायण महाभारत वाचून ती तुझी करमणूकहि करील. त्यावेळीं प्रत्येक दिवशीं तुझ्यावर किती उपकार झाले तें तिला सांगत जा. म्हणजे ती त्या सर्वांचें टांचण करून ठेवील. " शास्त्रीबुवांचें हें विनोदी भाषण ऐकून यशवंत मोठ्यानें हांसला. वाचकहो ! आमचा दुःखी कष्टी यशवंत, आज किती दिवसांनीं–नव्हे किती महिन्यांनीं आज हांसला असेल बरें ?

अशा रीतीनें थोडावेळ आनंदांत घालवून शास्त्रीबुवा आणि रायबा जाण्याकरितां उठले. प्रभाकर त्यांच्याबरोबर खालीं आला आणि रायबा गेल्यावर शास्त्रीबुवांना थांबवून त्यानें वत्सलेची सर्व हकीकत त्यांना सांगितली. पुष्कळ वेळ त्यांची वाटाघाट चालली होती. शेवटीं शास्त्रीबुवा म्हणाले, " ह्या गोष्टीचा आतांच्या आतांच बंदोबस्त झाला पाहिजे. नाहीं तर ती उच्छृंखल पोर स्वतःबरोबर सर्व कुळाला बट्टा लावील. आतां ह्याला योग्य उपाय म्हटला म्हणजे तिचें आतां लग्नच करणें हितावह आहे. ह्या पोरींना घरांत वडील माणसांची शिस्त नसली म्हणजे त्या ह्या अशा उच्छृंखल बनतात. मग आतां झाल्या गोष्टीचा कीस पाडण्यांत काय अर्थ ! कांहीं तरी आतां उपाय योजला पाहिजे. मी आतां असं करतों, उद्यां मी ताईसाहेबांची प्रकृति पाहण्याकरितां वाड्यांत जाईन तेव्हां सर्व गोष्टी त्यांच्या कानावर घालीन आणि त्या पोरीवर रात्रं दिवस नजर ठेवण्यास त्यांना बजावीन. "

---

# प्रकरण ३१ वें.

## पुनः जंजिऱ्यास.



भाऊसाहेबांना मिळालेल्या एका महिन्याच्या नोटिशीची मुदत भरत आली. परंतु त्यांना त्याबद्दल कांहींच काळजी वाटत नव्हती. कारण त्यांनीं आपल्या विशाल डोक्याच्या पाताळयंत्री वकिलाच्या सहाय्यानें सर्व जय्यत तयारी करून ठेविली होती. आतां त्यांना कोणतीच काळजी उरली नव्हती. उलट ते नोटिशीची मुदत संपण्याचीच वाट पहात होते. नोटिशींत लिहिल्याप्रमाणें देशमुखवाडीचा, वतनाचा आणि स्थावरजंगम जिंदगीचा ताबा घेण्याकरितां यशवंत येतांच फौजदाराकडून त्याच्या हातांत बिड्या ठोकण्याची त्यांनीं व्यवस्था करून ठेविली होती. तरी देखील 'भाऊसाहेबांनीं यशवंताचा खून केला' ह्या गोष्टीची चर्चा मधून मधून गांवांत होतच होती. यशवंत आंवराईमध्यें प्रभाकराच्या घरीं हळूहळू सुधारत चालला होता. त्याच्या गालावरील आणि खांद्यावरील जखमा आतां साफ बऱ्या झाल्या होत्या. परंतु त्या दोन्ही ठिकाणीं भाऊसाहेबांच्या राक्षसी कृतीची साक्ष देण्याकरितां खुणा कायम राहिल्या. त्याची हकीकत शास्त्रीबुवांकडून वाड्यांत सगुणाबाई आणि कृष्णा यांना रोज कळत असे. त्यामुळें त्या दोघी चिंतारहित होत्या. वत्सलेवर मात्र आतां रात्रंदिवस दुर्गाताईचा खडा पहारा बसला होता. आपल्या मागें आत्या अशी हात धुवून कां लागली आहे, हें तिच्या लक्षांत येईना. असो.

एकसारखी जंजिऱ्यास समुद्रकांठची खारी हवा खावून कंटाळलेल्या वाचकांस थारेपालट करण्याकरितां घांटावर नेल्यास त्यांना आनंदच होईल अशी खात्री वाटत असल्यामुळें ह्या प्रकरणांत आम्हीं पुण्यास जाण्याचा विचार केला आहे. माधवरावानें प्रभाकराला लिहिलेल्या पत्रांत भाऊसाहेबांना नोटीस दिलेल्या गृहस्थांची माहिती दिली

आहे, ती वाचकांच्या स्मरणांत असेलच. त्या गृहस्थाचें नांव कळावें म्हणून माधवरावानें फार खटपट केली. परंतु व्यर्थ ! नाहीं म्हणायला तो गृहस्थ अलीकडे नानासाहेब वकिलाजवळ वरचेवर येऊन एकांतांत तासाचे तास घालवीत असे. एके दिवशीं ती मंडळी एकत्र बसून चहापान करीत असतां तो गृहस्थ नानासाहेबांकडे पहात माधवरावाला म्हणाला, "माधवराव, आतां तुमचा डोळा साफ बरा झाला. आतां आम्हीं उद्यांपासून तुमच्या डोळ्यांच्या चौकशीकरितां येणार नाहीं."

" वाः चांगलं ! तुमच्या न येण्याला हें कारण चांगलं ! "

" कारण चांगलं असो अगर वाईट असो. पण आम्ही आतां येणार नाहीं हें खरं ! कारण आम्ही आतां येथून जाणार—"

" कुठें ? आणि ती भाऊसाहेब देशमुखांना नोटीस दिली आहे त्याचं काय करणार?"

" त्या करितांच तर जाणार ! त्या नोटिशीची मुदत उद्यां पुरी होते. तेव्हां तुमच्या यशवंतरावाच्या वतीनें भाऊसाहेबाबरोबर भांडण्याकरितां मला तिकडे गेलं पाहिजे. का जाऊं कीं नको ?—काय तुमचं मत आहे ? तुम्ही त्याच्या केविलवाण्या स्थितीचं वर्णन केलंत म्हणून तर मी ह्या गोष्टींत मन घातलं."

" मग केव्हां निघणार ? आणि तुम्ही आपलं नांव मात्र अद्यापि मला कळूं दिलं नाहीं ? "

" माधवराव, नांवांत काय मोठेंसें आहे. मी कांहीं बडा मनुष्य नाहीं तर माझें नाझं मोठें असेल. आहे आपला एक निरुद्योगी लहरी प्राणी ! बरं तें आतां जाऊं द्या. मी आज रात्रींच्या गाडीनें मुंबईस जाणार, तेथून उद्यां बोटीनें जंजिऱ्यास जाणार. तेथें गेल्यावर तुम्ही म्हणतां त्या मुकुंदशेटकडे उतरणार. त्याच्या जवळ सर्व चौकशी करणार आणि परवां सकाळीं देशमुखवाडींत जाऊन भाऊसाहेब देशमुखांस भेटणार; असा मी हा कार्यक्रम आंखून ठेविला आहे. "

आणि ह्या आंखलेल्या कार्यक्रमाप्रमाणें तो गृहस्थ रात्रीं प्यासेंजर गाडीनें मुंबईस जाण्याकरितां पुण्याच्या स्टेशनवर आला. सर्व रात्र गाडींत काढावयाची असल्यामुळें एकदा रिकामा डबा पाहावा म्हणजे झोंप घेण्यास ठीक पडेल असा विचार करून त्यांनीं एक शेवटचा डबा पसंत केला. त्या डब्यांत मुंबईस जाणारे चार पांच उतारू होते. एका कोपऱ्यांत चौदा

पंधरा वर्षांचा एक मुलगा खिडकीजवळ बसला होता. त्या गृहस्थानें तो मुलगा बसला होता त्याच्या समोरच्या बाकावर कोपऱ्यांत आपलें ठाणें दिलें. त्याच्याजवळ एक ट्रंक एक चामड्याची मोठी ब्याग,वादीनें बांधलेला बिछाना आणि पाण्याचा मोठा चंबू होता. तो गृहस्थ वयानें पन्नास पंचावन वर्षांचा असून कल्ले राखलेले असल्यामुळें त्याचा चेहरा भव्य दिसत होता. त्याचा एकंदर पेहरावावरून तो गृहस्थ उत्तर हिंदुस्थानांतील राहणारा असावा असा तर्क होत असे. त्यानें आपलें सामान बांकाखालीं ठेऊन बिछाना सोडला आणि तो बाकावर आंथरून त्यावर आपलें आसन ठोकलें. नंतर खिशांतून डबी काढून पानाची पट्टी आणि तंबाखूची चिमटी तोंडांत टाकिली. त्याच्या समोर बसलेला मुलगा मधून मधून त्याच्याकडे पहात होता. आणि स्वतःशीं एक पद गुणगुणत होता. गाडी चालू झाल्यावर त्या गृहस्थानें बिछान्यावर पाय पसरले. आणि डोळे मिटले. त्याला झोंप लागली नाहीं. आपण जंजिऱ्यास गेल्यावर पुढें काय काय करायचें त्याबद्दलच त्याचा विचार चालू होता. मधून मधून त्याच्या समोर बसलेल्या मुलाचें गुणगुणणें त्याला ऐकूं येत होतें. हळुहळू तो मुलगा आपलें पद उंच स्वरांत घोकून म्हणूं लागला—

**‘ जरा ठाडे रहो बनमें, मैं चलुंगी तोरे साथ ।**
**मैं चलुंगी तोरे साथ । रामा ! मैं चलुंगी० ॥ ध्रु० ॥ ’**

तो गृहस्थ आतां लक्ष्यपूर्वक त्या मुलाचें पद ऐकूं लागला. तो स्वतः संगीत शास्त्राचा मर्मज्ञ असल्यामुळें त्याचें लक्ष त्या मुलाच्या पदांकडे वेधलें यांत आश्चर्य नाहीं. शेवटीं तो उठून बसला आणि त्या मुलाला म्हणाला, “ कायरे मुला, तूं कुठें असतोस ? गाण्याची तुला आवड आहे असं दिसतं. ”

“ मी मुंबईकर संगीत नाटक मंडळींत मुख्य स्त्रीपार्टी आहें ” मोठ्या अभिमानानें तो मुलगा म्हणाला,

“ मुंबईकर संगीत नाटक मंडळी ! नवीनच आहे वाटतं ही मंडळी ? मी नव्हतें हें नांव कधीं ऐकलें ! ”

“ होय—नवीनच आहे. ”

“ असं काय ? मग तूं देखील नवीनच राहिलेला आहेस तर ! पण पूर्वी कुठें होतास?”

" पूर्वी आम्ही एक स्वतंत्र कंपनी काढली होती. परंतु ती लवकरच मोडली. "

" तुझं नांव काय ? "

" मधुकर. "

" आणि राहणार ? "

" जंजिऱ्याचा. "

" जंजिऱ्याचा ? मग तूं दाजीबा सरदेसायाचा मुलगा कीं काय ? " त्या गृहस्थानें एकदम विचारलें. आपल्या वडिलांचें नांव त्या परक्या गृहस्थानें सांगितलेलें ऐकतांच मधुकर त्याच्या तोंडाकडे पहात राहिला. प्रभाकरानें माधवरावाला पत्र लिहिलें होतें, त्यांत मधुकराच्या नांवाचा उल्लेख होताच. तेव्हां तो पुण्यांत शिकण्याकरितां आल्यापासून पुढें त्यानें शाळा सोडली, क्लब काढला, मंडळी जमविली, नाटक बसविलें, बाबुरावाला पत्र लिहून त्याच्याकडून साडेतीनशें रुपये आणविले आणि शेवटीं त्याला इतर मंडळींनीं फसविलें वगैरे सर्व हकीकत माधवरावानें त्या गृहस्थाला सांगितली होती. तेव्हां मधुकराचें नांव आणि राहण्याचें ठिकाण ऐकतांच त्याला त्याची ओळख पटली. इतकेंच नव्हें तर तो गृहस्थ आपण समजतों तसा कोणी परका नसून किंवा यशवंताची हकीकत ऐकून त्याच्याबद्दल करुणा येऊन फक्त कळकळ वाळगणारा नसून जंजिऱ्याचा व विशेषतः तेथील देशमुखवाडीचा चांगला माहितगार असावा असें आपणास दिसून येईल. तो पुढें म्हणाला, " मधुकर, तुझ्याविषयीं सर्व हकीकत मला कळली आहे. तूं आपला अभ्यास सोडून हा जो उद्योग आरंभिला आहेस तो मला बिलकूल पसंत नाहीं. तूं चांगला विद्याभ्यास करावास म्हणून तुला तुझ्या आईनें इतक्या लांब पुण्यास पाठविलें, परंतु तूं आपलें कर्तव्य विसरून ह्या वाईट छंदाला लागलास ! तर आतां माझं ऐक. मी आतां कांहीं कामाकरितां जंजिऱ्यास जात आहें. तेव्हां तूं माझ्याबरोबर जंजिऱ्यास चल—"

" मी नाहीं यायचा ! " एकदम मधुकर म्हणाला.

" कां नाहीं येणार ? न येण्याचं कारण काय तें तरी सांगशील कीं नाहीं ? "

" मी नाहीं येणार ! मला विचारणार तुम्हीं कोण ? "

" मी कोण ? " मान हालवीत तो गृहस्थ गंभीर स्वरांत म्हणाला, " पण मी कोणी कां असेना ! तुला माझ्याबरोबर जंजिऱ्यास आलेंच पाहिजे. "

" तुमची माझ्यावर एवढी बळजबरी काय म्हणून ! "

" अस्सं काय ? अद्यापि तुला माझा इंगा कळला नाहीं तोपर्यंत ! " असें म्हणून त्या गृहस्थानें मधुकराकडे तीक्ष्ण दृष्टीनें पाहिलें. त्याबरोबर तो गोगलगाय बनला. बराच वेळ तो गृहस्थ गप्प होता. नंतर त्यानें पुन्हां आपली डबी काढून एक पानाची पट्टी आणि तंबाखूची चिमटी तोंडांत टाकिली. तेव्हां मधुकर हळूंच म्हणाला, " मी जंजि-ऱ्यास गेलों तर मला आतां आई घरांत घेणार नाहीं. मी–मी–"

" इतकंच ना ? तें मांझ्याकडे लागलं. अरे वेड्या, तुझ्या आईचा कान धरण्याचा अधिकार मला आहे. मग तुझी काय कथा ? चल, आतां शहाणा असशील तर माझं ऐक. तूं पुण्यास काय काय ढंग केलेस आणि आतां तुझी कशी स्थिति आहे, तें सर्व मला माहित आहे. आतां हें नाटक फाटक सर्व दे सोडून आणि नीट वाग. मी स्वतः कोणाला सहसा वळणारा गृहस्थ नाहीं. पण तुला पाहून तुझ्याविषयीं माझ्या मनांत थोडें प्रेम उत्पन्न झालें आहे. म्हणून म्हणतों कीं, तूं नीट वागून झटून अभ्यास करशील तर मी तुझें जन्माचें कल्याण करीन. मध्यंतरीं वाईट संगतीला लागून दोन महिन्यांत तूं तीनशें साडेतीनशें रुपये उधळलेस पण ते रुपये चोरीचे होते. आणि आतां मी मनांत आणीन तर तुला येथल्या येथेंच पोलीसाच्या ताब्यांत देऊं शकेन ! "

" नको–नको. मी–मी–नाहीं—"भयभीत होऊन मधुकर म्हणाला.

आतां मधुकर सर्वस्वी त्या गृहस्थाच्या ताब्यांत गेला. आपण जसें वांकवूं तसा हा आतां वांकेल अशी त्याची पूर्ण खात्री झाली. अशा रीतीनें वरील संवादांत दोन चार स्टेशनें निघून गेल्यावर त्यानें मधुकराला एक पद म्हणण्यास सांगितलें. परंतु त्याचें मन गोंधळलेलें असल्यामुळें तें पद चांगलें वठलें नाहीं. तेव्हां त्या गृहस्थानें तेंच पद आपल्या खड्या सुरांत म्हणून दाखविलें. त्यामुळें तर मधुकरावर त्या गृहस्थाची पूर्ण छाप बसली. हळुहळूं त्यानें मधुकराकडून सर्व गोष्टी काढून घेतल्या. आणि त्यानेंहि कांहींएक न लपवितां सर्व त्याला सांगितलें. आतां तो मुंबईस जात होता परंतु बिन टिकिटीनेंच जात होता. पुण्यांत खाणावळीचे एक महिन्याचे पैसे त्याला द्यावयाचे होते. त्यानें मुंबईत नवीन निघालेल्या नाटक मंडळीस पत्र लिहिलें आणि इतके दिवस उत्तराची वाट पाहिली. शेवटीं खाणावळीचें बील चढत चाललेलें पाहून आज तो मुंबईस पळून जात होता. हें

त्याची स्थिति ऐकून त्या गृहस्थानें त्याच्या भावी स्थितीचें असें भेसूर चित्र काढून त्याच्यापुढें उभें केलें कीं, तें ऐकून मधुकराच्या डोळ्यांतून पाणी आलें. तो म्हणाला, "मधुकर, शेवटीं तुझी ह्या छंदामुळें अशी स्थिति होऊन पुढें तुझे हाल कुत्रादेखील खाणार नाहीं."

"नाहीं नाहीं, आतां मी तुम्हीं सांगाल तसं वागेन."

सकाळीं ते दोघे बोरीबंदरच्या स्टेशनवर उतरले. आणि तेथून ते सरदारगृहांत गेले. तेथें स्नान भोजन आटोपून बोटीच्या वेळेवर ते कार्नाक बंदरावर आले. टिकीटा काढून ते बोटींत चढतांना त्या गृहस्थाला आनंद झाल्यासारखें दिसत होतें. तो बोटीच्या डेकवर उभा राहिल्यावर म्हणाला, "मधुकर, आज मी वीस वर्षांनीं ह्या पाण्यांतून प्रवास करीत आहें. त्यावेळीं बोटी नव्हत्या. त्यावेळीं ह्या पाण्यांतील प्रवास पडावांतून करावा लागत असे. आतां मी ह्या बोटींत उभा आहें पण मला असं वाटतं कीं, मी एखाद्या नवीनच सृष्टींत उभा आहें." असें म्हणून तो स्वतःच्या सभोंवतीं मोठ्या उल्हासानें पाहूं लागला. थोड्याच वेळानें बोट चालूं लागली. त्या प्रवासांत विशेष म्हणण्यासारखा कांहींएक प्रकार घडला नाहीं परंतु काळखाईच्या खोऱ्याला बोट लागल्यानंतर ते दोघेजण बंदरावर आले त्यावेळीं त्यांना एक अनिष्ट प्रकार कळला. बोट येण्याच्या वेळीं गवळ्या बहुतकरून बंदरावर पैसा दोन पैसे हेल मिळविण्याच्या आशेनें येत असे. त्याप्रमाणें तो आजहि आला होता. मधुकर त्याच्या दृष्टीस पडतांच तो जवळ आला परंतु त्याच्याबरोबर तो परका गृहस्थ असल्यामुळें कांहींएक न बोलतां हेल आपणासच मिळेल, ह्या आशेनें दूर उभा राहिला. कुठें जावयाचें आहे, तें मधुकरालाहि माहीत नव्हतें. तो गृहस्थ आपणास घेऊन एकदम आंबराईंत जाईल किंवा शहरांत वस्ती करील याविषयीं त्यानें कांहींच चौकशी केली नव्हती. परंतु आतां चौकशी करण्याची वेळ आली. तो म्हणाला, "आपणाला आतां कुठें जावयाचें? आमच्या घरीं जाण्याकरितां मी टांगा ठरवूं कीं काय?"

"नको. आतां आपण शहरांत मुकुंदरावाच्या पेढीवर जाऊं. तेथें मला प्रथम काम आहे. मग उद्यां आपण तुझ्या घरीं जाऊं."

"ठीक आहे." असें म्हणून मधुकरानें गवळ्याला हांक मारिली आणि विचारलें, "गवळ्या, येतोस कायरे?"

" येतो न्हायी तर काय ? न्हाई तर कशा पायी यथं उभा राहयलों असतो " असें म्हणून गवळ्या ट्रंक उचलूं लागला, तेव्हां आपल्या घरची कांहीं तरीं बातमी कळावी ह्या उद्देशानें मधुकरानें विचारलें, " गवळ्या, आपल्या गावांतील काय खबर आहे ? "

" काय खबर विचारतां मधुकरराव ! लई बघा खबर वंगाळ हाय ! "

" का बरं ? एवढी वंगाळ असायला काय झालं ? "

" वंगाळ न्हवं तर काय ? भाऊसाहेबांनीं यशवंतरावांचा खून केला—"

" काय ?—" मधुकरानें आणि त्या गृहस्थानें एकाच वेळीं प्रश्न केला.

" त्यांनीं दगूड हाणूनशांनीं त्यांचा खून केला खून ! "

गवळ्याचें उत्तर ऐकतांच तो गृहस्थ एखाद्या दगडी पुतळ्याप्रमाणें तेथेंच स्तब्ध उभा राहिला. त्याचें तोंड खर्रकन् उतरलें. भाऊसाहेबांच्या जाचांतून आपण त्याची सुटका करण्याकरितां आलों परंतु आपल्या पूर्वींच भाऊसाहेबांनीं त्याची कायमची सुटका केली हें ऐकून त्याची अशी स्थिति होणें अगदीं स्वाभाविक आहे. आतां पुढें काय करावें हें त्या गृहस्थाला सुचेना. त्यानें पुनः पुनः विचारल्यावर 'मी मागं उभा व्हतो आणि ह्या डोळ्यांनीं बघितलं नव्ह का !' अशी गवळ्यानें साक्षी देखील दिली. ह्या बातमीमुळें त्याची कंबर खचल्यासारखी झाली. शेवटीं दुःखी मनानें तो मुकुंदशेटच्या घरीं जाण्याकरितां निघाला. हळुहळूं ते दोघे आणि ओझें घेतलेला गवळ्या पेढीजवळ आले. आपल्या शेटजीकडे कोणी पाहुणे आले आहेत असें पाहून एका कामगारानें आंत जाऊन शेटजीस वर्दी पोंचविली. तेव्हां शेटजी स्वतः उठून बाहेर आले. आणि त्या गृहस्थाच्या तोंडाकडे पहात राहिले.

"का मुकुंदराव, नाहीं का ओळख पटत ?" तो गृहस्थ पुढें होऊन म्हणाला, "तुम्ही आपल्या वस्तादाला अगदीं विसरलां म्हणायचं ? "

" कोण— — ! "

परस्परांचीं ओळख पटतांच मुकुंदशेटनीं त्या गृहस्थाला आंत नेलें. पंधरा वीस मिनिटें त्यांच्या आंत गोष्टी झाल्यावर त्यांनीं मधुकर आणि गवळ्या यांना आंत बोलावून नेलें. मुकुंदशेटनीं पुनः गवळ्याला सर्व हकीकत विचारली. नंतर त्यांच्या हातावर एक पावली

ठेऊन त्यास तेथेंच राहण्यास सांगितलें. आणि तें त्यानें कबूल केल्यावर मुकुंदशेट म्हणाले, " ह्याच्या साक्षीची आपणास जरूरी पडेल. बरं तुम्हाला काशीनाथपंत पुरोहित ठाऊक आहेत ना ? पूर्वी आपल्याच मंडळीत ते होते. "

" होय आठवलं !— कां बरं ? "

" ते आतां येथें मोठ्या हुद्यावर आहेत. आपल्या मंडळींपैकीं नांव घेण्यासारखे ते एक सरकारी अधिकारी आहेत. त्यांचा आपणास ह्या कामांत फार उपयोग होईल. कारण ते तेथें मुख्य न्यायाधिशाच्या जागेवर आहेत. "

" मग ठीक आहे. त्यांना प्रथम जाऊन भेटूं. माझी खात्री आहे कीं, माझें काम ते मोठ्या आस्थेनें करतील. "

" करतील म्हणजे ? केलंच पाहिजे. बरं पण आतां आपण थोडासा उपहार आटपूं. मग जाऊं त्यांच्या कडे ! "

मुकुंदशेटनीं तत्काळ उपहाराची व्यवस्था केली. त्यांची आणि त्या गृहस्थाची फार जुनी ओळख असावी असें दिसत होतें; कारण फराळ होत असतां 'लहानपणींच्या लीला ' हा त्या दोघांचा बोलण्याचा विषय होता. हळुहळूं तो विषय बदलून पुनः भाऊसाहेबांविषयीं त्यांच्या गोष्टी सुरु झाल्या. त्यांत त्यांचें कुळावरोबर, खाणीवरील मजुरांबरोबर, आपल्या घरांतील माणसांबरोबर आणि प्रभाकराबरोबर कसें वर्तन आहे, ह्या गोष्टी मुख्य होत्या. फराळ झाल्यावर ते दोघे काशीनाथपंत पुरोहित यांच्याकडे जाण्यास निघाले.



## प्रकरण ४० वें.



## बाजू उलटली.





सकाळीं सहा वाजले होते. देशमुखवाडींतील सर्व मंडळी अद्यापि उठली नव्हती. अशावेळीं वाड्याच्या दरवाजाजवळ दोन गाड्या येऊन उभ्या राहिल्या. पहिल्या गाडींत तो गृहस्थ, मुकुंदराव आणि काशीनाथपंत न्यायाधीश बसले होते आणि दुसऱ्या गाडींत फौजदार, मधुकर आणि पोलीस नाईक असून पुढल्याबाजूला गवळ्या बसला होता. गाड्या उभ्या राहतांच तो गृहस्थ खालीं उतरला आणि पोलिसनाईकास बरोबर घेऊन दरवाजाजवळ आला. एक दोन हांका मारतांच काशीनें पुढें होऊन दरवाजा उघडला. तेव्हां तो गृहस्थ म्हणाला, " बळवंतराव उठले काय ? जा–त्यांना सांग कीं, यशवंतराव देशमुख आले आहेत. "

" कोण ?— यशवंतराव ? —यशवंतराव तर— "

" तर तर काय ? तुला सांगितलें तें काम कर. "

काशी तशीच आंत गेली आणि आपल्या बापाला म्हणाली, " बाहेर कोणी एक मनुष्य आला आहे. त्याच्या बरोबर नाईकहि आले आहेत. तो ' यशवंतराव देशमुख आले आहेत, ' असं भाऊसाहेबांना सांगायला सांगतो. " आपली मुलगी काय सांगते तें रायबाच्या लक्षांत आलें नाहीं. तो आपली घोंगडी सांवरीत पुढें आला. त्याला पाहतांच तो गृहस्थ म्हणाला, " काय रायबा, अगदीं झातारा झालास तूं ! पण मला ओळखलंस का ? मी कोण ? "

" तु–तु–तुम्ही–! होय, तुम्ही अण्णासाहेबच ! अहाहा ! मायबाप सरकार ! होतात तरी कुठं इतकी वर्षं तुम्ही ? "

" होतों असाच जगाच्या पाठीवर भटकत ! पण कायरे रायबा, येथली काय खबर आहे ? "

" खबर काय ?–विचारूं नका अण्णासाहेब. आतां ईश्वराला आमची करुणा येऊन तुम्ही आमचे मायबाप आला अहांत—"

" बरे–बळवंतराव उठले काय ? जा–त्यांना सांग कीं मी आलों आहें."

म्हातारा रायबा तडक निघाला. आणि आंतल्या दरवाजावर येऊन तो खडखडवूं लागला. दुर्गाताई नुकतीच उठली होती. तिनें 'अरे, कोण आहे?' 'अरे, कोण आहे?' असें म्हणत दरवाजा उघडला. परंतु रायबाला पहातांच तिच्या भिंवया चढल्या. ती रागानें म्हणाली, " कायरे रायबा, इतका थेरडा झालास तरी एवढी अक्कल नाहीं ? किती मोठ्या मोठ्यानें दरवाजा वाजविलास ?"

" रायबा, ह्या कोणरे एवढ्या गुरगुरणाऱ्या मालकीणबाई ?" पुढें होऊन अण्णासाहेब म्हणाले. त्यांना पाहतांच दुर्गाताई दरवाजा आड झाली.

" आत्याबाई, हे अण्णासाहेब आले आहेत म्हणून मी भाऊसाहेबांना सांगायला आलों होतों." रायबा म्हणाला.

" कोणते आणलेस अण्णासाहेब ? भाऊ अद्यापि उठला नाहीं ह्मणून सांग त्यांना."

दुर्गाताईचें उत्तर ऐकून अण्णासाहेब खाडकन् दरवाजा उघडून आंत आले. आणि रायबाला म्हणाले, " रायबा, तूं पुढें हो. आणि मला दाखीव बळवंतराव कुठें झोंपले आहेत तें ! मीच त्यांना उठवितों. आणि सगुणा कुठें आहे ?"

अण्णासाहेबांची ही दडपशाही पाहून दुर्गाताई गोंधळली. भाऊसाहेबास नांवानें संबोधणारा आणि सगुणाबाईला एकेरी नांवानें हाक मारणारा हा गृहस्थ कोण असावा म्हणून ती विचार करूं लागली. इतक्यांत बाहेरची गडबड ऐकून सगुणाबाई बाहेर आली आणि त्याच वेळीं भाऊसाहेबहि खालीं उतरून आले.

" कोण अण्णा ?"—" अण्णासाहेब-यशवंतराव !" पतिपत्नींनें एकाच वेळीं आश्चर्याचे उद्गार काढले.

" होय. मीच तो ! एकूण तुह्मी दोघांनीं मला लवकरच ओळखलं म्हणायचं !"

" मग—मग ती नोटिस तुह्मी—"

" होय. मीच पाठविली आणि त्या नोटिशीप्रमाणें मुदत संपतांच आज मी माझ्या हक्काचा ताबा घेण्याकरितां आलों आहें. "

" तुमचे कसले हक्क ? ही सर्व इस्टेट आणि वतन माझें आहे. "

" तुमचें आहे ? तुम्हाला कोणी दिलं ? "

" कोणी दिलं म्हणजे ? दादासाहेबांनीं आपल्या मृत्यूपूर्वी उईलपत्रांत तसं लिहून ठेविलं आहे. "

उईलपत्राचें नांव ऐकतांच अण्णासाहेब क्षणभर घोंटाळ्यांत पडले. ते म्हणाले, "दादासाहेबांनीं उईलपत्रांत लिहून ठेविलं आहे, हें मी कशावरून खरं समजावं ? कुठें आहे तें उईल ? मला तें उईलपत्र पाहिलं पाहिजे. "

" असें उईलपत्र मी दाखवीत नसतों. हा कांहीं पोरखेळ नाहीं. तुमच्या हातांत उईलपत्र गेल्यावर तो महत्त्वाचा दस्तऐवज तुम्ही फाडून टाकणार नाहीं कशावरून ? "

" कावीळ झालेल्या मनुष्याला सर्वच पिवळें दिसणार ! बळवंतराव, तुम्हीच हा पोरखेळ बंद करा. आणि माझ्या नोटिशीप्रमाणें माझ्या हक्कांचा आतांच्या आतां ताबा द्या. नाहीं तर उईलपत्र दाखवून आपला हक्क तरी शाबीत करा. " असें म्हणून अण्णासाहेब नाईकाकडे वळून म्हणाले, " जा नाईक, गाडींत बसलेल्या मंडळीस येथें घेऊन या. "

गाडींत आणखी कोण कोण मंडळी आहे, तें पाहण्याकरितां भाऊसाहेब क्षणभर तेथेंच उभे राहिले नंतर वर निघून गेले. सर्वांचें लक्ष दरवाजाकडे लागलें. बाबुराव, वत्सला, इंदू, कृष्णा आणि सगुणाबाई त्याचप्रमाणें दरवाजाआड उभी असलेली दुर्गाताई ही सर्व मंडळी बावरल्याप्रमाणें गाडींतून कोण आले आहे तें पाहूं लागली. अण्णासाहेबांनीं एक खुर्ची ओढून घेतली आणि तीवर बसतां बसतां ते म्हणाले, " कायग सगुणा, तुझी अगदीं दशा झालेली दिसते. का बरं असं ? तूं तर येथली देशमुखीणबाई !—आणि हा कोण रामजी वाटतं ? "

" होय धनीसाहेब. " अगदीं लवून रामराम करीत रामजी म्हणाला.

" तूं आहेस का अद्यापि ? बरं त्या खुर्च्या कर पाहूं येथें. "

इतक्यांत सर्व मंडळी आंत आली. ती मंडळी बसतात न बसतात तों भाऊसाहेब उईलपत्र घेऊन खालीं आले. फौजदार आणि न्यायाधीश ह्या दोघांना पाहतांच भाऊसाहेब

चपापले. परंतु भीतीचें कांहीं एक चिन्ह न दाखवितां त्यानीं तें उईलपत्र धीटाईनें पुढें केलें. आणि जवळच्या एका खुर्चीवर बसले. अण्णासाहेबांनीं तें उईलपत्र उघडलें आणि प्रथम त्यावर केलेली सही पाहिली. नंतर ते प्रथमपासून वाचूं लागले. त्यांत भाऊसाहेब म्हणत होते त्याचप्रमाणें लिहिलें असून कृष्णीच्या लग्नाकरितां दोन हजार रुपये भाऊसाहेबांनीं द्यावे आणि यशवंत नीट वागला तर त्याला पांच हजार द्यावे. नाहीं तर एक हजार रुपये देऊन त्याला घरांतून काढून टाकावा, असें लिहिलें होतें. हीं सर्व कलमें वाचून आपल्या वडिलांनीं असें अन्यायाचें उईलपत्र केलें असेल काय ? अशी त्यांस शंका आली. परंतु आतां शंका येऊन उपयोग काय ? उईलपत्र न्यायाचें असो अगर अन्यायाचें असो, सध्यां भाऊसाहेब देशमुखीचा उपभोग घेत होते आणि पुढेंहि घेतील, असा विचार त्यांच्या मनांत येऊन आपण ज्या उद्देशानें येथें आलों तो उद्देश सफ फसला म्हणून त्यांना वाईट वाटलें. ह्या एका प्रश्नाचा निकाल लागला परंतु यशवंताचा मुख्य प्रश्न अद्यापि बाकी होताच. ते आतां यशवंताविषयीं चौकशी करणार इतक्यांत हातांत असलेल्या उईलपत्राच्या एका विवक्षित भागाकडे त्यांचा दृष्टि गेली. तेव्हां त्यांनीं तो कागद वर करून उजेडांत धरला; आणि लक्षपूर्वक अवलोकन केला. त्याबरोबर त्यांची चर्या बदलली. त्यांनीं तो कागद काशीनाथपंतांच्या पुढें करून भाऊसाहेबांस विचारलें, " बळवंतराव, दादासाहेबांच्या मागें ह्या देशमुखीचा खरा वारसा मजकडे यावयाचा. पण मी घर सोडून वीस वर्षांपूर्वीं निघून गेल्यावर मी मेलों असेंच समजून हा वारसा माझा धाकटा भाऊ गंगाधर याच्याकडे जावयाचा आणि तो मेल्यावर त्याच्या मुलाकडे म्हणजे यशवंतकडे जावयाचा हें न्याय्य असतांना आपल्या नातवाच्या नांवानें उईलपत्र न करतां दादासाहेबांनीं तें आपल्या नांवें कसें केलें ? "

" कसें केलें तें मी काय सांगूं ? परंतु केलं खरं ! "

" बरं पण हें उईलपत्र त्यांनीं केलं का तुह्मीं केलं ? "

" तुमच्या ह्या भलत्याच प्रश्नांचीं उत्तरें मी देऊं इच्छित नाहीं. तुम्हाला उईलपत्र पाहण्याची इच्छा होती त्याप्रमाणें मी तें तुम्हाला दाखविलें. आतां आपल्या शब्दाप्रमाणें तें परत करा. "

" जरा थांबा बळवंतराव. मला एकच प्रश्न विचारूं द्या. दादासाहेब निवर्तले, त्याच सालीं हें उईलपत्र त्यांनीं केलं किंवा त्या पूर्वीं केलं ? "

" त्याच वर्षीं, मरणापूर्वीं आठदहा दिवस अगोदर केलें. "

"ते केव्हां मेले? १९०० सालीं ना? म्हणजे आज त्याला सोळा वर्षे झालीं म्हणायचीं!"

"होय."

"बरं मग बळवंतराव, आतां एवढंच सांगा कीं, १९०० सालीं उईल लिहिलं परंतु तें लिहिण्याकरितां घेतलेला कागद १९०५ सालीं तयार झाला हें कसें? पहा हो न्यायधीशसाहेब, तो उईल लिहिलेला कागद वर करून उजेडांत धरून पहा म्हणजे त्यावरील १९०५ हा आंकडा तुम्हाला दिसेल."

भाऊसाहेबांचें तोंड खरंकन उतरलें! त्यांनीं उईलपत्राचा रचलेला सर्व व्यूह एकदम जमिनदोस्त झाला!

"हें उईलपत्र साफ बनावट आहे." काशीनाथपंत म्हणाले, "खोटं उईल करणं म्हणजे भयंकर गुन्हा होय. ह्या गुन्ह्याला सक्तमजुरी सात वर्षांची आहे."

"काशीनाथपंत, आमचे हे मेहुणे हा एकच गुन्हा करून थांबले असते तर एक असो. पण त्यांचे गुन्हे याहींपेक्षां फार भयंकर स्वरूपाचे आहेत. माझा पुतण्या—ह्या देशमुखवाडीच्या वतनाचा आणि इस्टेटीचा खरा वारस—यशवंत त्याचा यांनीं खून केला."

"साफ-साफ खोटं!" एकदम भाऊसाहेब म्हणाले.

"हा पहा साक्षीदार—" गवळ्याकडे बोट दाखवून अण्णासाहेब म्हणाले, "तुम्ही तें अमानुष कृत्य केलें तें ह्या गवळ्यानें पाहिलें आहे. बळवंतराव! तुमच्या तोंडूनजास्त गोष्टी वदविण्याची माझी इच्छा नाहीं. तुम्ही माझ्या पुतण्याला खाणींत सुरुंग उडवून मारण्याचा एक वेळ प्रयत्न केला, तो फसला. नंतर आग लागली त्यावेळीं दुसरा प्रयत्न केला, तो फसला, तेव्हां हा तिसरा प्रयत्न केला. तुमचीं सर्व कारस्थानें मला कळलीं आहेत. आतां तुमचा देशमुखवाडींतला अवतार संपला." असें म्हणून काशीनाथपंताकडे आणि फौजदाराकडे पाहून अण्णासाहेब पुढें म्हणाले, "मी आतां देशमुख आहें. माझा अधिकार किती आहे हें मी नव्यानें सांगायला पाहिजे असें नाहीं. त्या अधिकारांत मी ह्या बळवंतरावास चोवीस तासांची मुदत देतो. तितक्या अवधींत त्यांनीं माझा पुतण्या-यशवंत सुरक्षित आणून माझ्या स्वाधीन करावा म्हणजे मी त्यांस त्यांच्या सर्व अपराधांची क्षमा करीन. आणि चोवीस तासांच्या आंत जर त्यांनीं यशवंताला सुरक्षित आणून दिलें नाहीं तर न्यायाधीशसाहेब आणि तुम्ही फौजदार, ह्या बळवंतरावास खोटें उईलपत्र आणि खून ह्या दोन गुन्ह्याबद्दल पकडून योग्य ती व्यवस्था करा."

---

# प्रकरण ४१ वें.



## खरे देशमुख.





श्वरी कर्तृत्व गहनगति आहे, हें सिद्ध करण्याकरितां पुरावे गोळा करण्याची अवश्यकता आहे काय ? पहा–एका क्षणांत भाऊसाहेबांची स्थिति कशी झाली ती पहा. ते आपल्या कपटबुद्धीनें आज वीस वर्षे सतत गाजवीत असलेला अधिकार काढून घेणारी ही अण्णासाहेबांची व्यक्ति कोण आहे, तें येथें सांगून आपण कथानक पुढें चालवूं. सातव्या प्रकरणांत ' पूर्व वृत्तांत ' या मथाळ्याखालीं जी हकीकत लिहिली आहे ती वाचक अद्यापि विसरले नसतील. अण्णासाहेब ऊर्फ यशवंतराव आपल्या वडिलांवर–दादासाहेबांवर रागावून घर सोडून गेले, ते कासाकिल्ल्याजवळ तुफानांत सांपडून बुडालेल्या मचव्यांत बुडून मेले अशी सर्वांची कल्पना झाली. परंतु ती कल्पना चुकीची होती. अण्णासाहेब घरांतून बाहेर पडले ते पायवाटेनें महाडावरून घाटावर आले. आतां घरीं परत जावयाचें नाहीं हा निश्चय असल्यामुळें उदरभरणाची कांहीं तरी व्यवस्था पाहिली पाहिजे असा विचार करून ते प्रथम पुण्यास गेले. तेथें त्यांची आणि एका रंगेल संस्थानिकाची गांठ पडली. अण्णासाहेबांचें शरीर लहानपणापासून कमाविलेलें असल्यामुळें, त्यांचा पिळदार आणि सतेज बांधा पाहून त्यांच्याकडे कोणाचेंहि सहजच लक्ष जात असे. त्यांतून ते उत्तम गवई असल्यामुळें असा गुणी मनुष्य आपल्याजवळ असावा अशी त्या संस्थानिकांस इच्छा होऊन त्यांनीं अण्णासाहेबांस आपल्याजवळ ठेविलें. त्यांनीं पहिलीं आठ वर्षे त्या संस्थानिकाजवळ काढिलीं. तेथून त्यांना दुसऱ्या एका संस्थानिकाचा आश्रय मिळाला. तेथें दोन तीन वर्षे काढल्यावर सातारकरांनीं त्यांना आपणाजळ बोलाविलें. श्रीमंत अण्णासाहेब महाराज भोसले सातारकर यांनीं त्यांस शेवटपर्यंत आश्रय दिला होता. पुढें दोन वर्षांपूर्वी श्रीमंतांचा देहान्त झाल्यावर आमचे अण्णासाहेब तेथून निघाले आणि उत्तरहिंदुस्थानांत प्रवासाला गेले. तेथें त्यांची आणि प्रो. छत्रे यांची गांठ पडली. प्रोफेसर साहेब गुणीजनांचे चहाते अस-

त्यामुळें अण्णासाहेबांचा आणि त्यांचा लवकरच स्नेहसंबंध जडला. त्यांच्या सर्कस बरोबर दोन वर्षें फिरल्यावर ते मद्रासहून पुण्यास आले होते. असो.

गेल्या प्रकरणांत उल्लेख केलेला प्रकार घडतांच सर्व मंडळीच्या मनाची काय स्थिति झाली असेल याची वाचकांनींच कल्पना करावी. तथापि त्या सर्व मंडळीच्या मनाची भावना एकसारखी मात्र नव्हती. हा प्रकार पाहून देशमुखवाडींतील नोकर चाकर लोकांस मुग्ध आनंद झाल्यासारखा दिसत होता. बाबुराव, वत्सला हीं मुलें आणि दुर्गाताई भयाभीत झालेलीं दिसत होतीं. सगुणाबाई आणि कृष्णा यांच्या चर्येवर भीतिपेक्षां दुःखाची झांक विशेष दिसत होती. भाऊसाहेबांनीं आपली मान खालीं घातली ती पुष्कळ वेळपर्यंत वरच केली नाहीं. त्यांच्या डोक्यांत कोणते विचार चालले होते ते त्यांचे त्यांनाच ठाऊक ! बऱ्याच वेळानें ते उठले आणि इकडे तिकडे न पाहतां आंत जाऊं लागले त्याबरोबर अण्णासाहेब रागानें मोठ्या स्वरांत म्हणाले, " बळवंतराव, चाललां कुठें ? आतां ह्या घरांत माझ्या हुकमाशिवाय जाण्याचा किंवा एका काडीलाहि हात लावण्याचा तुम्हाला अधिकार नाहीं. " असें म्हणून ते बाजूला उभा असलेल्या बाबुरावाकडे पाहून फौजदाराला म्हणाले, " आणि हा दुसरा गुन्हेगार पकडा. आपल्या बापाच्या वळणावर गेलेला हा साडेतीनशें रुपये चोरणारा चोर पकडा. "

" मी नाहीं चोरले ! त्या प्रभ्यानें आणि येश्यानें चोरले !"

" खबरदार जर त्यांचीं नांवें घेशील तर ! चोर-पाजी ! " असें म्हणून मधुकराकडे बोट दाखवून अण्णासाहेब म्हणाले, " हा पहा साक्षीदार उभा आहे. "

" अण्णा—माझ्याकडे पहा–" डोळ्यावर पदर धरून सगुणाबाई पुढें झाली.

" सगुणा, तुझ्याकडे माझें पूर्ण लक्ष आहे. पण ह्या न्यायाच्या कामांत तूं मला आड येऊं नको. तरी देखील हें लक्षांत ठेव कीं, मी जो आज वीस वर्षांनीं येथें परत स्वगृहीं आलों आहें, तो कोणालाहि–लहानापासून थोरापर्यंत त्रास किंवा दुःख देण्याकरितां किंवा गेल्या वीस वर्षांत तुझ्यापासून तो थेट हलक्या मजुरापर्यंत जसा ह्या बळवंतरावानें छळ केला तसा छळ करण्यास आलों नसून आपल्या कैलासवासी दादांची न्यायाची कारकीर्द पुढें चालविण्यास आलों आहे. "

" काका मी तुमच्या पाया पडतें—–" असें म्हणून कृष्णीनें आपल्या चुलत्याचे पाय धरले, " भाऊंना आणि बंडूला—–"

" तूं कोण ! यशवंताची बहीण कृष्णी काय ? उठ पोरी. तूं त्या चोर खुनी माणसांची रदबदली करतेस ? "

" काका, भाऊंनीं यशवंताला मारलं पण त्याचा खून नाहीं केला—"

" खून नाहीं केला ?–मग तो जिवंत आहे ?–कुठें आहे ? "

" त्याला प्रभा—आंबराईंत ठेवलं आहे ! "

आपल्या चुलत्याच्या प्रश्नाला उत्तर देण्या ऐवजीं कृष्णीनें आपली मान खालीं घातली. परंतु त्यामुळें तिच्या गौप्यगोपनाचा स्फोट झाला ! ती गप्प राहिलेली पाहतांच रायबा पुढें होऊन म्हणाला, " धनीसाहेब, आतां यशवंतराव पुष्कळ बरे आहेत. प्रथम मी त्यांना शेतांतून उचलून आणलं. तेव्हां तर ते जगण्याचीहि आशा नव्हती. मग प्रभाकररावांनीं त्यांना आपल्या घरीं नेलं. इतके दिवस पोलिसाच्या भीतीमुळें आम्ही ही गोष्ट लपवून ठेविली होतीं. पण मापबाप, आतां तुम्हीं आला अहांत. आतां आम्हाला कशाची भीति आहे ! "

" मग चला–प्रथम मला यशवंताला पाहूं द्या. "

" अण्णा—" सगुणाबाई पुनः पुढें होऊन म्हणाली, " अण्णा, तूं आतां म्हणालास ना कीं, यशवंत सुरक्षित परत मिळतांच येथली सुटका होईल म्हणून ? "

" होय सगुणा, मी माझा शब्द केव्हांहि मागें घेणार नाहीं. मी बळवंतरावांचे सर्व अपराध क्षमा केले आहेत. आणि ते केवळ तुझ्या करितां ! बरं, बळवंतराव चला आतां मज बरोबर तुमच्या कारस्थानामुळें यशवंताची काय स्थिति झाली आहे, ती एकदां स्वतः पहा. "

सर्व मंडळी आंबराईंत जाण्याकरितां निघाली. भाऊसाहेब खालच्या मानेनें मंडळी बरोबर चालत होते. ती मंडळी आंबराईंतून आंत येतांच माडीवरून एक मोठी किंकाळी ऐकूं आली. त्या वेळीं प्रभाकर आंतल्या बाजूला कांहीं काम करीत होता. ही मंडळी आली हें त्याला माहित नव्हतें. किंकाळी ऐकतांच तो धांवत वर गेला. आणि पाहतों तों यशवंत खिडकी जवळ बेशुद्ध होऊन पडला आहे आणि कमळा भयभीत होऊन त्याच्या जवळ एखाद्या पुतळी प्रमाणें उभी आहे. प्रभाकर आंत जातांच 'तूं अशी मोठ्यानें ओरडलीस कां !' असें त्यानें तिला विचारलें, तेव्हां तिनें उत्तरा ऐवजीं खिडकी-

ऊन बाहेर बोट दाखविलें. प्रभाकरानें बाहेर डोकावून पाहिलें तों काय? भाऊसाहेब, फौजदार आणि इतर मंडळी त्याच्या दृष्टीस पडली. त्याबरोबर ' घात—कमळे, धांव प्रथम दरवाजा बंद कर. आतां काय करावें ?" असें म्हणून प्रभाकरहि अगदीं गोंधळून गेला. इकडे किंकाळी ऐकून सावित्रीबाई आणि राधाआका बाहेर आल्या. तेव्हां ती सर्व मंडळी त्यांच्या दृष्टीस पडली. त्या मंडळींत भाऊसाहेबांस पाहतांच वरून ऐकूं आलेल्या किंकाळीचें कारण त्यांच्या चटकन् लक्षांत येऊन त्या दोघींचेहि हातपाय गळाले. इतक्यांत रायबा पुढें झाला, आणि म्हणाला," वहिनीबाई, अशा भिऊं नका. आतां भाऊसाहेबांची भीति बाळगण्याचें कांहीं कारण नाहीं. अण्णासाहेब—खरे देशमुख आज परत आले आहेत. ते पहा—"

सावित्रीबाईनें अण्णासाहेबांस पाहतांच ती दरवाजा आड झाली. तिनें अण्णासाहेबांस चटकन् ओळखलें. कारण तिच्या पतीचा-दाजीबांचा आणि त्यांच्या अत्यंत स्नेह असल्यामुळें ते पूर्वीं वरचेवर आंबराईत येत असत. असो. वरून ऐकूं आलेली किंकाळी मंडळींनींही ऐकली होती. तेव्हां दरवाजांत उभी असलेल्या सावित्रीबाई बरोबर न बोलतां अण्णासाहेब तडक वर गेले. रायबानें पुष्कळ हाका मारिल्या, समजूत केली तेव्हां प्रभाकरानें दरवाजा उघडला. त्याबरोबर अण्णासाहेब प्रथम आंत गेले. आणि अस्ताव्यस्त पडलेल्या यशवंतरावाला पाहतांच ' अरेरे ! पोरा, काय ही तुझी स्थिति !' असें म्हणून त्यांनी यशवंताला बेशुद्ध स्थितींतच उचलून आपल्या हृदयांशीं धरून ठेविलें. तात्काळ त्याला शुद्धीवर आणण्याचे प्रयत्न सुरू झाले. शास्त्रीबुवांना आणण्याकरितां मल्हारी धांवत गेला. तितक्या अवधींत मुकुंदशेटनीं खरी वस्तुस्थिति प्रभाकराला थोडक्यांत सांगितली.

" भाऊसाहेब, मला पकडूं नका. मला क्षमा करा ! " शुद्धीवर येतांच केविलवाण्यास्वरांत यशवंत म्हणाला.

" यशवंत, भिऊं नको. तुला आतां कोणी पकडणार नाहीं. मी आतां आलों आहे. आतां तुझ्या केसालाहि धक्का लागणार नाहीं. "

" तुम्ही कोण ? "

" मी ?—मी तुझा चुलता—! "

" कोण ? तुह्मी यशवंतराव ? आजोबांनीं ज्यांच्या स्मरणार्थ माझं नांव यशवंत ठेवलं तेच तुह्मी यशवंतराव काका ? "

" होय बरं यशवंत. मीच तो यशवंत–तुझा काका ! "

" काका, आतां मला कोणी पकडणार नाहीं ना ? पण हे फौजदार आले आहेत ते ? "

" नाहीं. यशवंत, आतां तूं देशमुख. तुला पकडण्याची कोणाची प्राज्ञा आहे ? "

" काका, मी खरंच देशमुख का ?–पहा कमला, मी तुला सांगितलं ना ? माझं स्वप्न खरं ठरलं ! आतां कमला—"

" काय पडलं तुला स्वप्न यशवंत ? "

त्याच पहाटेला यशवंताला एक स्वप्न पडलें होतें. ' आपण देशमुख झालों तें पाहून भाऊसाहेब लाचार होऊन त्यांनीं आपले पाय धरले आहेत आणि आपण केलेल्या सर्व अपराधांची ते क्षमा मागत आहेत. त्यांचे अपराध अत्यंत भयंकर जरी होते तरी आपल्या प्रिय आत्येला दुःख होऊं नये म्हणून आपण भाऊसाहेबांना त्यांच्या सर्व अपराधांची अंतःकरणापासून क्षमा केली असून आपल्या खाणीवर नोकरीस ठेवलें. त्याच प्रमाणें म्हाताऱ्या रायबाचे उपकार स्मरून त्याला दुप्पट पगार करून देवडीवर ठेवलें आहे. आणि कमलेबरोबर लग्न करण्याची आपण इच्छा दर्शविली आहे. तिनेंहि हास्य मुद्रा करून आपली संमति दिली आहे.' असें तें स्वप्न पाहून यशवंत उठला आणि आपल्या बिछान्यावर बसला. त्यावेळीं चांगलें उजाडलें होतें. अलीकडे चार दिवस त्याला पुष्कळ बरें वाटत होतें. तो आपल्या बिछान्यावरून उठून हळुहळूं खिडकीजवळ जाऊन बसत असे. त्याप्रमाणें आजहि तो पडलेल्या स्वप्नाचा विचार करीत खिडकीजवल बसला होता. इतक्यांत पाणी घेऊन कमला वर आली. तिनें त्याची शुश्रूषा अति उत्कृष्ट ठेविली होती. तो त्यांच्या घरीं आल्यापासून यशवंताला तिचीच सोबत होती; आणि त्या सान्निध्याचा परिणाम त्यांच्या मनांत परस्पराविषयीं सात्विक–शुद्ध प्रेमाचा उद्भव झाला. असो. ह्याप्रमाणें खिडकीजवळ बसून तो आपल्या स्वप्नाची हकीकत कमलेला सांगत असतां तिनें सहज खिडकींतून बाहेर पाहिलें तेव्हां अण्णासाहेब वगैरे मंडळी आंत येत होती.त्यांना पाहून ते कोण आले ? असे तिनें म्हणतांच यशवंतहि खिडकींतून बाहेर पाहूं लागला. त्यावेळीं भाऊसाहेब त्यांच्या मागून फौजदार व इतर मंडळी त्याच्या दृष्टीस पडली. तेव्हां आपणास पकडण्याकरितांच ते येत आहेत असें वाटून तो अतिशय घाबरला आणि मोठ्यानें किंकाळी

फोडून तेथेंच धाडकन् बेशुद्ध पडला. असो. ही सर्व हकीकत ऐकून अण्णासाहेब प्रसन्न चित्तानें म्हणाले, " तुम्ही दोघांनीं–तूं आणि कृष्णीनें जी स्वतःकरितां निवड केली आहे ती मलाहि पसंत आहे. ह्या गोष्टीचा मी योग्य वेळीं विचार करीन. आतां तुला पडलेलें स्वप्न खरोखरीच फार महत्वाचें आहे. त्या स्वप्नाच्या रूपानें तुझ्या दैविकशक्तीनें जो न्याय निवडला आहे, त्याच प्रमाणें मी आतां निकाल देतों." असें म्हणून ते भाऊसाहेबाकडे वळले आणि म्हणाले. " बळवंतराव, यशवंताच्या स्वप्नांत ज्याप्रमाणें तुम्ही आपल्या अपराधांची त्याच्याजवळ क्षमा मागितली, त्याप्रमाणें आतां मागा."

भाऊसाहेबांस मोठा प्रश्न पडला! परंतु तात्काळ त्यांचें मन तसें करण्यास तयार झालें; कारण तसें केल्याशिवाय त्यांना गत्यंतरच नव्हतें. ते खालीं मान घालून हात जोडून यशवंताला म्हणाले, " यशवंत, मी तुझा फार अपराधी आहें. माझ्या हातून फार वाईट कृत्यें घडलीं. मी तुला फार वाईट रीतीनें वागविलें. ह्या सर्वांच्या मुळाशीं पैसा आहे. पण आतां तूं तें सर्व विसरून जा. आणि मला क्षमा कर. मला आतां खरा पश्चात्ताप झाला आहे. मला आतां कशाची इच्छा राहिली नाहीं. फक्त हातून घडलेल्या पापांच्या क्षालनार्थ एखाद्या पुण्यक्षेत्रीं जावें असें आतां मला वाटतें. लोक आतां माझ्याकडे पाहून बोट दाखवितील, मला पाहून हांसतील पण त्याची मला भिति बाळगण्याचें कारण नाहीं. माझीं मुलं आहेत. पण तीं देखील माझ्याच वळणावर गेलीं आहेत हें मी पूर्णपणें जाणून आहें. तथापि अण्णासाहेब थोर मनाचें आहेत. ते त्या पोरांना योग्य मार्गावर आणतील अशी माझी पूर्ण खात्री आहे."

भाऊसाहेबांना खरा पश्चात्ताप झाला आहे असें पाहून अण्णासाहेबांनीं त्यांचा हात आपल्या हातांत धरला आणि ते म्हणाले, " बळवंतराव, तुमच्या हातून ज्या कांहीं बऱ्या वाईट गोष्टी घडल्या त्यांची तुम्हाला आतां जाणीव झाली आहे. परंतु त्याकरितां तुम्हाला एखाद्या पुण्यक्षेत्रीं जाण्याची कांहींच अवश्यकता नाहीं. वास्तविक मी तुमच्यापेक्षां वयानें मोठा आहें. तेव्हां मीच ह्या पाश तोडून कुठं तरी पुण्यक्षेत्रीं जावें हें योग्य आहे. पण त्या योगानें आपल्या मनाला शांति मिळणार नाहीं. कारण येथें सर्व पोरवडा आहे. त्यांना योग्य मार्गाला लावल्याशिवाय आपल्या कर्तव्याची समाप्ति होत नाहीं. म्हणून म्हणतों कीं, वर्ष सहा महिन्यांत येथील सर्व व्यवस्था लावून जो तो आपापली

जबाबदारी ओळखूं लागला, ह्मणजे आपण दोघे एकत्रच जावूं ? '' असें म्हणून ते प्रभाकराला म्हणाले, " प्रभाकर, जा तुझ्या आईला आंत बोलावून आण. या—वहिनी तुम्ही अशा बाहेर का ? मला तुम्ही प्रथम ओळखलं नाहीं असं दिसतं ? दाजी आणि मी ह्याच खोलींत कुस्त्या खेळत असूं. त्यावेळीं तुम्ही आम्हाला हांसत होता. असो. गेले ते दिवस आणि ती मित्रमंडळी. आतां मी हा तुमचा मधुकर आणला आहे. याला तुम्ही क्षमा करावी अशी मी शिफारस करतो. तो आतां माझ्या उपदेशाप्रमाणें तुमच्या आणि प्रभाकराच्या सांगण्याबाहेर काडी इतका देखील वागणार नाहीं अशी माझी खात्री आहे. जा, मधुकर आपल्या आईच्या आणि दादाच्या पाया पड—'' मधुकरानें त्याप्रमाणें करतांच भाऊसाहेब मध्येंच म्हणाले, " सावित्रीबाई, मी तुमचाहि फार अपराधी आहें. दाजीनें आपल्या मृत्युपत्रांत लिहिल्याप्रमाणें दादासाहेबांनीं तो करार कर्जनामा मला फाडून टाकण्यास सांगितलें होतें. परंतु ह्या आंबराईचा मला लोभ सुटला होता. आतां अण्णासाहेब आले आहेत. ते आपलं नुकसान—''

" भाऊसाहेब, यांत आमचं नुकसान तें काय झालं ? उलट माझ्या प्रभाकराची उद्योगशीलता, सत्यप्रिय, सरळ आणि प्रेमळ स्वभाव माझ्या दृष्टीस पडून त्याच्याविषयीं माझ्या मनांत जो सापत्न भाव होता तो पार नाहींसा झाला. ''

" मग आतां वहिनी, ह्या सर्वांचा शेवट गोड करणं तुमच्या हातीं आहे. '' अण्णासाहेब म्हणाले. इतक्यांत शास्त्रीबुवाहि आले. त्यांच्याकडे पाहून ते पुढें म्हणाले, " का केशवराव, ओळख आहे का ? ''

" ओळख ! अण्णा तुम्ही विसरलां पण आम्ही तर रात्रंदिवस तुमची आठवण करतों, आतां तुम्ही आमच्यांत आलांत तेव्हां सर्वांचे उच्चीचे ग्रह आले असेंच म्हटलें पाहिजे. ''

" कांहींहि म्हणा पण वहिनी, मी विचारलं त्याचं तुम्हीं उत्तर नाहीं दिलं ? ''

" उत्तर काय द्यायचं ? सर्वांचा शेवट तर तुम्हींच गोड केला आहे. आतां काय राहिलं ? ''

" माझी कृष्णी तेवढी तुम्ही आपल्या पदरांत घ्या—''

" मग आमची कमलाहि तुम्ही पदरांत घ्या—''

" वाः ठीक ! ही आदला बदल करून करा आतां सर्वांचा शेवट गोड ! ''

———

# प्रकरण ४२ वें.



## कथानकाचा शेवट.



आज देशमुखवाडी अगदीं गजबजून गेली होती. मोठे यशवंतराव ऊर्फ अण्णासाहेब परत घरीं आले असें कळतांच त्यांचीं कुळें आणि खाणीवरील सर्व मजूर त्यांना भेटण्याकारितां आले. कर्मधर्मसंयोगानें तो सार्वजनिक रजेचा दिवस असल्यामुळें अण्णासाहेबांबरोबर सकाळीं शहरांतून आलेले त्यांचे बाळमित्र काशिनाथपंत न्यायाधीश आणि मुकुंदशेट त्याचप्रमाणें फौजदार यांना तो सर्व दिवस देशमुखवाडींत अण्णासाहेबांच्या संगतींत घालवितां आला. नऊ वाजण्याच्या सुमारास यशवंताला गाडींत घालून आंग्राईतून घरीं आणलें. त्यावेळीं त्याच्या गाडीबरोबर इतकी गर्दी झाली होती कीं, ती एक मिरवणूकच निघाली आहे असें पाहणारास वाटलें. वाड्यांतून गाडी आंत आल्यावर स्वतः भाऊसाहेबांनीं गाडीचा दरवाजा उघडला आणि यशवंताचा हात धरून त्याला हळूंच खालीं उतरविलें. नंतर एका बाजूला अण्णासाहेब व दुसऱ्या बाजूला भाऊसाहेब असें दोघे दोन बाजूला होऊन त्यांनीं हळुहळू यशवंताला आंत आणलें. दरवाजांतच सगुणाबाई तिच्या मागें कृष्णी आणि दुसरीं मुलें उभीं होतीं. यशवंताला पाहतांच सगुणाबाईच्या नेत्रांतून प्रेमाश्रु आले.

तो दिवस खरोखरीच मोठा आनंदाचा होता. अण्णासाहेबानीं त्या दिवसाच्या स्मरणार्थ आपल्या सर्व कुळांना आणि मजूरांना मेजवानी देऊन कुळांची थकलेली सर्व बाकी माफ केली. त्याचप्रमाणें मजुरांना एक महिन्याचा पगार बक्षीस म्हणून दिला. रायबाला दरमहा पांच रुपये मिळत असत ते पंधरा केले. अशा रीतीनें तो सर्व दिवस मोठ्या गडबडीचा होता, तरी अण्णासाहेब स्वतः सर्वांची चौकशी करीत होते. त्या सर्व मंडळींत खाणीवरील हरिभाऊ कुठेंहि दिसला नाहीं, ही गोष्ट प्रभाकराच्या लक्षांत येतांच त्यानें तो न येण्याचें कारण ओळखलें. तेव्हां त्यानें ती गोष्ट शास्त्रीबुवांच्या कानावर

घातली. त्यांनीं संधी साधून अण्णासाहेब आणि भाऊसाहेब यांस एका बाजूला नेलें आणि वत्सले संबंधानें सर्व हकीकत त्यांना सांगितली. त्यावर त्यांचा पुष्कळ विचार झाला. आणि शेवटीं हरिभाऊचा पगार वाढवून त्याचें आणि वत्सलेचें लग्न करावें असेंच ठरलें. सगुणाबाईलाहि तो विचार पसंत पडला.

परंतु फाल्गुन महिन्यांत ठरलेल्या तिथीला चार दिवस राहिले तरी वत्सलेला स्वतः च्या लग्नाची गुणगुणहि नव्हती, अशारीतीनें अण्णासाहेबांनीं सर्व गोष्टी गुप्तपणें घडवून आणिल्या. नंतर एके दिवशीं ते, भाऊसाहेब आणि सगुणाबाई एकत्र बसले असतां त्यांनीं वत्सलेला बोलाविलें आणि तिला पुष्कळ हितोपदेश करून ' हरिभाऊबरोबर तुझें लग्न ठरविलें आहे ' असें शेवटीं सांगितलें. प्रथम तिची इच्छा नव्हती तरी शेवटीं तिला आपली संमति द्यावी लागली. होतां होतां तिथि-निश्चय केलेला दिवस उगवला. त्या दिवशीं प्रभाकर व कृष्णा यांचें, आणि हरिभाऊ व वत्सला यांचें अशी दोन लग्नें मोठ्या कडाक्यानें झालीं.

यशवंताची प्रकृति आतां पुष्कळ सुधारली आहे. तो आतां खरा मालक होता. अण्णासाहेबांनीं ह्या दोन चार महिन्यांत देशमुखवाडींत आणि खाणीवर स्वतः देखरेख करून पुष्कळ गोष्टी सुधारल्या. त्यांच्या कडक शिस्तीमुळें बाबुराव आतां पुष्कळ सुधारला. भाऊसाहेब आतां पूर्णपणें निवळले. सगुणाबाई आतां पूर्ण सुखी झालीं. हल्लीं देशमुखवाडींत सर्वत्र आनंदाचें साम्राज्य पसरलें आहे.

' पुढल्या वर्षीं यशवंत आणि कमला यांचा विवाह होण्याचें नक्कीं ठरलें आहे ' असें आजच प्रभाकरानें आपल्या पत्रांत माधवरावास, त्यानें विचारलें होतें म्हणून लिहिलें आहे.



